श्री.

# आत्मविचार



हा ग्रंथ

रा. रा. गणेश वामन देव, नांदोदकर हल्लीं वस्ती
श्रीक्षेत्र चांदोद कर्नाळी, यांनीं स्वतः लिहून
तयार केला तो त्यांचे परवानगीनें

**अनंत गणेश शेकदार**
**व**
**धोंडो कृष्ण कोपरकर**

यांनीं

मुंबई येथें 'वर्तमानतत्त्वदर्शक' छापखान्यांत

छापून प्रसिद्ध केला.



शके १८१७; सन १८९५.



किंमत १॥ रुपया.

1616

श्री.

# आत्मविचार.



॥ श्रीगणेशायनमः ॥

श्रीसरस्वत्यैनमः, श्रीगुरुभ्योनमः,

श्रीपरमात्मनेनमः, श्रीशंकरायनमः ॥

गणेश वामन देव, नांदोदकर,

हल्लीं वस्ती श्रीक्षेत्र चांदोद कर्नाळी.

# प्रस्तावना.

स्रष्ट्यानें[1] या ब्रह्मांडांतील नानाविध आकार रचना इतकी कांहीं गूढ करून ठेविली आहे कीं त्यांतील खरें रूप यथार्थ कोणासही कळत नसून या सर्व वस्तु न जाणों एकच मासल्याच्या व एकच सांच्याच्या असाव्या, व यांत मूळतत्व काय हें समजणें अति दुर्घटच आहे. मात्र मनेंद्रियागोचर होणाऱ्या त्या त्या वस्तुच्या गुण धर्मावरून नामरूपात्मक हें अमुकच असें मनुष्यमात्र आपल्या बालंबाल खात्रीनें सांगत असतात तत्रापि त्या सत्यत्वांत निरनिराळ्या मनुष्याच्या अनुभवावरून क्षणोक्षण फेरफार दिसून येतो इत्यादिक हा प्रकार बाह्यसृष्टीचा झाला परंतु अंतरसृष्टीचे संबंधानें तर जे अद्भुत विलक्षण चमत्कार आहेत, ज्यांचा कांहीं थांग लागत नसून आकार रहित कल्पनामात्र असते त्यांचा सूक्ष्मदृष्टचा विचार केला असतां दिनदुनियेच्या अजब्बाजाराची मोठी मौज वाटते, इतकी विचित्र गहन कारागिरी केली आहे. तथापि त्यांचें ज्ञान होण्यास मनुष्यास मन व इंद्रियें ही एकप्रकारची साधनशक्ती ईश्वरानें दिली आहे त्यायोगें मानव आपलें कर्तव्यकर्म बजावतील तर सत्प्राप्तीनें सुखी होतील असा ईश्वराचा हेतु दिसतो. याच कारणें पश्वादिकांहून मनुष्यास ज्ञान ही विशेष देणगी दिली असावी. कारण—

**आहारनिद्रा भयमैथुनं च**
**समानमेतत्पशुभिर्नराणां ।**
**ज्ञानं नराणामधिको विशेषो**
**ज्ञानेन हीनाः पशुभिः समानाः ॥.**

---

१ ब्रह्मदेवानें.

आहार, निद्रा, भय, मैथुन, हे जंगम प्राणिमात्रीं समान असून ज्ञान हें मनुष्यांत विशेषत्व आहे त्या ज्ञानाचा जर यथार्थ उपयोग न केला तर पश्वादिक व मनुष्यांत आकृतिमात्रच भेद; अन्य नाहीं, ह्मणूनच सुखाची इच्छा करीत असून ती इच्छा पूर्ण न होतां निरंतर दुःखी रहातात!

अनेक पुरुष सुखप्राप्त्यर्थ धन, पुत्र, कलत्रादिकांचे ठिकाणीं सुख आहे असें समजून तत्संपादनार्थ अहोरात्र यत्न करतात व दुःखनिवृत्यर्थ मंत्र, तंत्र, तप, दान, योग, याग, कर्मोपासनादिकाचा आश्रय घेतात तथापि दुःखनिवृत्ति, सुखप्राप्ती होत नाहीं. कारण व्याधी न ओळखून जो उपचार तो अधीक विकृति मात्र करतो. जसा कोणी पुरूष अफू, भांग, मदिरादिकांचें अधिक सेवन ठेवून तद्योगें अतिसुख समजतो पण ज्यास्त दुःखीच होतो तद्वत् जे पुरूष सुखप्राप्ती, दुःखनिवृत्तीस्तव जगांतील तुच्छ पदार्थांचा आश्रय घेतात ते ज्यास्त दुःखाचे अनुभवी मात्र होतात. जसा मृग—

**स्वसुगंधमबुध्वैणस्तृणेषु भ्रमते यथा**
**स्वरूपानंदमज्ञात्वा तथा भोगेष्वबुद्धयः**

आपले कस्तुरीचा सुगंध आपलेच जवळ आहे हें न जाणून भ्रान्तीनें अन्य[illegible]ठीं कस्तुरी शोधीत फिरतो, तसे सर्व पुरुष स्वस्वरूपानंदसुख आपलेच ठिकाणीं आहे हें न जाणून भ्रांती कल्पित जगद्विषयांत सुखलाभाची इच्छा करतात परंतु गुप्तधन घरांत असून भ्रान्तीनें बाहेर पाहूं गेले किंवा कोणी ग्राम पूर्वेस असून तेथें जाण्याच्या हेतूनें जर पश्चिमेचा मार्ग धरला तर तें कसें मिळतें? तसेच वर दर्शित केलेले जे सुखप्राप्तीचे मार्ग ते अयुक्त असल्यानें सर्व पुरुषांच्या इच्छा अपूर्ण रहातात.

---

या अत्यंतदुःखनिवृत्ति अखंडसुखप्राप्तीस खरें सुख कोणतें व तत्प्राप्तीचें साधन काय हें यथार्थ समजून तोच यत्न करणें युक्त. तें निरतिशयानंद-सुख आत्मलाभाविना नसून तत्प्राप्तीस आत्मज्ञानच संपादन केलें पाहिजे, याविना अन्य कोणत्याही उपायानें निःशेषदुःखनिवृत्ति निरंतर सुखानंद-प्राप्ती कधींच होणार नाहीं.

महान् आश्चर्य आहे कीं, जे पुरूष समुद्राची गंभीरता, वायुवेगें जल, अग्नी, सूर्य, चंद्र, नक्षत्रें, आकाश, पृथ्वी, पर्वतादिक अनेक शोध करतात पण आपले स्वरूपाचा शोध करीत नसून जसे बुद्धिरहित पश्वादिक प्राणी आपणास न जाणून आहार, निद्रा, मैथुन, भय, अनुभवून अनेक भार वहातात व दुःखांतच मृत होतात, तसेच हे सबुद्धमानवप्राणी प्रपंचभार वहाण्यांत [1]अहोरात्र कालक्षेप करीत असून आत्मक्षयाचा कांहींच विचार न पहातां दुनियेंत आले तसेच जातात. गम्मत अशी कीं या जगांत कितीक रावसाहेब नानासाहेब मी मी ह्मणत मोठ्या ऐटीनें वागतात आणि प्रपंचांतील अनेक बारीक शोध काढतात व कितीएक उलाढाली करतात, तरी हाडें, मांस, चर्म, प्राण, मनेंद्रियादिकांपैकीं नाना-साहेब ह्मणवीत कोण मिरवतो व हीं विशेषणें कोणास हें त्या नाना-साहेबांस समजत नसून दुनियेंत बहुतेकांसही कळत नाहीं मात्र अनेकगुण-[2]समुच्चयास पदार्थ ह्मणून जसा जगांत व्यवहार चालतो तसा अस्थिचर्मादिक-[3]संघांतच केवळ मी ह्मणत असतो आणि जसा कोणी पुरूष वेश्यागारीं विषयसुखीं निमग्न असतां इकडे आपले [4]गृहास अग्नी लागला हें जाणत नाहीं किंवा मद्यपी आपला ठेवा हरण झाला हें समजत नाहीं, तद्वत्—

**आदित्यस्य गतागतैरहरहः संक्षीयते जीवितं**
**व्यापारैर्बहुकार्यभारगुरुभिः कालो न विज्ञायते**

---

१ दिवसरात्र. २ अनेक गुणाच्या वस्तूंचे मिश्रण. ३ समुदाय. ४ घरी.

**दृष्ट्वा जन्मजराविपत्ति मरणं त्रासश्च नोत्पद्यते**
**पीत्वा मोहमयीं प्रमादमदिरामुन्मत्तभूतं जगत् ॥**

सूर्यास्तोदयीं, अपालें आयुष्य धर्म धन, नष्ट, होत असून अनेक प्रकारचे कारभारांत कालगती लक्षीत नाहीं आणि आपणास व इतरांस जन्म, जरा, मृत्यु, विपत्ती अनंत क्लेश सतत् अनुभवीं येतात तरी विरक्ति येत नसून जसा मद्यपी उत्तम असतो तद्वत् मोहप्रमादानें सकलविश्व उत्तम बेफाम झालें आहे याचा शेंवट पश्चात्ताप होतो व कृतकर्माचें फल बिन-चुक भोगावें लागतें.

या प्रारब्धानुरूप सुखदुःख भोगण्याचें सर्वथैव साधन हें मनुष्यशरीर आहे तें अनेकजन्मान्तीं महत्पुण्योदयानें क्वचित् प्राप्त होत असतें. जसा अनेक वस्तू प्रयत्नानें मिळतात तसा चिंतामणी मिळत नसतो, किंवा सहज जांभई घेताना तोंड वासलें असतां अकस्मात् पूर्वसुकृतें मुखांत अमृत पडावें तद्वत् महद्भाग्यानें या मनुष्यदेहाचा लाभ होत असतो यायोगें सत्यासत्य विचार करून कृतार्थ होणें हें या देहाचें कर्तव्यकर्म होय. या देहयोगें बंध मोक्ष जें इच्छावें तें घडतें याच कारणीं यास आद्यदेह म्हटला असून देव पण या देहाची इच्छा करतात. असें दुर्लभ शरीर प्राप्त झालें असून पश्वादिकांचे विषयादिक तुच्छ धर्म स्वीकारून जे पुरूष ईश्वरभक्ति विन्मुख होतात ते परमेश्वराचे विश्वासघातकी, कृतघ्न, आत्महत्यारे शेवटीं अतिखेद पावतात. जसा—

**चिंतामणिं देहमुपेत्य मानुषं**
**सर्वार्थदं भोगविषक्तमानसः**
**पुत्राप्धनाद्यर्थमथोत्सृजंत्यहो**
**तापं तु पश्चात्कृषिको यथाऽश्नुते ॥**

कोणीएक शेतकरी आपलें धान्याचें शेत एका गहनननदीतीरीं लावून त्याचे रक्षणार्थ नित्यशः मृत्तिका खणून तिचे गोळे करून पक्ष्यांवर फेंकीत असे. एकेदिवशीं माती खणता खणतां त्यांतून एक चिंतामणी भरलेला घट निघालातें पाहून ह्मणतो आज मला ईश्वरानें आयते तयार गोळे दिले तर आज यांवरच शेतराखणी करीन. ह्मणून नित्यक्रमाप्रमाणें ते सर्व मणी पाखरावर फेंकून दिले; ते गहननदीजलांत गेले, त्यांतील एक मणी दैवयोगें चुकून एकीकडे राहिला होता. दोनप्रहरीं त्याची स्त्री त्याजकरितां घराहून भोजन घेऊन आली तिजबरोबर तिचें एक मूल होतें तें रडूं लागलें यास्तव तो मणी तिनें त्याचे हातीं क्रीडेस दिला. पतिभोजनोत्तर ती गृहीं जातां मार्गांत एक जव्हेरी उभा होता त्यानें तो मणी पाहून तिला विचारलें,या वस्तूचा तूं दाम काय घेशील? ती स्त्री ह्मणाली माझ्या पतीस घेऊन येतें तो सांगेल. असें ह्मणून परत जाऊन त्यास घेऊन आली, त्यास पूर्ववत् प्रश्न केला शेतकरी ह्मणाला; याची किम्मत मला माहीत नाहीं आपणच सत्यधर्मानें सांगून द्या. तो वाणी धर्मात्मा होता यास्तव ह्मणाला याचा दाम देण्यास मला सामर्थ्य नाहीं पण उदईक सूर्योदयापासून अस्तमानपर्यंत तुझ्यानें नेववेल तितकें द्रव्य माझे घराहून घेऊन जा. हें ऐकून तो प्रसन्न होऊन मणी त्यास दिला व कराराप्रमाणें दुसरे दिवशीं द्रव्य नेऊं लागला. तो मार्गीं येतां जातां अति रुदन करीत आहे असें पाहून कोणी एकानें विचारलें अरे तुला बहुत वित्तलाभ झाला, त्याचें सुख न मानून उलट रुदन करतोस याचें काय कारण? शेतकरी म्हणतो यामण्यासारखे असंख्यमणी मला प्राप्त झाले असून ते मी मूर्खपणानें नदींत फेकून दिले त्यांतील हा एक मणी चुकून राहिला होता. त्याचा एवढा मोठा उपयोग झाला तर जर सर्व असते तर किती उपयोग होता? या पश्चात्ता-

---

१ निरूपण.

न मला खेद होत आहे. याचप्रकारें हें मानवशरीर घटरूप असून यांत श्वासरूप अगणित चिंतामणी आहेत. जसा चिंतामणी सर्वार्थ प्राप्तीकर असतो तसा श्वासयुक्तदेह पुरुषार्थद्वारा सर्वार्थ प्राप्तिकर आहे. ज्या एका श्वासाचें व्यर्थ जाणें समग्रपृथ्वीमोलानें परत मिळत नाहीं त्याची किंम्मत न जाणून अनादर करून स्त्रीपुत्र धनादिकविषयार्थ श्वासरूपचिंतामणी जे पुरूष कालरूपगहन नदीप्रवाहीं खर्ची घालतात ते परलोकीं एखादें सत्कर्म, सत्धर्म, सत्संग, केलेल्या श्वासाची किम्मत पडते तेंव्हां आह्मी व्यर्थ आयुष्य गमावलें असें ह्मणून पश्चात्तापानें अतिरुदन करतात.

सृष्टींत देहादिकापासून ब्रह्मलोकपर्यंत—

**यदिदं दृश्यते सर्वं राज्यं देहादिकं च यत्**
**यदि सत्यं भवेत्तत्र आयासः सफलश्च ते ॥**

धन, पुत्र, कलत्र, राज्यादिक, ज्या ज्या वस्तु दिसतात त्या त्या सत्य असत्या तर हा प्रपंच आयास सफल झाला असता. परंतु

**भोगा मेघ वितानस्थविद्युल्लेखेव चंचलाः**
**आयुरप्यग्निसंतप्तलोहस्थजलबिंदुवत् ॥**

संपूर्ण वस्तु विद्युद्वत्[1] भासमात्र क्षणिक मिथ्या असून ज्या देहार्थ नानाभोग इच्छिणें त्याचें आयुष्य तप्तलोहावर जलबिंदुवत असतें तें सर्व भ्रान्तीनें सत्य जाणून भोगास्थेनें मानव महत्क्लेशयुक्त अनेक कर्में करून

---

१ वीज.

पापपुण्यसंशयानें दुःखाचें साधन मात्र करून घेतात व अमूल्य देह खर्ची घालतात.

देहविचार पहातां पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणें शुक्र¹शोणितापासून प्रथम उत्पत्ति व अंतीं शून्यरूप ह्मणजे आद्यंतीं नसून मध्येंच गारुडवत् भासतो; ज्यास क्रियाभोगादिकांचा संसर्गही नसतो. जर देहच कर्ता भोक्ता ह्मणावा तर प्राणादिक गेल्यावर देहाकृती पूर्ववत् असून देहाच्या सर्व क्रिया बंद कां होतात? यावरून देहादिक दृश्यमात्र केवळ जड असें स्पष्ट होत आहे. आणि आत्मा निर्गुण, निराकार, यास्तव असंग, अकर्ता, अभोक्ता, असें श्रुति शास्त्रें ह्मणतात. यांत कर्ता, भोक्ता, कोण हेंच मुळीं निवडत नसून उगीच सर्वांस मी मी ह्मणून जीव उड्या मारतात. जर दुसऱ्याचें ओझें आपण डोक्यावर घेतलें तर भारानें शीण येईल यांत नवल काय? चोरी न करतां मी केली ह्मणतो तो दंड पावतो या प्रकारें वास्तव पहातां सर्व दुःखाचें मूळ एक अभिमानच दिसत आहे, ज्यायोगें जीव आपणावर येऊन विपत्तींत पडतात. एवं देहादि दृश्यमात्र केवळ जड अशाश्वत मुळींच परकें केव्हां जाणार याचाही नेम समजत नसतां उत्पन्नापूर्वीच मरणभय लागलें असतें.

जसा सर्प—

**यथा व्यालगलस्थोऽपि भेको दंशानपेक्षते**
**तथा कालाहिना ग्रस्तो लोको भोगानशाश्वतान् ॥**

स्वमुखांत धरलेला बेडूक हळूहळू ग्रास करतो तेवढ्याच अवकाशांत तो बेडूक तेथून सुटण्याचा विचार न पहातां माशा धरतो, तद्वत् सर्व-प्राणी कालमुखीं ग्रस्त असून,

---

१ रेतरक्त.

जरा व्याघ्रीव पुरतस्तर्जयंत्यवतिष्ठते
मृत्युः सहैव यात्येष समयं सम्प्रतीक्षते ॥

जरा, व्याघ्रीप्रमाणें शरीर भक्षीत असते; रोग, शत्रुवत अहर्निश देहावर प्रहार करतात; मृत्यु, निरंतर देहासमागमेंच रहात असून समयावधी पहात असतो; इत्यादिकांकडे दुर्लक्ष करून अशाश्वत विषयार्थि रात्रंदिवस धूम खटपटींत निमग्न असतात. अहो, व्याघ्राचे वनांतून एकदां सुरक्षित निघून येणें झालें किंवा सर्पगृहीहून एकदां धनलाभ झाला ह्मणून दुसरे वेळीं व्याघ्र सर्प नाहिंसे होतात कीं काय? शत्रु निद्रिस्थ असल्यानें भयच गेलें असें होत नाहीं. कालरूप शत्रु अखंड समयावधी पहात असतो. ज्यानें अनंत ब्रह्मांडें मुखीं टाकलीं. ज्याचें भयें तीनलोक कांपित होतात असें सर्व जग जाणत असून त्याकडे दुर्लक्ष करून तिरास आलेली नाव दाटून बुडवितात, ही मोठी शोचनीय गोष्ट आहे! जसा शरीरास रोग असून उपचारें आरोग्य न करतां झांकून प्राणान्त प्रसंग आणणें अथवा स्वगृहास अग्नी लागला हें जाणून आपण कवाड लावून स्वस्थ आंत रहाणें तसेंच हें ही चातुर्य होय!!

जसा एखाद्या वृक्षावर पक्षी माळा करून राहिला असतो त्या वृक्षाचें कोणी छेदन करीत आहे किंवा अग्नी लागला आहे तर त्यावरील गृह दारादिकांचा त्याग करून जो पक्षी निराशेनें चालता होतो तो सुखी होतो व जो अविचारें गृहासक्त रहातो तो सर्वस्व नाश पावतो अथवा युद्धप्रसंगीं शत्रु सन्मुख असून जो आळसानें मागें पाऊल घेतो तो मारला जातो एवं बलवान शत्रुशीं ज्याचें हाडवैर आहे त्यानें सदोदीत सावध राहिलें पाहिजे तद्वत् कालरूपदुर्धर शत्रु, जसा कोणी पुरूष बलिदानार्थ एखादे पशूचें प्रालन करून शेवटीं घात करतो तसा बाल्युवावस्था दाखवून अंतीं ग्रास करील हें मुमुक्षूनें क्षणोक्षणीं स्मरण ठेवून तज्ज-

यार्थ जरादि पूर्वी अलंपटत्वें महानयत्न केला पाहिजे तेच सर्व दुःखांतून मुक्त होतील.

प्रापंचिक क्षणिक मिथ्या भ्रांत्यात्मक सुखाकरितां रात्रंदिवस झटत असून कितीक अर्थ दैवानें साध्य होतात व कित्येक साध्य न होतां श्रम व्यर्थ जातात तसा मोक्षार्थ आयास व्यर्थ नसून महत्फल देतो परंतु काष्टवर्षणापासून अग्नी प्राप्त करून घेण्याची ज्याची खरी इच्छा आहे त्यानें अविश्रांत अतिबलानें मंथन केलें पाहिजे त्यांत किंचित् विसावा घेतला तर अग्निप्रादुर्भाव जाऊन कष्ट वृथा जातात तद्वत् सर्व दुःखमुक्ततेनें अखंडसुखाची ज्यास खरी वांच्छा आहे त्यानें क्षणमात्र आयुष्य व्यर्थ जाऊ न देतां अति तत्परतेनें स्वकार्य साध्य केलें पाहिजे. नाहीं तर—

बाल्यं गतं केलिरतस्य यौवनं
रामाविलासेषु च वार्द्धकेऽबुधः
प्राप्तेऽस्वतंत्रेऽथ जपं करोत्यहो
कूपं खनत्युज्ज्वलितालयो यथा ॥

विद्याप्राप्तीचा साधनकाल बाल्यावस्था खेळण्यांत गमावून, जपतपसुकृतसंपादनसाधनकाल युवावस्था, ती, स्त्री वित्तादिकविषयभोगांत खर्ची; व शक्ती धैर्यस्वतंत्रतादिक ही वृत्ती वृद्धावस्था, त्यांत मूढजन जपतपादिकाचा आरंभ करतात, तो उद्योग जसा गृहास अग्नी लागल्यावर तत्शांत्यर्थ उदकाकरितां कूपखननयत्न व्यर्थ, तसा निरर्थक होऊन मूर्खत्व मात्र पदरीं येते! ह्मणजे

आयुष्यं क्षीयते यस्मादादित्यस्य गतागतैः
दृष्ट्वा नैषां जरामृत्यू कथंचिन्नैव बुध्यते

---

१ वृद्धावस्था.

**अहन्यहनि भूतानि गच्छंतीह यमालयम्**
**शेषाः स्थावरमिच्छन्ति किमाश्चर्यमतः परम् ॥**

अपक्व घटांतील जळ हळूहळू झरत असतें त्याप्रमाणें सूर्यास्तोदयीं आयुष्य क्षीण होत असून नित्य असंख्य जीव मरून यमालयीं जातात हें प्रत्यक्ष पहात असतांही आपली अक्षयास्थिती जाणतात याहून अन्य मूर्खत्व व आश्चर्य कोणतें? व्याधी दिवसेंदिवस प्रबल होत असून जो त्याचा उपशम न विचारील तो आपणच आपला वैरी होय. तद्वत् आजची आलेली वेळ उद्यांवर लोटून आह्मीं परमार्थ साध्य करूं असें जे ह्मणतात ते कालनदींत वाहवले जातील आणि हा नरदेह पुन्हा प्राप्त न होतां अती यातायाती भोगाव्या लागतील; जर पुढचा मार्ग भयप्रद कळत आहे तर त्याचा याच मुकामीं सावधगिरीचा विचार करून साहाय्यबलानें सूर्यास्तापूर्वीं मुक्कामीं पोंचवेल अशा त्वरेनें पाऊल उचललें पाहिजे अथवा दीप असेपर्यंत झांकापाक जें करणें तें केलें पाहिजे असा सृष्टींत ही व्यवहार आहे, कारण तेल संपलें कीं दीप जाणार मग आपणच ठेवलेली वस्तु अंधारामुळें आपणास मिळत नसते तर दुसरें काय होणार? तस्मात् देहेंद्रिय प्राणादिक स्वस्थता तावत मुमुक्षूनें स्वाश्रम धर्मकर्म साधनचतुष्टयादिक बलानें आत्मज्ञानार्थ अतितर पुरुषार्थ यत्न केला पाहिजे.

आपल्या शिरावर

**ऋणमोचनकर्तारः पितुः सन्ति सुतादयः**
**बन्धमोचनकर्ता तु स्वस्मादन्यो न कश्चन ॥**
**मस्तकन्यस्तभारादेर्दुःखमन्यैर्निवार्यते**
**क्षुधादिकृतदुःखं तु विना स्वेन न केन च ॥**

ऋ¹ण असेल किंवा कांहीं भार असेल, तें दुःख पुत्र मित्रादिक दूर करूं शकतात पण क्षुधादिक दुःखास स्वयत्नाविना अन्य निवारण्यास शक्त नाहीं.

**पथ्यमौषधसेवा च क्रियते येन रोगिणा**
**आरोग्यसिद्धिर्दृष्टास्य नान्यानुष्ठितकर्मणा ॥**

रोगी औषध व पथ्य स्वतः सेवन करील तरच आरोग्यता पावेल अन्याचे करण्यानें नाहीं. सारांश—

**तस्मात्सर्वप्रयत्नेन भवबंधविमुक्तये**
**स्वैरेव यत्नः कर्तव्यो रोगादाविव पंडितैः ॥**

रोगांतून मुक्त होण्यास जसा रोग्यास स्वतःच यत्न करणें योग्य तसा संसारबंध सुटण्यास विवेकी पुरुषानें स्वतःच विचार, यत्न केला पाहिजे एवं आपले विचार युक्त साधनाविना—

**पाताले भूतले स्वर्गे वने वा गिरिकंदरे**
**विचारेण विना जंतुर्नसुखं लभते क्वचित् ॥**

पाताळीं, भूतळीं, स्वर्गीं, वनीं, गिरीकपाटीं मनुष्यास आत्मज्ञान कधींच कोणत्याही उपायें प्राप्त होत नसून ज्ञानावांचून नित्य सुख नाहीं, परंतु जसा वन्ही किंचित् स्पर्शानें पेट घेतो पण स्पर्श झाला पाहिजे किंवा अंधारांतील वस्तु प्रकाशाविना प्राप्त नसून तीच दीपादिकप्रकाशें मिळते ह्मणून प्रकाशच केला पाहिजे त्याविना सर्व उपाय व्यर्थ. तद्वत् स्वहितेच्छुनें आत्मज्ञानार्थ गुरुशास्त्रमार्गें सत्यासत्य विचारच केला पाहिजे

१ कर्ज.

ह्मणून या ग्रन्थाचें नांव 'आत्मविचार' ठेविलें आहे. तृप्तीचा अनुभव भोजनाविना येत नसून, अमृतकुंडाचे पाळीवर बसला तरी पान न केलें तर व्याधी दूर न होतां अमर होणार नाहीं, हें लक्षपूर्वक अवलोकनानें ध्यानीं येईल.

सारांश स्वस्वरूप न जाणणें यासच माया अविद्या अज्ञानादिक नांव असून प्रमाद हाच मृत्यु अनेक पापादिक दुःखास मूळ आहे. ह्मणजे

**अहं ब्रह्म न जानाति धिक्तंपुरुषकीटकं**
**देहात्मबुद्धिजं पापं न तद्गोवधकोटिभिः**

मी ब्रह्मात्मा असें सदृढ यथार्थज्ञान ज्यास नाहीं त्यास कीटवत् श्रुतिशास्त्र धिक्कार करतात, कारण देहच मी या पापबुद्धीपेक्षां कोटि गोहत्यादिक पापें पण अधिक नाहींत यास्तव असे दोष येऊं न देण्याची व वेदान्तमार्गे ईश्वरप्राप्ती करूनघेण्याची ज्यांस खरी इच्छा आहे त्यांस अनुबंधप्रकरणीं सांगितल्याप्रमाणें अंतर्बाह्य[1]पवित्रत्वाची, शांतिसमाधानाची, चित्तनिर्विषयत्वादिकांची अवश्यकता आहे, त्याऐवजीं बाह्यात्कारी ठाणबंदी अश्याचें ब्रह्मचर्य काडीमात्रही कामीं येणार नाहीं तस्मात उपरोधिकपणा सोडून अंतरंग वेदान्तोपदिष्ठवर्तन ठेवून श्रवणमननाभ्यासादिक दृढतर केलें पाहिजे तरच त्यांतील सर्वप्रकार क्रमानें कळतील व परिपक्वतेनें अत्यंत सुखलाभ होणार आहे !

आत्मज्ञानसंबंधीं संस्कृतांत अनेक ग्रंथ आहेत परंतु मंदप्रज्ञमुमुक्षूचा प्रवेश नसतां अतिविस्तारभयें समजण्यास बहुत अडचण ती दूर होऊन साधकास सुलभ व्हावें या हेतूनें लघुपुस्तक महानुभवी पुरुषवाक्यसंग्रहसहाय्यानें ईश्वरप्रेरणेनें तयार केलें आहे जें साद्यंतलक्षपूर्वक अवलोकनानें थोडक्यां-

---

१ आंतबाहेर.

त ध्यानीं येऊन जिज्ञासुची चांगली समजूत व्हावी या कारणास्तव केवळ युक्तिपरदृष्टांतानें प्राकृत सरळभाषेंत प्रश्नोत्तररूपानें रचिलें आहे.

प्राकृतांतही वेदान्तविषयाचे प्राचीन अनेक ग्रन्थ उत्तम सुलभ समजूत होण्यासारखे असून कित्येकांस संस्कृताकडे फार ओढ असते परंतु गुरुमार्गहीन असून स्वतः समजण्यापुर्ती पण गती नसतां त्यांतच ट, फ, करून वेळ गमावून आपणही नीट समजले नसतात तत्रापि प्राकृत पहाणेंच नाहीं अशी व्यर्थ आढ्यता बाळगून अर्धवट असे कितीक पहाण्यांत येतात! यास्तव ज्यांस संस्कृतांत चांगली गती आहे त्यास तें योग्य उत्तम होय पण पुरें समजण्याची शक्ति नाहीं त्यानें आपले कार्याकडे लक्ष देऊन प्राकृताचा अव्हेर न केला तर त्यापासून बहुत उपयोग होईल. कारण—

अनंतशास्त्रं बहु वेदितव्य-
मल्पश्च कालो बहवश्च विघ्नाः
यत्सारभूतं तदुपासितव्यं
हंसो यथा क्षीरमिवांबुमिश्रं॥

या जगांत त्रिगुणानुरूपअनेक शास्त्रें असून तत्प्रतिपादित वस्तूही अनंत आहेत व आयुष्य तर अल्प असून त्यांत आधि व्याधि बहुत विघ्नें आहेत ह्मणून साधकानें संस्कृत प्राकृत वाद सोडून हंसवत् वेदअविरुद्ध ग्रन्थाचें सार मात्र ग्रहण करावें. ज्यांत—

सारभूतमुपासीत ज्ञानं यत्स्वार्थसाधकम्
ज्ञानानां बहुता यैषा योगविघ्नकरी मता॥

आपल्या अर्थाचें साधनभूत ज्ञान असेल त्याचीच उपासना करणें योग्य. आणि

इदं ज्ञेयमिदं ज्ञेयमिति यस्तृषितश्चरेत्
असौ कल्पसहस्रेषु न ज्ञानसुखमाप्नुयात्॥

बहुविषयक शास्त्रअवलोकनानें ज्याची मती अतृप्त त्यास कल्पांतींही ज्ञान सुख नसून चित्ताचे ऐक्यतेंत विघ्न मात्र आहे. जर थोरलोकांस यथेच्छ पंच पक्वान्नें शालदुशाले असतात ते गरीबास अप्राप्य ह्मणून त्यानें उपाशी रहावें किंवा थंडीनें मरावें कीं काय ? जें प्राप्त त्यावरच निर्वाह केला पाहिजे

**रुचीनां वैचित्र्यादृजुकुटिलनानापथजुषां**
**नृणामेको गम्यस्त्वमसिपयसामर्णव इव ॥**

समुद्रात जाऊन मिळणाऱ्या नदीनें अमक्याच मार्गी आलें पाहिजे असा कांहीं नेम नसतो तसाच ईश्वरप्राप्तीचा मार्ग आहे तथापि गुरुशास्त्रसंप्रदाययुक्त चालावें.

जर समुद्रांतील रत्नें वरच्या आडांत मिळालीं किंवा गृहसंबंधी वृक्षास कल्पतरुतुल्यफळें आलीं तर संग्रह करण्यांत प्रत्यवाय आहे कीं काय ? आयतें नवनीत मिळाल्यास मंथन आयास[1] किमर्थ ? हिरा केरांत सांपडला तथापि परीक्षक अनादर करीत नसतात. गायीचे वर्ण लाल काळ असल तरी दुधाचे गाडींत व रगात भेद नसतो. गंगा पूर्वेकडून किंवा पश्चिमेकडून आली तरी माहात्म्य सारखेंच. साखरेचें कारलें केलें ह्मणून त्यांत कटुत्व येत नसतें. सुवर्णाचें श्वान केलें ह्मणून तें मातीमोलानें जात नाहीं. परीक्षक सोनें ओळखून स्वीकार करतात तद्वत् संस्कृत प्राकृत भाषेंत अर्थ भिन्न नाहीं. यास्तव स्वहित साधण्याची ज्यांची खरी इच्छा आहे ते या बोलण्याकडे चांगलें लक्ष देतील. जसा बीजांत गुप्त असलेला वृक्षच शाखापत्रीं बाहेर स्पष्ट होतो परंतु बीजांतील वृक्षानें कोणास पोषण विश्रांति होत नसून तोच बाह्यविस्तारें अनेकांस पोषण विश्रांति उपयोगी होतो तद्वत् संस्कृत बीजरूप असून त्याचा एखाद्यास उपयोग होतो तेंच बीज प्राकृतद्वारा विस्तार पावल्यानें मंदप्रज्ञें[2] जिज्ञासु[3]

---

१ श्रम. २ मंदबुद्धि. ३ मोक्षेच्छु सत् स्वरूप जाणणे इच्छिणारा.

मुमुक्षू अधिकाऱ्यास विश्रांतिकर होत आहे. कारण अर्थरूपें संस्कृत प्राकृत एकच आहे.

जो नौका करतो तो आपण एकटाच उपभोगी होत नसून स्वतः परपार होऊन इतरांसही परतीरीं होण्यास साधनभूत उपकारी होतो तद्वत् प्राचीन कितीक महापुरुषही निरापेक्ष केवल परोपकारार्थ दयालत्वें भवनदी उतरण्यांत वेदांत शास्त्ररूप अनेक नौका स्वानुभवसिद्ध इतरांस उपयोगार्थ करून ठेवल्या आहेत ज्यांचा आश्रय करून गुरुकर्णधारयोगें अनेकसाधक पार झाले व होतात; त्याच शब्दामृतांतील वागउच्छिष्ट श्रीसद्गुरुमुखापासून मला प्राप्त झालें त्याचा इतर मुमुक्षूंस उपयोग व्हावा म्हणून त्याचे प्रेरणेनेंच या ग्रंथाची रचना झाली. वास्तव मी जडमूढ अज्ञान यःकश्चित् गांवढळ असून कोणती ही विद्या अवगत नसतां गुरुकृपेनेंच ही रचना असून माझें नांव निमित्तमात्र पुढें केलें ती सूज्ञविद्वज्जनाचे सेवेंत सादर करीत आहें. भ्रमर जसा केतकीच्या कंटकाकडे न पहातां त्यांतील सुगंधमात्र ग्रहण करतो तसें तुह्मीं यांतील न्यूनाधिकाविपर्यां क्षमा करून कृपापूर्वक अवलोकन केल्यास जसें निजबालकाचे बोबडे शब्द मिष्ट व श्राव्य होतात तसें हें माझें अप्रौढ लेखनही प्रिय होईल. ही विनंती.

**ग्रंथकर्ता.**

ह्या ग्रंथ छापतेवेळीं ह्यांतील संस्कृत भाग तपासण्याचे कामीं रा. सा. **शंकर मोरो रानडे, बी. ए.** ह्यांनीं बरेच श्रम घेतले त्याजबद्दल ग्रंथकर्ता व ग्रंथप्रकाशकही त्यांचे फार आभारी आहेत.

मु. श्रीक्षेत्र चांदोद कर्नाळी, शके १८१७.

श्री.



# आत्मविचार.

## अनुबंधन.

विषय, प्रयोजन, अधिकार, संबंध या चार प्रकरणांस अनुबंधचतुष्टय ह्मणतात, ह्मणजे ग्रन्थाचा मूळ विषय काय, त्याचें प्रयोजन (फल) काय, त्याचा अधिकारी कोण व प्रतिपाद्यप्रतिपादकसंबंध कसा हें, पूर्वी यथार्थ समजल्यावांचून वेदांतशास्त्रांत प्रवेश होत नसतो व हीं चार प्रकरणें ज्या ग्रन्थांत नाहींत त्या ग्रन्थानें संसारदुःखनिवृत्ति होत नसते ह्मणून ज्यास सर्व दुःख मुक्तत्वें निरतिशयानंदसुखप्राप्तीची खरी इच्छा असेल त्यानें हीं प्रकरणें अवश्य ध्यानीं घेऊन त्याप्रमाणें अंतर्बाह्य वर्तन ठेविलें पाहिजे.

जीव आणि ब्रह्म यांची ऐक्यता सर्व वेदान्तशास्त्रांत प्रसिद्ध आहे, तीच यांत प्रतिपादन करीत आहे. तस्मात् जीवच ब्रह्म असा या ग्रन्थाचा विषय असून याचे श्रवणादिकें ज्ञानद्वारा जन्ममरणादिकसर्वदुःखनिवृत्ति नित्य सुखप्राप्ति असें प्रयोजन आहे व विवेकवैराग्यादिकसाधनचतुष्टय-लक्षणयुक्त ब्राम्हणच याचा अधिकारी असून प्रतिपाद्य जो परब्रम्हरूप विषय तो श्रुतियुक्तिअनुभवानें हा ग्रन्थ प्रतिपादनकर्ता आहे, म्हणून या ग्रन्थाशीं व विषयाशीं प्रतिपाद्यप्रतिपादकभावरूपसंबंध आहे तो मूळ अज्ञान उपाधियोगें अंतःकरणांत आवरण[1], विक्षेप[2] असे दोष असतात,

---

१ आच्छादन. २ भ्रम.

त्यामुळें सर्व भ्रान्ती होत असून दुःखें भासतात. तें अज्ञान समूळ नष्ट झाल्यास सर्व दुःखें नाश होऊन पुन्हा उद्भव न होतां नित्यानन्दसुखप्राप्ति होते. यावरून ज्या पुरुषाचें निष्कामकर्माचरणें चित्त शुद्ध झालें व प्रपंचदुःखांतून सुटण्याची अत्यन्त उत्कटेच्छा असून साधनचतुष्टययुक्त आहे तो ज्ञानाधिकारी होय. तीं साधनें विवेक, वैराग्य, शमादिषट्क संपत्ति, मुमुक्षुत्व अशीं चार आहेत, त्यांचे प्रकारः—

ब्रम्हात्मा, अविनाशी, अचल व जगद्विशालरूपचल या सत्यासत्य विचाराचें नांवच विवेक. हा विवेकच सर्व साधनांचें मूळ आहे, विवेक असल्यानें वैराग्यादिक उत्तरसाधनें होतात. विवेकरहित उत्तरसाधनें होत नाहींत, विवेकावांचून वैराग्य, अंध व वैराग्याविना विवेक पंगु असतो. जसा मार्ग जाणत असून पाय नाहींत तो पंथ चालण्यास असमर्थ आणि पाय असून नेत्र नाहींत तोही मार्ग चालण्यास अशक्त, तस्मात् अंधाश्रयें पंगू मार्ग दाखवून पंगूचे आधारें अंध चालतो अशीच विवेक वैराग्याची सांगड असली तरच परमार्थ साधतो, यांत मी कोण, जगत काय, ईश्वर कोण कसा, सत्य काय, असत्य काय यांचा निरंतर विचार व सत्यग्राह्य असत्यत्याज्य इत्यादि नित्यानित्यवस्तुविचार म्हणजे ब्रम्हात्मा सत्य, जगज्जीवादिकमिथ्या असा दृढ निश्चय यास विवेक म्हटला आहे. वेदान्तार्थानें सकल जगत्पदार्थ मिथ्या समजून ब्रम्हादिलोकपर्यंत भोगतुच्छ जाणून जशीं मूत्रपुरिषादिकांकडे इच्छा संभवत नाहीं तशी मनापासून त्यागबुद्धि यास वैराग्य म्हणतात. शमादिषट्कसंपत्ति म्हणजे शम, दम, तितिक्षा, उपरति, श्रद्धा, समाधान अशीं सहा सांगितलीं आहेत; तीं अंतरेंद्रियमनोनिग्रह सर्व विषयपदार्थ अनित्य जाणून सदोदित विषयाकडून मन वळवून परमात्मीं ऐक्य करणें यास शम म्हणतात. ज्ञान

---

१ जोड. २ खोटे.

कर्मेंद्रियनिग्रहश्रवणाव्यतिरिक्त सर्वविषयकर्मनिवृत्ति सर्वेंद्रियांचे बहिर्व्यापार आटोपून मनासह स्थिर करणें यास दम म्हणतात. शीतोष्णादिक द्वंद्वसहन[१], सुखदुःख मनांत पण न येणें, जे काळीं जें जें प्राप्त तें तें प्रीतिद्वेषरहित भोगून सुटणें ही तितिक्षा होय. विहित[२]कर्मांचा विधियुक्त त्याग वेदान्तश्रवणादिकांवांचून अन्य सर्वकर्मसमाप्ति विषयेच्छेनें कोणतेंच कर्म न करणें, ही उपरति होय. वेद, शास्त्र, ईश्वर, गुरु, यांचे वाक्यांवर पूर्ण विश्वास, निष्कपट अंतःकरणानें भक्तिभावनिश्चय ही श्रद्धा म्हटली आहे. विषयाकडून निरंतर मनेंद्रियें आवरणें. जे जे काळीं मनेंद्रियें विषयाकडे जातील ते ते काळीं मिथ्यत्वें विषय दोषदृष्टीनें त्याग करून पुनःपुन्हा आत्मत्वीं एकनिष्ठा राखणें यास समाधान म्हणतात. अशीं सहा मिळून एक शमादिषट्कसंपत्ति होय व ब्रम्हात्मस्वरूपप्राप्ति सर्व अनर्थनिवृत्ति हें मोक्षाचें स्वरूप लक्षण आहे. तिकडे अति तीव्र इच्छा असणें यास मुमुक्षुता म्हणतात. एवं विवेकादि चार व श्रवण, मनन, निदिध्यास, तत्पद[३]त्वंपदें[४] अर्थाचें शोधन हीं चार मिळून अष्ट ज्ञानाचीं साधनें होत.

विवेकादिकाविना श्रवण बनत नसून श्रवणादिकांवांचून तत्पदत्वंपदाचें अभेद ज्ञान होत नाहीं यास्तव विवेकादिक चाऱ्हींची श्रवणांत अपेक्षा व श्रवणादिक चाऱ्हींचा ज्ञानांत उपयोग आहे आणि विवेकादिक अष्ट अंतरंग व यज्ञादि कर्में बहिरंग साधनें होत. ज्याचे श्रवणानें ज्ञान होऊन तत्काल सर्वदुःखनिवृत्तिप्रत्यक्षफल होत आहे म्हणून विवेकादिक अष्ट अंतरंगें[५] म्हटलीं आहेत; आणि ज्या क्रियारूपकर्मानें तत्काल प्रत्यक्ष फल नसून शास्त्रावरून परोक्ष स्वर्गादिक जाणण्यांत मात्र येतात अशीं यज्ञादिक कर्में चित्तशुद्धीनें ज्ञान होऊन मोक्ष अशा परंपरा क्रमानें फल देणारीं म्हणून बहिरंग[६] होत. हीं सकाम्यास संसारहेतु व निष्काम्यास

---

१ सुखदुःख. २ वेदशास्त्रांनीं अधिकाराप्रमाणें सांगितलेलें. ३ ईश्वरवाच्य.
४ जीववाचक. ५ जवळची पायरी. ६ दूरचे मार्ग.

चित्तशुद्धिहेतु तस्मात् संसारास हेतु जीं सकामकर्मै त्यांचा जो त्याग करितो तो ज्ञानाचा अधिकारी होतो.

विचारें पहातां ज्ञानाचें मुख्य अंतरंग साधन तत्वमस्यादिक महावाक्य श्रवणच होय. तें परोक्ष अपरोक्ष असें दोन प्रकारचें असून कोणी एक ब्रम्ह आहे. या ज्ञानास परोक्ष व मीच ब्रम्ह या ज्ञानास अपरोक्ष म्हणतात. त्वंब्रम्ह असें आचार्यानें उच्चारण केलेलें जें वाक्य, त्याचा श्रोत्याचे कर्णाशीं संबंध होतांच विचारानें मी ब्रम्ह आहें असें ज्ञान श्रोत्यास होतें व श्रोत्याचे कर्णाशीं संबंध झाल्यावांचून ज्ञान होत नाहीं यावरून श्रवणच ज्ञानाचा मुख्य हेतु होत आहे. यांत वेदांत वाक्याचें तात्पर्य निश्चयास श्रवण म्हटलें आहे. जसें, एक मृन्मय पात्र कळल्यावर सर्व मृन्मयाचें ज्ञान होतें तसें सर्व एक अद्वैतच असून नामरूपें जो भेद तो वाचारंभण मात्र होय. अशा दृढ निश्चयास श्रवण ह्मणतात; आणि त्वंपदवाच्यजीव, तत्पदवाच्य ईश्वर याचा शुद्ध लक्ष्यार्थीं भेद आहे वा अभेद आहे यास श्रुत जें अद्वैत त्याचे दृष्टांतयुक्तीनें चिंतन हें मननाचें रूप होय व आनात्माकार वृत्तिची व्यवधानरहित ब्रह्माकारवृत्ति ह्मणजे

**॥ इंद्रियाणांविचरतां विषयेषु स्वभावतः ।**<br>
**॥ बलादाहरणं तेषां प्रत्याहारः सउच्यते ॥**<br>
**॥ यंयं श्रृणोतिकर्णाभ्यामप्रियं प्रियमेवच ।**<br>
**॥ तंतं आत्मेतिविज्ञाय प्रत्याऽहरतियोगवित् ॥**

चक्षुश्रोत्रादिक इंद्रियें शब्दादिक विषयाकडे स्वाभाविक विचरत असतात. त्यांचे विवेकबलें नियमन प्रियाप्रिय जे विषय श्रोत्रादिक इंद्रियांस वेद्य[1] ते ते आत्मरूप जाणणें; एवं एकच वस्तुची वारंवार प्रत्त्यावृत्ति यास अभ्यास, निदिध्यास, प्रत्याहार ह्मणतात व निदिध्यासाची परिपक्वताचसमाधि ह्मणजे एकदेशविषयीं चित्ताची अखंड स्थापना यास

---

१ जाणणारे.

धारणा ह्मटली आहे व धारणायोगें ध्येयवस्तूचें तैलधारावत् अखंड अवलंबन यास ध्यान म्हटलें आहे आणि

**॥ सलिले सैंधवंयद्वत् साम्यं भजति योगतः ।**
**॥ तथात्ममनसोरैक्यं समाधिरभिधीयते ॥**

जसें जलयोगें लवण ऐक्यरूप होतें तसें ध्येय ध्याता सोडून मन आत्मत्वीं ऐक्य या नामें समाधि होय. हे श्रवणादिक असंभावना, विपरित भावना जे बुद्धीचे दोष आहेत त्यांचे नाशक असून असंभावनादिक ज्ञानास प्रतिबंधक असतात म्हणून त्यांचे नाशार्थ श्रवणादिकें अवश्य सांगितलीं आहेत.

या ज्ञानसाधनास सत्शास्त्रश्रवण, सत्समागम हेंच मुख्यत्वें होय. याविना कोणत्याही मार्गें अत्यंत दुःखनिवृत्ति, नित्य सुखप्राप्ति कधींच होत नाहीं. यास्तव आपले सुखाची खरी इच्छा आहे त्यांनीं सद्गुरुकृपाच संपादन केली पाहिजे. जे जे पुरुष कोणत्याही महत्वास प्राप्त होतात ते ते गुरुप्रसादफल असतें त्यांत ज्यापासून प्रापंचिक क्षणिक मिथ्यासुखें असे जे पितादिक गुरू तीं सर्व सुखें दुःखमिश्रित खोटीं आणि नित्यसुखसद्गुरुपासून प्राप्त ह्मणून ते सर्वांहून श्रेष्ठ समर्थ ईश्वररूप होत. ज्यास कोणतीच अपेक्षा नसून दयामात्रेंच शरणांगताची जन्ममरण बंधनें तोडतात. एवं जो

**॥ दृश्यंरूपमिदंसर्वं दृग्रूपेण विलाप्य च ।**
**॥ दृग्रूपं ब्रह्मयोर्वेक्ति सगुरुर्नेतरः पुमान् ॥**

सर्व दृश्यमात्र विश्वाचा साक्षीचे ठिकाणीं विलय करून साक्षीच तूं ब्रह्म असा बोध करून पूर्ण ज्ञानें निःसंदेह करील तोच मुख्य सद्गुरु. इतर

१ सत्यसंपादन ज्यांत ते. २ सत्यासत्य यथार्थ जाणणारे. ३ प्रत्यक्ष दिसणारे.

कान फुंकणारे, कंठी बांधणारे, शिखासूत्र काढविणारे, खंडज्ञान उपदेशून मोक्ष उधार सांगणारे हे मुख्य नव्हेत. जसा मार्ग जाणता नावाडी नदीपार करितो, न जाणणारा करूं शकत नाहीं तद्वत् पूर्णज्ञानप्रबोधशक्ति, स्वानुभवजितेंद्रिय निर्लोभता अशा गुरूचें स्वरूप ओळखून जो अनन्य होतो तो सकल दुरितदुःखापासून मुक्त होत्साता निरंतर सुखी होतो. डोळा देखणाच आहे तरी सूर्यादिक प्रकाशाविना अंध असतो, नाव नदीपार करणारी आहे तरी नावाड्यावांचून पैलतीरी करीत नाहीं, तद्वत सद्गुरुकृपाप्रसादविना सर्व साधनें निष्फळ. जसें समलजल गंगेंत येऊन मिळतांच निर्मळ गंगारूप होतें किंवा चंदनाचे संगतीनें कित्येक वृक्ष सुवासिक होतात अथवा नौकेवर जो आला त्यास जाति, कूल, नीच, उंच, बरा, वाईट न पहातां नावाडी पार करितो, तसें गुरुपदीं अनन्य त्याचे सर्वार्थ सिद्ध होतात. पण मेघोदकांत दोष नसतां जसें बीज तसा वृक्ष होऊन फळें देतो तद्वत गुरुईश्वरोपास्तीही आपल्या भक्तिभावनेप्रमाणेंच फलीभूत होत असते हें चांगलें लक्षांत ठेवावें.

एवं विवेकवैराग्यादिक साधनचतुष्टययुक्त ब्राम्हणच या ज्ञानास पात्र आहे तो श्रद्धायुक्त, विधीपूर्वक, शुद्धांतःकरणानें तनमनधनेशीं श्री गुरुपदकमलीं अनन्यशरण होऊन शंकाप्रश्नाचे विवेचनादिक उत्तरीं समाधान पावून निःसंदेहपणें परमपुरुषार्थास प्राप्त होत्साता जन्ममरणादिक सर्वदुःखरहित निरतिशयानंदसुखी कृतकृत्य होतो.

**इति अनुबंधनम्.**

---

१ अपर्ण.



# आत्मविचार.

## मंगलाचरण.

सच्चिदानंद ब्रह्मात्मा–ज्याच्या प्रकाशानें सर्व विश्व भासत आहे; ज्यांत सर्व स्थित आहे; ज्यांत सर्व लीन होतें; ज्यापासून ज्ञाता, ज्ञान, ज्ञेय; द्रष्टा, दर्शन, दृश्य; कर्ता, करण, क्रिया हीं सिद्ध होतात व ज्या आनंदसमुद्राचे कणिंगेत संपूर्ण विश्व आनंदित आहे त्या सच्चिदानंदरूप श्रीगुरु परमात्म्यास अनन्यभावें नमस्कार करितों.

## प्रश्नोत्तरें गुरुशिष्याचें–शंका समाधानरूप.

**प्रश्न**–महाराज, मी केवळ जड, मूढ, अज्ञान, अविद्यावनी, त्रि[1]विधताप जन्ममरणसंसारीं अनंतदुःखें अत्यंत भयभीत झालों आहें, तर मी कोण, कसा आणि जगत् काय, ईश्वर कोण व या दुःखोत्पत्तीचें मूळ काय आणि याची निःशेषनिवृत्ति, अक्षय सुखप्राप्ति कोणत्या उपायें कशी केव्हां होते तो प्रकार कथन करून मला ह्या भवचक्रांतून मुक्त करण्यास आपण समर्थ आहांत. मी स्वामिचरणीं अनन्यशरण आहें, आज्ञाप्रमाणें करीन, यास्तव माझा तरणोपाय कृपापूर्वक कथन केला पाहिजे.

**समाधान**–हे शिष्य, तूं त्रिका[2]लाबाधित, सच्चिदानंदब्रह्मनित्यमुक्त ज्ञानरूपच आहेस. अरे, अज्ञान तुला कळतें त्याअर्थी तूं त्याहून निराळा

---

१. अध्यात्मादि. २ भूतभविष्य वर्तमान.

अज्ञानाचा, साक्षी ज्ञानरूपच झालास. ज्ञानावांचून अज्ञान कळण्याचा संभवच नाहीं हें स्पष्टच आहे व देहादिक दृश्यमात्र सर्वजगत् असत्-जडदुःखमयमिथ्या असतां, ज्ञानाज्ञानमिश्रणानें आपलें खरें स्वरूप विसरून मी सुखी, दुःखी ही भ्रांती तूं अविचारानें आपले ठिकाणीं कल्पितोस, हें अज्ञानच सर्व दुःखाचें मूळ आहे. ह्मणून त्याचें यथार्थ विवेचंन[1] होऊन शुद्धस्वरूपज्ञान झालें पाहिजे आणि विवेचनास व्यसन[2], श्रद्धा[3], विवेकयुक्तवैराग्य दैवीसंपत्ति असली पाहिजे, तरच सर्वदुःखनिवृत्तीनें अक्षयसुख प्राप्त होणार आहे. या ब्रम्हविद्याप्राप्तीविना अन्य कोणत्याही उपायें सकलदुःखनिवृत्ति नित्यसुखप्राप्ति नाहीं.

**प्र०**—दैवीसंपत्ति वैराग्याचें रूप काय आणि सुखप्रद इहपरलोकभोग त्याग करून प्रत्यक्षकेवलदुःखपर वैराग्याचें संपादन किंनिमित्त; व त्यापासून फल काय?

**स०**—या संसृतिभ्रमण[4]चक्रनिवृत्तीस तत्कारण अज्ञान निवृत्त झालें पाहिजे. अज्ञाननिवृत्तीस यथार्थ स्वस्वरूप ज्ञान झालें पाहिजे. स्वस्वरूपज्ञानास चित्तशुद्धीची अपेक्षा असून चित्तशुद्धीस विवेकवैराग्यादिक सत्वगुणवृत्तीनें निष्काम ईश्वर गुरुप्राप्तीच मुख्य होय. जसें, नेत्र असून दीपादिक प्रकाश आहे तर सर्व वस्तु स्पष्ट कळतात, तसें शुद्धांतःकरणें अंतरंग भक्ति आहे तरच त्यास ज्ञान होतें व

**॥ यथा ज्ञानंविना मुक्तिर्नास्त्युपाय शतैरपि ।**
**॥ तथा भक्तिविना ज्ञानं नास्त्युपाय सहस्रतः ॥**
**॥ लवणेन यथा हीनं भोजनं न रसावहं । तथा ।**
**॥ भक्तिविना सर्वा सत्क्रिया निष्फलेरिता ॥**

ज्ञानाविना मुक्ति नाहीं, तसें भक्तिविना ज्ञानही नसून लवणरहित अन्न निरस[5], तद्वत अंतरंग भक्तीवांचून सर्व करणें निष्फळ म्हणजे

---

१ पृथक्करण. २ त्यावांचून चैन न पडणें. ३ निश्चय. ४ संसार. ५ बेचव.

**अश्रध्दया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत् असदित्युच्यते**

क्षमा, दया, शौच्य, श्रद्धारहित जप, तप, होम, दान, जें जें कर्म तें निर्फळ म्हणून त्यास असुरी संपत्ती म्हणतात. अशी ही भक्तीपण त्रिगुणानु-रूप त्रिप्रकारें झाली आहे. यांत भेददृष्टीनें मत्सर, हिंसादिक जारण, मारण कामनिक भक्ति, ती तामसी असून, स्वर्गादिक फलकामीं भेदभक्ति राजसी होय; आणि ईश्वरकृपार्थ किंवा पापक्षयार्थ अथवा अमुक स्वाश्रमकर्म तें अवश्य केलेंच पाहिजे या बुद्धिनें निर्हेतुभेदभावें जें कर्म केलें जातें तें सात्विक होय. या वेगळी चतुर्थ शुद्धसत्व भक्ति आहे. पैकीं श्रद्धायुक्त केवळ ईश्वरगुरुकृपार्थ निरहंकार, निर्हेतु, शमदमवैराग्यादिक सात्विक क्रियेनें भक्ति, ही दैवी संपत्ती होय. त्यावर ईश्वरकृपा होऊन शुद्धांतः-करणानें विवेकयुक्त वैराग्य प्राप्त होतें.

**ईश्वर स्तुष्यते यस्य स वैराग्यफलं लभेत् ।**

त्या विवेक वैराग्यद्वारें आत्मज्ञान होऊन निजानंद प्राप्तीनें जीव बंधांतून मुक्त होतात, ही ईश्वराची खरी देणगी होय. कारण ईश्वरानें दि-लेली वस्तु नष्ट न होतां महत्फल देतें. त्या वैराग्याची मूढ कुत्सा करून स्वर्गादिक इहपरलोकभोग आपातरमणीय, दुःखमय, नाशवंत, क्षणिक जन्ममरणाचें बीजरूप मिथ्या असतां त्याची इच्छा करतात, ते मायो-वंचित होत. ही ईश्वराची खरी देणगी नाहीं; असे जे वासनिक भक्त ते केवळ याचक असून कार्यार्थ त्यांची उपरोधिक भक्ति असते ह्मणून ते पुण्यफळ भोगांतीं नष्ट होऊन पुनरावृत्ती पावतात. यास्तव विवेकयुक्तदृढवैराग्यादिकाचें अवश्य प्रयोजन असून तद्योगें आत्मज्ञान व दृढज्ञानें अज्ञान, भ्रान्तिनिवा-रण, नित्यसुखप्राप्ति असें महदुपयोगी फल आहे.

**प्र०**—भ्रान्ति कोणत्या प्रकारें झाली व त्याचें कारण काय आहे?

**स०**—मूळ हा जीव शुद्ध सच्चिदानंद ईश्वररूप असून

---

१ सत्व रज तमगुण. २ निंदा. ३ हा लोक परलोक ४ पहाण्यासच बरें. ५ ठकलेले.

**स्वमहत्वं यथोपेक्ष्य कश्चिद्विप्रो दुरीहया ।**
**अंगीकरोति शूद्रत्वं तथा जीवत्वमीश्वरे ॥**

कोणी शुद्ध ब्राह्मण असतां मी शूद्र आहें अशी त्यास भ्रांति होते, किंवा छत्रपति राजा स्वप्नांत दरिद्री होऊन दारोदार भिक्षा मागणें कर्म करतो, यांस स्वस्वरूप स्मरण नाहीं. तावत् तें तें कर्म करून अनंत क्लेश भोगतात, तशी स्वस्वरूप अभावामुळें मी कर्ता, भोक्ता, सुखी, दुःखी इत्यादि अविवेकानें जीवास भ्रांति झाली आहे. जसें, जल स्वच्छ असून अविचारी हिरवें, काळें म्हणतात, किंवा अति थंडीनें पाणी घट्ट होऊन त्या आकारास मीठ, गारा, बर्फ, मौक्तिकादिक नामें देतात; तथापि पाण्याशिवाय दुसरा यत्किंचित् ऐवज त्यांत नसून उपाधीनें आकारभेद होऊन भिन्न-भिन्न नांवें झालीं, तरी सर्व जलच असतें. अथवा अग्नीस कोणताच आकार नसतां काष्ठादिक जशी उपाधि त्या आकारें भासतो पण तो आकार अग्नीचें रूप नव्हे म्हणून आकार मिथ्या तसें एकच अधिष्ठान आत्मत्वीं मायोपाधियोगें देहादि अनेक व्यक्त्या[1] भासतात त्या सर्व मिथ्या असें खरें तत्व न जाणतां आहे एक व म्हणतात एक. या नामरूपासच जगत्प्रपंच म्हटला आहे. तें नामरूपात्मक सर्वभास मिथ्या असतां सत्य जाणून जसा श्वान आपलेंच प्रतिबिम्ब दर्पणांत पाहून अन्य समजून भुंकतो व कष्टी होतो किंवा हत्ती आपलीच प्रतिछाया स्फटिक शिळेंत पाहून दुसरा जाणून सबल दंतप्रहारें भग्नदंत होत्साता दुःखी होतो, याचप्रकारें सर्व सृष्टी द्वैतकल्पनेनें दुःखी होत आहे, म्हणून या भ्रान्तीचें यथार्थ विवेचन झालें पाहिजे.

**प्र०**—ही भ्रान्ति दूर होण्यास काय साधन? व तें कोणत्या प्रकारें, व कसें आहे!

**स०**—प्रथम विवेकयुक्त वैराग्यादिकानें विषयवासना समूळ छेदन केली पाहिजे. पंचविषयेच्छेनेंच सकल विश्व जन्ममरणप्रवाहीं वहात आहे.

---

१ आकृति.

**कुरंगालिपतंगेभमीनास्त्वेकैकशो हताः ।**
**सर्वैर्युक्तैरनेर्थैस्तु व्याप्तस्यज्ञा कुतःसुखं ॥**

मृग शद्वश्रवणेच्छेनें मारले जातात; भ्रमर गंध ग्रहणेच्छेनें दुःखी होतात; पतंग रूपासक्तिमुळें मरण पावतात; गज स्पर्शलुब्धत्वें बंधांत पडून दुःखी होतात; मीन रसलोभास्तव मृत होतात. एवं एकैक विषयानें एकेक ग्रस्त असून ते पांचही विषय मनुष्यदेहांत एकत्र झाले; मग त्यांची दशा काय सांगावी! या विषयवासनेनेंच अखिल विश्व मोहपाशीं अडकलें असून यांत

**अजानन्माहात्म्यं पतति शलभो दीपदहने ।**
**समीनोऽप्यज्ञानाद्बडिशयुतमश्नाति पिशितं ।**
**विजानंतोऽप्येते वयमिह विपज्जालजटिलान् । ज्ञा**
**नमुंचामः कामानहह गहनो मोहमहिमा ॥**

पतंग मीनादिक त्या त्या विषयांत आपला नाश न जाणून पतन पावतात; आणि मनुष्यें तर जाणतात कीं सर्व विषय विषरूप आहेत व विषभक्षण करतो तो मृत होतो हें स्पष्टच आहे. तथापि शब्दमात्रच जाणत असून विचारचक्षुरहित असल्यानें त्या त्या विषयांत पडून जन्ममरणादिक अनंत दुःखें भोगतात. जशी स्त्री गर्भधारणकाळीं सुख मानते पण पुढें प्रसूतीच्या मरणोन्मुख यातना किंवा देहांतहि होतो अथवा वचनाग भक्षणसमयीं मिष्ट लागत असून पुढें तत्काल प्राण घेतो. जसें, मच्छ किंचित् आमिष लालुचीनें मरण पावतात, तशींच सर्वविषयसुखें प्रथम क्षणमात्र सुखावह व अंतीं केवळ दुःखप्रद असतात. म्हणजे प्राप्तींत प्रीतिद्वेष, अप्राप्तींत तृष्णा अशी शरीरांतपर्यंत दुःख देतात. जसें, मुष्टिमात्र चण्याच्या लोभानें कपी[१] बंधांत पडून परवश दारोदार फिरतात किंवा उंदीर, घुशी धान्याच्या एका कणाकरितां डोंगर उपसतात, अथवा वृषभ महिषोष्ट्रादिक नाकां

---

१ वानर.

तील रज्जूमुळें जिकडे न्यावे तिकडे निमुट चालले जातात तद्वत् वासना-रज्जूयोगें अखिल जीव आकर्षित असून अज्ञानरूप घोरतम रात्रींत अनेक कर्मरूपभार घेऊन जन्ममरणरूपनदीप्रवाहीं वहात असतां ज्ञान-सूर्य कधींच उदय होत नाहीं. तेणेंकरून अत्यंत कष्टी होत्साते कर्मप्रवाह-वेगान्वयें जलतुंबीन्यायें वर खालीं स्वर्ग नरकीं फिरतात. जसें, सूत्रांत मणी असून सूत्रचालनान्वयें खालीं वर होतात तसें विषयवासनासूत्रयोगें सर्वविश्व अधोर्ध्व भ्रमण करीत आहे व विषमिश्र अन्न पूर्वी मधुर व शेवट प्राण हरतें तसेच सर्व विषय घातक असून यांत पण

विषं विषयवैषम्यं न विषं विषमुच्यते
जन्मांतरघ्ना विषया एकदेहहरं विषं ॥

सोमलादिक उग्र विषें भक्षणानें एकच देहनाश करतात व विषय रूप विषें तर स्मरणमात्रेंच मूर्छित करीत असून वासनासंस्कारें जन्म जन्मांतरीं दुःख देतात. जसें सर्पास दुग्ध देतांही त्याचें विषच होतें तसें इंद्रियांस जों जों विषयभोग अधिक द्यावे तों तों ज्यास्त दुःखाचें साधन होत असून

नाग्निस्तृप्यति काष्ठौघैर्नापगाभिश्च सागरः ।
न कालः सर्वभूतैश्च न तृष्णा भोगसंचयैः ॥
न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति
हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ॥

वन्हि काष्ठादिकें कधींच तृप्त होत नाहीं; कितीही नद्या येवून मिळतां समुद्र तृप्त नसतो; सर्व भूतें भक्षण करूनही काळ तृप्त नाहीं; तसें तृष्णेचे भोगानें शमन होत नाहीं. तेल तूप घातल्यानें अग्नि शांत होईल काय? पण दहनीय पदार्थ संपल्यानें तोही शांत होतो. परंतु इंद्रियांस कितीही विषय-भोग मिळाले तरी तृप्ती नसून विषय कमी झाले तर अधिक प्रज्वलित होऊन

अधिक इच्छा करतात. त्या इच्छेस प्रतिबंध होईल तेथें क्रोध येतो. क्रोधा बरोबर मोह आहेच. मोहयोगें बुद्धिभ्रंश, बुद्धिनाशें अद्वातद्वा वर्तनानें नाश ह्मणजे अज्ञानानें कामवासना, तत्परिणामें क्रोध, क्रोधापासून मोह, त्यापासून नाश, एवं हाच प्रमाद. परंपरा विकारें मृत्यु. जसें चोरानें कोणी मनुष्याचे नेत्र बांधून अरण्यांत लुटून घेऊन वृक्षाशीं बांधून ठेविलें तसें या कामांदींनीं सकळ विश्व अज्ञानवनीं ज्ञानधन लुटून मोहपाशीं नेत्र बांधून दीन दुर्बळ केलें आहे. या प्रकारें मनेंद्रियें बलिष्ट असून यांचें मूळ वासनाच आहे व वासनेची उत्पत्ति विषयाचें सत्यत्व असून असत्यास सत्यत्व बुद्धि हेंच स्वस्वरूपीं अज्ञान सर्व दुःखाचें मूळ बीज होय. या अज्ञानाचें विरोधी ज्ञान एकच आहे. अन्य उपाय नाहीं, पण त्यास अवैराग्यामुळें वासना आच्छादित करते यास्तव ज्यास दुःखमय संसाराचा खरा कंटाळा आला असेल त्यानें दृढविवेकवैराग्यबळें संपूर्ण वासना त्याग केली पाहिजे. जसें समुदाययुक्त बलवान शत्रु एकटा वीर स्वल्प यत्नानें वश करण्यास असमर्थ तसें मनेंद्रियकामादिक अतिबली आहेत ते अविवेकें, क्षणिक वैराग्यें मंदयत्नानें वश होणार नाहींत, तस्मात तज्जयार्थ शमदमविवेक वैराग्यादियुक्त गुरुशास्त्रमार्गें महान पुरुषार्थ यत्न केला पाहिजे, तरच ही अज्ञान भ्रान्ति दूर होईल.

प्र०—अविवेकवैराग्य व विवेकवैराग्य लक्षण कसें आणि त्यापासून कोणता व कसा उपयोग आहे?

स०—जसा कांहीं मोठा व्यापार करण्यास आधीं मोठें भांडवल जवळ असलें पाहिजे, सराफी हुंडीच्या धंद्यास प्रथम बहुत पैसा जवळ असला पाहिजे, तसा तत्वज्ञानास साधनचतुष्टययुक्त शुद्धांतःकरणाधिकारी असला पाहिजे ह्मणजे

---

१ सतत. २ क्षमा.

**न नेमिरेवयत्रास्ति रचना तत्र कीदृशी ॥**

ज्या रथाचे चक्रास वरून लोहपट्टी नाहीं तें चक्र [1]टिकत नसतें, तद्वत् विवेकयुक्त सतत दृढ[2]वैराग्य नाहीं तेथें ज्ञानही नाहीं. तस्मात् शुद्धांतःकरण अधिकारीच विरळा. ज्यास मृत्युचें भय खरें कळून जराजन्मगर्भवासादिक दुःखें विषयदोषदृष्टीनें सर्वत्र निराशा झाली तोच खरा मुमुक्षु गुरुशास्त्रमार्गें संसारसमुद्रपार होतो. इतर अनधिकारी अंतर्यामीं विरक्ति नसतां अविवेकानें द्वेषादि कारणें किंवा देहेंद्रियपोषणार्थ उपरोधिक गुरुशिष्यरूपें बनून रजतमकामनेनें शास्त्ररीत्या सत्यासत्य त्यागात्याग यथार्थ न जाणून जगांत भोगप्रतिष्ठादिक वासनेनें अनेक प्रकारचीं सोंगें मिरवून मनःपूर्वक वर्तन करतात, तो त्यांचा बाह्यात्कारीं त्याग होय. आधींच रोग्यास कुपथ्य आवड, त्यावर तसाच अनुमोदन देणारा वैद्य, मग तो रोगी बरा कसा होणार? अर्थात ज्यास्त रोग होतो ह्मणजे

**त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः**
**कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ॥**

सर्व नाशाचें मूळ नरकद्वार भूत, मुख्य काम, क्रोध, लोभ हे तीनच असून यांचे अंतर्भूत मोहादिक असतात.

**कामकिंकरतां प्राप्य स कामी सर्वकिंकरः ॥**

या कामवासनेचा जो किंकर तो सर्व जगाचा दास नीच होतो व कामाची वृद्धि तोच लोभ त्यायोगें

**प्रातरारभ्य निद्रांतमथस्वप्नपुरेष्वपि**
**परिभ्रमति यद्विश्वं स लोभस्य पराक्रमः ॥**

प्रातरारभ्य निद्रेपर्यंत स्वप्नांतही सर्व विश्व भ्रमण करीत असतें आणि असंख्य द्रव्य जवळ असतांहि अति लोभ दुराशेनें जसें

---

१ क्वचित्. २ वैराग्य.

**निधानं यक्षसर्पाद्या यथा क्रामंति यत्नतः**
**न पिबंति न खादंति तेषांहि गुरवः शठाः ॥**

पिशाचसर्पादिक दानभोग न करितां अति यत्नें द्रव्य रक्षण करतात. त्याहूनही लोभी अति नीच शठ

**दानभोगविहीनं तु यदेवं धनिनो धनं**
**ननु तस्य मुखे धूलिर्दीयते भूमिगोपनैः ॥**

तें धन भूमींत आच्छादित करून त्याचे मुखीं धूळ घालतो ह्मणजे त्याचा भोक्ता अन्य आहे. यास्तव तें गुप्त करून आपले तोंडीं धूळ घेतो एवं

**किं किं न कुरुते पापं जनो लोभ वशं गतः**
**परिभ्रमति सर्वत्र सर्वदा सारमेयवत् ॥**

लोभवश तो काय न करील? निंद्य अपवित्र स्थळीं पण श्वानवत् सर्वदां भ्रमत राहतो. या लोभवासनेची अपूर्णता तेथें क्रोध येतो. जर

**अपकारिणि कोपश्चेत् क्रोधे कोपः कथं न ते**
**धर्मार्थकाममोक्षाणां प्रसह्य परिपंथिनि ॥**

यत्किंचित अपकाऱ्यावर अतिक्रोधाची योजना होते तर महान फलरूप धर्म, अर्थ, काम, मोक्ष यांचे जे नाशकर्ते षड्रिपु सहपरिवार शरीरांत प्रबलत्वें वागत असून, नरकग्रामीं नेणारे असतां त्यांवर क्रोधाची योजना कां करूं नये ? असे जे अविवेकी

**भयं प्रमत्तस्य वनेष्वपि स्याद्यतः स आस्ते सहषट्सपत्नैः**
**जितेंद्रियस्यात्मरतेर्बुधस्य गृहाश्रमः किं नु करोत्यवद्यं ॥**

प्रमत्त[1] अजितेंद्रिय, त्यांचा त्याग व वनवासही संसारभयाची मुक्तता करीत नाहीं व जो जितेंद्रिय सर्व विषयविरक्त, स्वात्मरत[2] तो गृहग्रामात

१ उन्मग्न. २ स्वस्वरूपरत.

पण निर्भय होतो. यावरून इंद्रियजय आहे इंद्रयजय नाहीं या दोघांसही जन वन सारखेंच झालें. विवेकी जनांत असून वनांत, अविवेकी वनांत असून जनांत आहे. या प्रकारें अविवेकी यांचे बाह्यविषय मात्र नाहींसे झाले पण अंतर्यामीं वासना प्रबल प्रतिष्ठित असते तेथें कामादिकांचें बिऱ्हाड आहेच आहे. जो संग टाकून दूर गेला त्यानें बाह्यसंग मात्र त्याग केला परंतु वासनेचा त्याग झाला नाहीं. अशी

**विषया विनिवर्तंते निराहारस्य देहिनः ॥**

आहारादिक विषयशून्य झालेल्या पुरुषाचीं इंद्रियें विषयाहून जरी परावृत्त दिसतात तरी त्याची वासना निवृत होत नसते, तीच बाधक आहे एवं बाह्य वेषानें जर मुक्ति होत असती तर नटादिक वेषधारीही मुक्त झाले असते. परंतु

**मुक्तिर्नास्ति जटाजूटे न काषाये न मुंडने**
**न भस्मनि न कंथायां न दंडे न कमंडलौ ॥**

आत्मज्ञानाविना जटाभस्मकाषायमुंडनादिकें मुक्ती नाहीं असा वेदान्त-शास्त्राचा डंका वाजत आहे. याच कारणें ही ब्रह्मविद्या अनधिकाऱ्यास न द्यावी असा प्रतिबंध आहे. जसा परीस स्वस्पर्शानें लोहास हेम करतो पण खापर घासलें तर व्यर्थ होतो; किंवा गाईस तृण देतांही दुग्ध होतें व सर्पास दुग्ध देतांही विषच होणार असा पात्रापात्रीं भेद आहे. तद्वत् ब्रह्मविद्याही होत असते. जसा रसायन देण्यास शुद्ध कोठा असलेला अधिकारी वैद्यानें पाहिला पाहिजे, नाहींतर त्या रसायनापासून उलट अपाय होतो किंवा राजदंड, फटकेमार शिक्षा, चांद्रायण व्रत प्राणायामादिक प्रायश्चित हीं तिन्ही शरीरसंबंधें असतात म्हणून औषध, दंड, प्रायश्चित्त हे अधिकाऱ्याची देशकाल अवस्था स्थिति न पाहतां योजना केली तर त्याचा विपरीत परिणाम होतो. यांत तत्वविद्या पण प्रायश्चित रूप आहे ती अनधिकाऱ्यास प्राप्त झाल्यास यथेष्टा चरणी होऊन

१ नाहींसे.

**वित्तांगनागृहसुतादिषु संप्रसक्तो**
**विज्ञानसाधनचतुष्कविवर्जितश्च**
**विक्षेपकालिमकलंकितमानसोऽप्यं-**
**कस्थो विधुं शिशुरिवेच्छति मोक्षमज्ञः ॥**

वित्त, स्त्री, गृह, सुतादिकीं [१]आसक्त, साधनचतुष्टयवर्जित कामादिकीं [२]आकृष्टचित्त, [३]उपरोधिक शिश्नोदरार्थ बाह्यवैराग्यवेष व चोरून विषयभोग अशी सदोदित विषयवासना असून गृहग्रामादिकत्यागें वनपर्वतसेवन करून तेथेंही धन स्त्री इत्यादि चिंतन करतात ते प्रपंच परमार्थ उभय भ्रष्ट होतात कारण

**लोहदारुमयैः पाशैर्दृढबद्धोपि मुच्यते**
**स्त्रीधनादिषु संसक्तो मुच्यते न कदाचन ॥**

लोह, काष्ठ, रज्वादिकपाशीं जो बद्ध तो कांहीं प्रकारें सुटतो, पण स्त्रीधनादिकवासनापाशांत आपणच बांधला गेला तो सुटत नाहीं, आणि या पंचेंद्रियांतहि

**इंद्रियाभ्यामजय्याभ्यां द्वाभ्यामेव हतं जगत्**
**अहो उपस्थजिव्हाभ्यां ब्रह्मादि मशकावधि ॥**
**द्विधा वेधा भ्रमं चक्रे कांतासु कनकेषु च**
**तासु तेष्वप्यनासक्तः साक्षाद्भर्गो नराकृतिः ॥**

जिव्होपस्थ या दोहोंनींच सकल जगत् वश्य व दीन केलें असून कांता कनक या दोन चक्रांवर समग्र विश्व भ्रमण करीत आहे

**अग्निकुंडसमा योषित् घृतकुंभसमो नरः**
**संसर्गेण विलीयेत तस्मात्तां तु परित्यजेत् ॥**

---

१ तदाकार २ विवेकवैराग्यषट्संपत्तिमुमुक्षुत्व ३ ओढलेले ४ बरवर.

एवं स्त्रीदेह केवळ अग्निरूप व घृतकुंभवत पुरूष देह होत. घृतकुंभ शतवर्षे घृतरहित पडला असतांही तो अग्नीसंपर्क झाला कीं पाझरतो तद्वत् पुरुष संसर्गानें विलीन होतात व

**नरकग्राममार्गोयं नारीदेहः प्रकीर्तितः**
**सर्वथा परिवर्ज्योसौ मोक्षमार्गयियासता ॥**

नरकग्राममार्गरूप स्त्री असून जो ज्या मार्गें चालतो तो तेथेंच जाणार हें स्पष्टच आहे. तस्मात मोक्षग्रामीं जाण्याची ज्याची खरी इच्छा आहे त्यानें नरकग्राममार्ग सोडलाच पाहिजे. यावरून मनेंद्रियें जय नाहीं त्यांचा

**किं विद्यया किं तपसा किं त्यागेन श्रुतेन किं**
**किं विविक्तेन मौनेन स्त्रीभिर्यस्य मनोहृतं ॥**

बाह्यात्कारीं त्याग, वेष, क्रियादिकपसारा. असून अंतरीं स्त्रीयादिकीं मन हरण झालें आहे ह्मणून त्याचें ज्ञान, जप, तप, मौन त्याग, श्रुत, विद्या, एकांतवास, सर्व निष्फळ. जसा वृक्षाच्या मुळांत कांहीं दोष असतो तो पत्र, पुष्पफलांतही दृष्टोत्पत्तीस येतो. तसा अंतरीं अज्ञानसमुदाय असल्यानें विषयवासना धडधडीत व बाहेर दंभदुकान हें क्षणीक वैराग्य, अनुपयोगी आणि अनेक कामेच्छा असून शास्त्रोक्त पुरुषार्थ हीन आहे. ह्मणजे श्रुति, शास्त्र, ईश्वरवाक्यावर दृढ विश्वासें तसें वर्तन करणें. हाच जीवाचा स्वधर्म. त्यानें सत्वगुणवृद्धिरूपपुण्यानें सुखभोगप्राप्ति श्रुतिशास्त्राज्ञा उल्लंघित यथेच्छ वर्तन तोच अधर्म पापरूप. त्यायोगें दुःखभोग होतात. कारण यःकश्चित् राजाचे राजसत्तेंत कोणी राहत असून राजाज्ञा भंगांत शिक्षा पावतो तर अखिलब्रह्मांडाधीश ईश्वराज्ञा अमान्य करणारा सर्वदा दुःख शिक्षा पावेल यांत काय आश्चर्य ! ह्मणून

**यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः**
**न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥**

त्यास इहपरत्र[1] कांहींच साध्य नसून सुखही नाहीं. असे जे अविचारी

**वनेपि दोषाः प्रभवंति रागिणो**
**गृहेषु पंचेंद्रियनिग्रहस्तपः ॥**

अविरक्त त्याग करतात त्यांस वासनारूप अनावर पिशाच्चिका वनांत पण बाधक आहे. जसा कोणी एका खड्ड्यांतून निघून दुसऱ्यांत पडतो तसा हा पूर्वाश्रम खड्ड्यांतून निघून अन्य वेषरूप खड्ड्यांत पडला तो वृथा एतावता

**न विरक्ता धनैस्त्यक्ता न विरक्ता दिगंबराः**
**विशेषरक्ताः स्वपदे ते विरक्ता मता मम ॥**

क्रियेंत विशेषत्व नाहीं. अंतरंगेंत फल आहे. जो स्वात्मपदीं रत तोच विरक्त. अविवेकें सर्व सोडून दिगंबर झाला तरी अज्ञान आहे, तावत् दुःख आहे ह्मणून तो त्याग यथार्थ नव्हे. कारण तस्करादिक मूर्ख कोणे समयीं देहही त्याग करितात तत्रापि तो त्याग ह्मणतां येत नाहीं. सारांश कोणी गृहस्थाचा पुत्र बाटला तर पितृधन विभागास अंतरतो तोच शुद्ध झाल्यास धनविभाग पावतो; तद्वत् सर्व सृष्टि ईश्वराची पुत्ररूपें असून विषयवासनेनें बहिष्कार झाली आहे ह्मणून पितृधन मोक्षास अंतरली ती विषयाशा सोडतो तोच गुरुशास्त्रमार्गें मोक्षाधिकारी होतो आणि या पंचविषयाकडे मनेंद्रियांचा सदैव कल[2] असतो व त्यानेंच ती बलिष्ठ आहेत यास्तव सर्व मिथ्या दृढ निश्चयें प्राप्ताप्राप्ती हर्ष खेद सोडून त्यांचे विहारस्थान जे पंचविषय ते कमी केले तर आपणच क्षीण निर्बळ होऊन

---

१ हा लोकपर लोक. २ झोंक.

नष्ट होतात. तस्मात् दुःखमय संसारांतून मुक्त होण्याची ज्यांची खरी इच्छा असेल त्यांनीं मनेंद्रियें निग्रहून कामादि संपूर्ण विषयवासना त्याग करून, गुरुशास्त्रमार्गें साधनचतुष्टयादिक अंतरंग वर्तन ठेवून प्राणांत प्रसंगींही वेदविहित मार्ग उल्लंघन न करितां आश्रमादिक बाह्याचरण असेल तर तें अति उत्तम द्विगुणित इष्टच होय; पण अंतर्यामीं नसतां बाहेर दाखिवणें तें व्यर्थ अशीं अविवेक विवेक लक्षणें असून विवेकवैराग्यादिकें सर्व विषयवासना नष्ट होऊन ज्ञानाधिकारप्राप्ति व दृढज्ञानें निजानंदसुखलाभ होत आहे.

प्र०—मनेंद्रियाचा व विषयाचा संबंध अनादि आहे ह्मणजे सतत बहिर्मुख विषयाकार रहावें अशीच त्यांची योजना आहे तर तीं निर्विषय अंतर्मुख कशीं होतील व अन्योन्यसंबंध कसा सुटतो ?

स०—मानव अविवेकानें जोंपर्यंत ज्या कृत्यांत नफा समजतात तोंपर्यंत त्यांत कितीही दुर्दशा झाली तरी परत फिरत नाहींत. तोटा समजला कीं तत्काल फिरतात तद्वत् विषयेंद्रियांचा संबंध अविचारानें आहे ते विषय-सत्य व सुखप्रद आहेत वा असत्य व दुःखप्रद आहेत आणि त्यांचा भोक्ता कोण याचा पूर्ण विचारें खचितार्थ झाल्यास धीरवान् पुरुषांचीं मनेंद्रियें अंतर्मुख होतात व नामरूपीं आसक्ति सोडल्यानें विषयाचा संबंध सुटतो. जसें सुंदर अमृतफल असून त्यावर सर्प गरळ आहे तर मरण भयानें कोणी त्यास स्पर्श करीत नसतें अथवा कोणी स्त्री अत्यंत प्रिय असतां तिचें मन परपुरुषीं आहे असें एकदां कळलें तर आमरणपर्यंत[1] असतांही पूर्व प्रेम रहात नाहीं किंवा कोणी मनुष्य विषमिश्र अन्न न जाणून निःशंक सेवन करूं लागतो पण यांत विषमिश्र आहे असें एकदां खचित कळलें तर कोणी कितीही प्रेरणा केली तरी स्वीकार करीत नाहीं असे-

१ मृत्युपर्यंत.

च विषय, मात्र विषवत् दुःखप्रद आहेत या निश्चयबळें प्राप्ताप्राप्ति जे पुरूष प्रिति, द्वेष त्याग करतात ते विषयपाशांतून मुक्त होतात. विचारें पहातां मनांत विषय विषयांत मन, असा परस्पर संबंध होऊन रागद्वेषानें ज्या ज्या क्रिया घडतात त्याच बंधास हेतू असून अविचारच त्यांचें मूळ आहे यास्तव देह प्राण मनेंद्रियादिक अचेतन केवळ जड व आत्माचैतन्य मात्र निराकार, अविकार, असंग. या प्रकारें उभयत्वीं क्रिया व भोगाचा अभाव असून अहंकारयोगें मी कर्ता, भोक्ता, मिथ्या भ्रान्ति आहे याचा पुढें विवेचन प्रसंगीं स्पष्टार्थ होईल. त्या निश्चयबळें स्वात्म्यास जो असंग अक्रिय अभोक्ता जाणतो त्यास मीपणा या अहंकारानें विषयेंद्रियाचें अन्योन्य प्रेम रहात नाहीं. तसें प्रवृत्तीकडे पहातां पण

**आयुरन्नं च वित्तं च विद्या निधनमेव च**
**पंचैतानि हि सृज्यंते गर्भस्थस्यैव देहिनः ॥**

आयुष्य, अन्न, वित्त, विद्या, मरण, लाभ, हानि, यश, अपयश, इत्यादिक पुरुषास वश नाहींत त्यास कारण अदृष्टच[1] आहे. तें संचितानुसार गर्भावस्थेपासूनच प्राण्याचे बरोबर असतां त्यांत किंचित न्यूनाधीक न होतां आपोआप तसें घडतच असतें तरी अभिमानानें सुखाची इच्छा दुःखाचा द्वेष करून अनेक कर्में आपणावर घेऊन जीव दुःख पावतात. जशीं न इच्छिता दुःखें येतात तशीं सुखेंहि येतात हें सर्वत्रांस प्रत्यक्ष अनुभवित असून विषयभोगार्थ प्रवृत्तीकडे अनेक यत्न करतात व मोक्षार्थ निवृत्तीकडे पहातच नाहींत त्यांचें आयुष्य व्यर्थ गेलें असें होत आहे. कारण जर

**अवश्यं भाविभावानां प्रतीकारो भवेद्यदि**
**तदा दुःखैर्न लिप्येरन्नलरामयुधिष्ठिराः ॥**

---

१ प्रारब्ध.

अवश्य येणारे कर्मभोग उपायानें निवृत्त होते तर नल, राम, युधिष्ठिरादिक महापुरुष दुःखी का होते ? यावरून जसा

**यद्धात्रा निजभालपट्टलिखितं दुःखं सुखं वा धनं**
**तत्प्राप्नोति मरुस्थलेऽपि नितरां मेरौ ततोनाधिकं**
**तद्धीरो भव वित्तवत्सु कृपणां वृत्तिं वृथा मा कृथाः**
**कूपे पश्य पयोनिधावपि घटो गृह्णाति तुल्यं जलं ॥**

घट, नदींत कुव्यांत समुद्रांत जेथें टाकला तेथून आपल्या परिणामाचें पोट असेल तितकेंच उदक आंत घेतो ज्यास्त घेत नाहीं. तसेंच प्रारब्धप्रमाणें सुखदुःखें घडतात हा प्रवृत्तीकडे नेमच आहे व

**पिता रत्नाकरो यस्य लक्ष्मीर्यस्य सहोदरी ॥**
**शंखो भिक्षाटनं कुर्यान्नादत्तमुपतिष्ठति ॥**

समुद्र पिता, लक्ष्मी भगिनी, चंद्र भ्राता, विष्णु शालक, शंकराचा आश्रय तरी शंख भिकारीच; तस्मात् हीन दैवानें सर्व उपाय व्यर्थ तेंच दैव उदयकाळीं अकस्मात् सर्वार्थ प्राप्त करतें. जसा

**नैवाकृतिः फलति नैव कुलं न शीलं**
**विद्यापि नैव न च यत्नकृतापि सेवा**
**भाग्यानि पूर्वतपसा किल संचितानि**
**काले फलंति पुरुषस्य यथैववृक्षाः ॥**

कोणी पुरुषानें आम्रादिक वृक्ष लावला त्याच्या त्वरीत फलप्राप्तिसाठीं अनेक उपाय केले ते सर्व वृथा होऊन ज्या काळीं तो फल देण्यास योग्य होतो तेव्हां च इच्छितांही फल देतो तसा कोणी पुरुष विद्वान कुलवान, गुणवान असून निरंतर यत्नही करीत असतो तथापि दुर्दैवें सर्व वृथा

होऊन तेंच पूर्वसंचित बीज भाग्योदयकाळीं वृक्षरूपें होऊन सुख दुःख फल देण्याची त्याची जी जशी वेळ येईल ती तशीं फलें न इच्छिता पण देणार. एवं भोगार्थ आयास निरर्थक; यास्तव विवेक्यानें सूर्योदयीं जागृती आल्यापासून निद्रेपर्यंत परलोकप्राप्तिविषयींच चिंता करावी हें योग्य. कारण इहलोकसंबंधीं सुखदुःखेंतर नेमलेलींच आहेत तीं तशीं घडणारच. मग तदर्थ आयुष्य खर्ची घालणें किमर्थ. अरे वासनायुक्त जी जी क्रिया तीच भाविजन्मास हेतु असून प्रवृत्तिचक्र भ्रमणास मूळ बीज आहे एवं

**यस्य तृष्णा न विश्रांता दारिद्र्यं तस्य वैध्रुवं ॥**

जेथें वासना तेथेंच सर्व दुःखें परंपरेनें रहात असून

**विषयाशामहापाशाद्यो विमुक्तः सुदुस्त्यजात्**
**स एव कल्पते मुक्त्यै नान्यः षट्शास्त्रवेद्यपि ॥**

या विषयाशारूप महापाशांतून जो मुक्त तोच ज्ञानद्वारें मुक्त होतो इतर महापंडित असतांही मुक्त होत नाहीं. विष जों जों अधीक वाढेल तों तों प्राणप्रयाणसमय निकट; तसें जों जों विषयवृद्धी तों तों दुःख ज्यास्त ह्मणून विचारी पुरुषास दुःखनिवृत्त्यर्थ वासनाक्षयादि उपाय करणें योग्य; त्यानें ज्ञानप्राप्ति व दृढज्ञानें मुक्तता होत आहे.

**प्र०**—संचितादिक कर्माचें रूप काय आणि जर प्रारब्धानेंच सर्व घडत आहे तर मोक्षार्थ आयासही नको कारण देहपातान्तें जें जें कर्म व भोग ते ते प्रारब्धपराधीनत्वें घडतात असें परतंत्रत्व असतां जीवास बंधमोक्ष, सुखदुःख, किन्निमित्त; जर जीव स्वतंत्र ह्मणावे तर त्यांचे इच्छे-वाचून त्यांस सुखदुःखें होतात तीं झालीं न पाहिजेत व परतंत्र ह्मटले तर

१ कारण. २ नाशपर्यंत.

त्यांस भोग घडणें न्याय नाहीं कारण पराधीन वर्ततात. कदाचित् कर्मामुळे भोग होतात ह्मणावें तर कर्मपराश्रित करतात. नाहींतर स्वतंत्र ह्मणावे लागतील व स्वतंत्र ह्मणण्यांत पूर्वोक्त विरोध येत आहे तर जीव स्वतंत्र कीं परतंत्र ?

**स०**–देहाभिमानयुक्त विषयवासनेनें अनंतजन्मी त्रिगुणात्मक जीं जीं कर्में झालीं त्यांस संचित ह्मणतात. यासच यांतून परिपक्व दशेनें सुखदुःख फलभोग देण्यास जें कर्म उदित होतें व तदनुरूप शरीरप्राप्ति होते यास प्रारब्ध ह्मटलें आहे. या वर्तमानदेहीं देहपातपर्यंत अहंकारानें जें जें कर्म सहेतु घडतें यास क्रियमाण ह्मणतात. अशी अभिमानामुळें कर्में व कर्मामुळें सर्व सृष्टि असून जे जे पुरुष कोणतेही भोग भोगतात तें तें कर्माचें फल होय यांत अशुभ कर्में पाप व दुःखभोग शुभकर्में पुण्यानें स्वर्गादि सुखभोग मिळून पुण्यक्षयें पुन्हा विपत्ति

**यावत्स्याद्गुणवैषम्यं तावन्नानात्वमात्मनः**
**नानात्वमात्मनो यावत्पारतंत्र्यंहितदेवहि ॥**
**यावदस्यास्वतंत्रत्वं तावदीश्वरतोप्ययं ॥**

यावत त्रिगुणानें नानात्वभेद व वासनेसह कर्म तावत् परतंत्रत्व शास्त्राचा दंड ईश्वरभय आहे. एवं भेदबुद्धीनें वासना आणि वासनेनें साभिमान कर्म हें स्वस्वरूप अज्ञानत्वें असतात व अज्ञान असेपर्यंत पराधीनत्वें जीवदशा असून ईश्वरनियामक आहे तो कर्माप्रमाणें फल देतो असा संचित प्रारब्धक्रियमाणकर्मांचा संबंध अज्ञानयोगें जीवास अनादि आहे यामुळें प्रारब्धभोगकाळीं परतंत्र व तदतिरिक्त काळीं स्वतंत्र आहेत ह्मणूनच विधिनिषेध वाक्यास व्यर्थत्व येत नाही आणि कोणी ह्मणेल कीं आह्मी नित्य नैमित्तिक कर्में करण्यास तत्पर असतां ज्वरादिकें परतंत्र

कां होता त्याचें उत्तर हें कीं प्रारब्धभोगास जीव, तेवढावेळ परतंत्र व भोग निवृत्तिकाळीं स्वतंत्र आहे कारण जर प्रारब्धाचें निरंतरत्व असतें तर

**सप्ताहं प्रातरस्नायी संध्याहीनस्त्रिभिर्दिनैः**
**द्वादशाहमनग्निश्च द्विजः शूद्रत्वमाप्नुयात् ॥**

सात दिवस अस्नात, तीन दिवस संध्याहीन, बारा दिवस अग्निउपासनावर्जित जो विप्र, तो शूद्रवत् होय. हा जो बोजा वेदशास्त्रांत ईश्वरानें जीवावर ठेविला आहे तो अयोग्य झाला असता. कारण निरंतर परतंत्रावर येवढा मोटा बोजा ठेवणें ईश्वराचें दयालुत्वास अनुचित. तो ठेविला यावरूनच निरंतर परतंत्रता नसून, प्रारब्धभोगकालीं मात्र परतंत्र व भोगनिवृत्तिकालीं क्रियमाण कर्मास स्वतंत्र निर्विवाद होत आहे; तसेंच ज्वरादिकें परतंत्र झालेल्या जीवास भस्माद्यन्यस्नानें[1] सांगून वेदादिनी तो बोजा दूर केला आहे. दुसरें प्रारब्ध ह्मणजे पूर्वकृतकर्म व त्याचप्रमाणें वर्तमानक्रियाकर्म घडतात, असें म्हणण्यांत क्रियमाण कर्मास कांहींच रूप उरत नाहीं आणि क्रियमाण नाहींच ह्मटलें तर पुढें परलोक व भोग नाहींसे होऊन वेदशास्त्रास बाध येतो तस्मात् सर्वच क्रियमाण प्रारब्ध परतंत्रत्वेंच घडतें असें नसून प्रथमतः कोणत्याही कर्माचे भोगारंभक, देहारंभक, आयुरारंभक, असे तीन विभाग होतात. त्याप्रमाणें सुखदुःखभोगाची व्यवस्था लागत असते; पण क्रियमाणारंभक असा चौथा भाग असल्याचा आधार शास्त्रांत आढळत नाहीं. तो असता तर क्रियमाणकर्मासही प्रारब्धपराधीनता ह्मणतां आली असती. याप्रमाणें सर्व क्रियमाणास परतंत्रता ह्मणतां येत नाहीं एवं जीव कर्म करण्यास स्वतंत्र व फलभोगास परतंत्र असें सिद्ध होतें; वस्तुतः जीवेश्वर विभाग पार-

१ भस्मस्नानादि.

मार्थिक नसून कल्पित किंवा औपाधिक आहे, यामुळें केवळ स्वतंत्र परतंत्र ह्मणतां येत नाहीं तथापि स्वस्वरूप अज्ञानामुळें, वासना, वासनेमुळें, कर्म, कर्मामुळें परतंत्रता, असें सवासना जें कर्म तेंच बंधास हेतु असतां, श्रम व्यर्थ जातो व परमार्थ यत्न निष्फळ नाहीं कारण देहादि सर्व संघ आविद्यक असून सात्विक कर्मानें पुण्योत्पत्ति राजसानें पापोत्पत्ति त्या पुण्यपापाचा सुखदुःख भोग भोगांतीं पुन्हा कर्म, असे राहाटगाडगें सतत चालत असून सर्व दुःखाचें हेंच बीज होय व ईश्वर याहून निराळा निरिच्छ, असंग आहे, म्हणून मोक्षेच्छूनें निष्कामकर्मरूप गुरुशास्त्रमार्गें विचारयत्नच केला पाहिजे. प्रारब्धानें सुखदुःख भोग घडतात परंतु मोक्षसाध्य होत नाहीं.

प्र० गुरु ईश्वर देवताप्रसादानें अप्रयासें कितीक सुखी व मुक्त झाले असे श्रवणी येतें आणि कृतकर्म भोगल्यावांचून क्षय नाहीं तदनुसार ईश्वरफल देतो व प्रेरण करितो असें श्रुति शास्त्रेंही ह्मणतात यावरून कर्माप्रमाणें जीव पराधीनच दिसतात; तर पुरुषप्रयत्न वृथाच होय.

स० गुरु ईश्वर देवतादिक प्रसाद जीवाच्या कृतयत्नानें होतात आपले यत्नाविना गुर्वादिक कोणास मुक्त, सुखी, करीत नाहींत जर अप्रयासें प्रसन्न होतें तर पशू तिर्यगादिक या सर्वांस मुक्त कां करीत नाहींत एवं विचारें पाहतां

**नादत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः**
**अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यंति जंतवः ॥**

स्वरूपलाभे पूर्णकामईश्वरास जीवांचें पुण्यपाप, सुखदुःख भोग देण्याघेण्याची इच्छा नसून दंड अनुग्रह ही विषमता पण नाहीं तर स्वअज्ञानें मोहित जीव त्यावर आळ घालतात जसा सूर्य सर्वत्र समान

असून दर्पण जलादिकांत प्रतिबिंबित होतो व शिलादिकांत प्रतिबिंबित नाहीं याचें कारण स्वच्छास्वच्छता होय. सूर्याकडे प्रीती द्वेष नसतो तसा ईश्वर सर्वी समान असून जेथें पापाचरणानें बुद्धी मलीन, तेथें ईश्वरानुग्रह नसून जेथें पुण्यरूप निर्मळता तेथें अनुग्रह दिसतो या प्रकारें अंतर्यामी ईश्वर जीवास फल देतो शिवाय सुखदुःखभोग पूर्वकर्मान्वयें अवश्य होणार असें मानलें तरी अभिमानानें कोणतेंच कर्म केलें न पाहिजे; पण तसें नसतां कांहींवेळ मी कर्ता व कोणीवेळ मी अकर्ता, ह्मणजे विषय भोगार्थ अनेक यत्नें कर्म, व मोक्षार्थ अयत्नें प्रारब्ध लावणें हें कसें बनेल ? तात्पर्य जीवास अज्ञान तावत् ईश्वर नियामक असून कर्मफल देतो व जिकडे त्याची प्रवृत्ति तिकडे तसें प्रेरण ह्मणजे बुद्धिप्रकाशित करतो त्यांत पूर्वकर्मानुरूप ज्या ज्या काळीं जे जे भोग ते ते तसे त्यास अचूक घडतात, व वर्तमानकर्माचें फल न होतां देहाहंतेनें तेंच कर्मक्रियमाणरूप होऊन संचितांत जमा होतां भावि जन्मास कारण होत असतें. आतां जीवकृत कांहींच फल होत नसून पूर्वकर्मपराधीनत्वेंच सर्व घडतें असें मानलें तर पुण्यकर्ते स्वर्गी पापकर्ते नरकी गेले न पाहिजेत आणि पुण्याचरणीं पुण्यवान सुखी पापाचरणीं पापी दुःखीच निरंतर होऊन राहतील, मग त्यांची सुटका कशी होणार परंतु असा नियम सृष्टींत व शास्त्रांत दिसत नाहीं. पुण्यात्माही दुराचरणानें पापी, दुःखी; पापीपण पुण्याचरणानें पुण्यवान, सुखी; अजामिळ वाल्मीक यांचे उदाहरणावरून अनुभवी येतात आणि पूर्वकर्म पण या जीवाचेंच केलेलें असतें, अन्याचें नाहीं. जशी सर्व प्रजा राजाची असून त्यांत कांहीं लोकांसच राजसत्तेचा अधिकार राजाकडून मिळाला असतो तेवढा ते बजावितात तद्वत् चौऱ्यांशीं लक्ष योनींतील जीवांपैकीं मनु- मात्र मोक्षसंपादनार्थ स्वतंत्रता मिळाली आहे जर त्या[१]

१ पुढें येणार.

नसती तर, आहारनिद्रादि पशुधर्मांवतच झाले, ह्मणजे पश्वादिकास ईश्वराज्ञाभंगें दंडार्थ त्या त्या योनी व कर्मभोग आहेत परंतु रागद्वेष नसल्यामुळें हिंसाद्या कर्मांत त्यांस पुण्यपाप नाहीं तशीच पाप पुण्य-संचयकर्में पण मनुष्याकडे आलीं नसतीं व त्यांची संसारांतून ही कधींच सुटका न होती. तसेंच स्वर्ग, नरक, मोक्षही न घडते; परंतु धर्माधर्मानें मोक्षादि घडतात असें असून मोक्षार्थ यत्न न करतां भोगार्थ करतात यास्तव पराधीन व दुःखी होतात. तात्पर्य अल्प अग्नीही वायुसाह्यानें वृद्धी पावतो तसे अल्प प्रारब्धही संस्कार वाढविल्यानें वृद्धिंगत होतें व तदनुसार पुण्य पापफल मिळतें

**उच्छास्त्रं शास्त्रितं चेति पौरुषं द्विविधं स्मृतं**
**तत्रोच्छास्त्रमनर्थाय परमार्थाय शास्त्रितं ॥**
**तत्कर्म यन्न बंधाय सा विद्या या विमुक्तये**
**आयासायापरं कर्म विद्यान्या शिल्पनैपुणं ॥**

यास्तव अनर्थरूप कर्म विद्या अशास्त्रीय याचा परित्याग करून बंधास हेतु नाहीं; असें जें तेंच कर्म व मुक्तीला देणारी तीच विद्या ह्मटली पाहिजे, व ग्रहण करावी. अन्य कर्म, विद्या, त्या जन्ममरण प्रवाहीं टाकणाऱ्या ह्मणून वृथा यावरून जरी पूर्वोक्त प्रकारें कर्माचें उल्लंघन करण्यास कोणी शक्त नाहीं तरी प्रबल पुरुषार्थानें उल्लंघन होऊं शकतें जसा अग्नीचा दग्ध स्वभावच आहे. हेंच प्रारब्ध कर्माचें रूप तत्रापि मणिमंत्रादिकें दग्ध करण्यास असमर्थ होतो तसेंच मणिमंत्रौषधादिकें आधिव्याधिदुःखेंही दूर होतात एवं प्रवृत्तीकडे पूर्वकर्मानुसार सुखदुःख ... घडतात त्यांचेंही निरंतरत्व नाहीं हें पूर्वीच सांगितलें आहे परंतु ... सिद्ध होत नाहीं. अरे प्रारब्ध ह्मणजे आपलाच पूर्वीचा

१ मनाचे दुःख शरीर दुःख.

केलेला सुष्ट दुष्ट वासनात्मक संस्कार होय. तो जर मलीन आहे तर दृढयत्नबलें आपणच शुद्ध केला पाहिजे. अविचारें आपला पाय चिखलांत भरला तो आपणच शुद्ध केल्यास निर्मळ होतो

**न तदस्ति जगत्कोशे शुभकर्मानुपातिनां**
**यत्पौरुषेण शुद्धेन न समासाद्यते जनैः॥**

अशी वस्तु जगांत नाहीं कीं शास्त्रोक्त यथार्थ यत्न झाल्यास साध्य न होईल. लोह पाषाणादिकपण नित्य घर्षणानें छेदन होतात. एक अति सूक्ष्म जंतु असतां ही नित्य क्रमानें महान वृक्षास भक्षून टाकतो. तद्वत शास्त्रोक्त यत्न करील व थकून सोडणार नाहीं तो इच्छित वस्तु अवश्य प्राप्त करून घेईल.

**सामान्यब्राह्मणा भूत्वा मनोभावनया किल**
**ऐंदवा ब्रह्मतां याता मनसः पश्य शक्ततां ॥**
**विश्वामित्रेण मुनिना दैवमुत्सृज्य दूरतः**
**पौरुषेणैव संप्राप्तं ब्राह्मण्यं नाम नान्यथा ॥**

सामान्य इन्दु ब्राह्मणाचे दशपुत्र पुरुषार्थ बळें दश ब्रह्मा झाले विश्वामित्रानें प्रारब्धाचा त्याग करून ब्रह्मऋषि झाला असेच ध्रुव मार्कंडेयादिक अनेक पुरुषार्थ बळें सिद्धता पावले. जसें:—

**द्वौ हुडाविव युध्येते पुरुषार्थौ समासमौ**
**प्राक्तनश्चैहिकश्चैव शाम्यत्यत्राल्पवीर्यवा**

दोन मेष परस्पर युद्ध करतात त्यांत बलवान्
प्राक्तन पूर्वकर्म पुरुषार्थ, सांप्रतकर्म या ...
जय होतो तात्पर्य.

**शुभाशुभाभ्यां मार्गाभ्यां वहंती वासनासरित्**
**पौरुषेण प्रयत्नेन योजनीयाशुभे पथि ॥**
**अशुभेषु समाविष्टं शुभेष्वेवावतारयेत्**
**स्वमनःपुरुषार्थेन बलेन बलिनां वर ॥**

वासनारूप नदी शुभाशुभ मार्गी स्वाभाविक वहात असते त्यास अदृष्टच कारण असतें असें नाहीं तो ओघ अशुभाकडून फिरविण्यास महान् यत्नच पाहिजे जसें:--

**अशुभाचालितं याति शुभं तस्मादपीतरत्**
**जंतोश्चित्तंतु शिशुवत्तस्मात्तचालयेद्बलात् ॥**

वृषभ अश्वादी दुष्ट पशु, स्वस्थानीं न येतां, आडवे तिडवे धांवतात किंवा लहान मूल भलताच छंद घेतें, ह्यांस दंड बोध, खाद्यादी, युक्तीनें योजना केल्यास सुमार्गी येतात तसेंच मनास साम, दाम, दंडभेदादि योजनेनें प्रबल पुरुषयत्न केल्यास सुमार्गी वळतें तस्मात प्रबलपुरुष प्रयत्नानें प्रारब्धादिक कर्मांचा क्षय होतो हें सिद्ध. एवं ज्यास त्यास आपलाच विचार बध्ध, मुक्त करितो अन्य कोणाचा उपाय नाहीं. जसा घोरांधकारांत बालक भयभीत होतो पण भयप्रद वस्तु तेथें कांहीं नसते तोच दीपप्रकाशें निर्भय होतो तसे अविचारानें जीव दुःखी होतात व जेथें प्रकाश तेथें अंधार रहात नसतो तद्वत जेथें विवेकविचार तेथें अविचार दुःखें रहात नाहींत यास्तव जसा सिंह स्वबलें बंद तोडून स्वच्छंद मोकळा होतो, तसें विवेकी पुरुषानें विषयाशापाश दृढ यत्नें तोडून ज्ञानार्थ [illegible] यत्न केला पाहिजे.

[illegible] काय कसें व तन्नाशें कोणता उपयोग होत आहे

[illegible]ादिक एकच रूप असून कांहीं वस्तु दिस-

[illegible]च वासनेचें रूप त्या योगें कर्मादिक

**अनात्मनि शरीरादावात्मबुद्धिस्तु या भवेत्**
**सैव माया तयैवासौ संसारः परिकल्प्यते ॥**

नामरूपात्मक देहादि सर्व वस्तु असा जड दुःखरूप आनात्मा असतां सत् व देहच आत्मा जाणणें अशी अवस्तूंत वस्तुत्वरूप सत्यत्वबुद्धी, स्वस्वरूप अज्ञानानें होत असते तीच अविद्या मायादिक नामें होय त्यायोगें अविवेकादिक प्राप्तीनें संसार होतो ही वासना यथार्थ ज्ञान विचारें निःशेष नष्ट झाली. तर जसें माळेचें सूत्र तुटतां मणी पृथक होतात तसें मनेंद्रिय विषयाचा संबंध सुटून असंग निर्बल होतात तेणेंकरून कर्म प्रवृतिचक्र भ्रमण स्थीर होऊन जीव जन्ममरणफेऱ्यांतून मुक्त होतात आणि सूर्यास मेघ [१]अंवृत करितात तद्वत आत्मज्ञानास वासनाच आवरण आहे एवं वासना आज्ञानोद्भव असून सर्व दुःखाचें मूळ स्वस्वरूप अज्ञानच आहे. ह्मणून सर्व वासनेसह मूळ अज्ञान जगत् निराश झाला पाहिजे. ह्मणजे सर्व दुःख नाशें नित्य सुख प्राप्ति असा महत उपयोग होईल.

**प्र०** मूळ अज्ञानसह जगतनिवृतीची कोणी इच्छा करीत नसून [२]अध्यात्म, अधिर्भूत, [३]अधिदैव, या त्रिविध दुःखाचा नाश मात्र सर्व इच्छितात तर या व्यतिरिक्त अज्ञान जगत्‌निवृति कीं प्रयोजन ?

**स०** अरे सकलदुःखाचे मूळ अज्ञानच आहे

**अज्ञानप्रभवं सर्वं ज्ञानेन प्रविलीयते ॥**

ह्मणजे देहादिक दृश्य मात्र सर्व मिथ्या असतां सत्य जाणणें या अज्ञानापासूनच नामरूपात्मक अखिल सृष्टीची उत्पत्ति असते; अज्ञानापासून अविवेक, अविवेकानें अभिमान, अभिमानामुळें रागद्वेषें रागद्वेष कर्म प्रवृती शुभाशुभकर्मानें पुण्य पाप, पुण्य पापफल भोगार्थ शरीरप्राप्ती

---

१ आच्छादित. २ देहापासून पीडा. व्याघ्रसर्पादिपिडा. ४ देव महादिचिपिडा.

शरीरध्यासें दुःख. असें हें प्रवृतिचक्र फिरत असून याचें मूळ अज्ञान आहे तें नष्ट झाल्याविना दुःख नाश होत नाहीं जसा कोणी वृक्ष निःशेष काढून टाकणें आहे तर त्याचें मूळच उपटलें पाहिजे मूळ ठेवून शाखा तोडल्यास पुन्हा उद्भव होतो व जसें मुळाधारें वृक्ष, स्तंभाधारें गृहें होतात तसें अज्ञानाश्रित सर्व दुःखें रहात आहेत एवं संपूर्ण दुःखाचें मूळ अज्ञान आहे तस्मात ज्यास अत्यन्त दुःखनिवृत्ति नित्य सुखप्राप्तीची खरी इच्छा आहे त्यास जगत् अज्ञान निवृतीची इच्छा संभवत असून प्रयोजन होत आहे.

**प्र०** अध्यात्मादिक तिन्ही दुःखें दूरी करण्यास शास्त्रांत मंत्र तंत्र जप, तप, दान, योग, याग, औषधादिक, उपाय सांगितले आहेत जशी भोजनानें क्षुधादुःखाची निवृत्ति, तशी आपापल्या उपायें सर्व दुःखें निवारण होतात तर मग ज्ञानापेक्षा काय कारण!

**स०** तिन्ही दुःखें नाशार्थ शास्त्रोपाय बोधन केले तथापि त्यानें सर्व दुःखें निःशेष नाश न होतां मुळांत बीजवत् गुप्त राहून समय परत्वें पुन्हा उद्भव होतात; किंवा त्या रूपें जाऊन अन्यरूपें येतात व सर्वांत मोठें दुर्निवार्य जन्ममरणरूप दुःख निवारण्यास कोणीच शक्य नाहीं. या जगांत आधिव्याधी इत्यादि अनेक प्रकारचीं दुःखें असून त्यांचा परिहार पण आहे तत्रापि सर्वच हटकून निःशेष नाश होत नाहींत पण हा भवरोग तसा नसून यावर ज्ञानौषधी विना अन्य उपायच नाहीं

**अज्ञानसर्पदष्टस्य ब्रह्मज्ञानौषधं विना**
**किमु वेदैश्च शास्त्रैश्च किमु मंत्रैः किमौषधैः ॥**
**नयोगेन न सांख्येन कर्मणा नो न विद्यया**

१ आधारें.

**ब्रह्मात्मकत्वबोधेन मोक्षः सिध्यति नान्यथा**
**न कर्मणामनुष्ठानैर्न दानैस्तपसापि वा**
**कैवल्यं लभते मर्त्यः किं तु ज्ञानेन केवलम् ॥**

देहात्मबुद्धीनें, जपतपादिकें, संसारदुःखें दूर न होतां, दुःखाचें साधन देहाभिमान मात्र ज्यास्त वृद्धी पावतो ह्मणजे ज्या रोगाची उत्पत्ती अज्ञानापासून त्यास ज्ञानौषधीवांचून अन्य क्रिया उपाय व्यर्थ जसा रज्जु अज्ञानें सर्प भासला, तो रज्जु ज्ञानाविना मंत्र, तंत्र, दंड प्रहारादिक क्रियेनें दूर होणार नाहीं किंवा सूर्य रश्मी न जाणण्यानें जलाभास होतो त्याची निवृत्ती ज्ञातव्यतेनें होते, कर्तव्यतेनें नाहीं. तशींच सर्व दुःखें अज्ञानोद्भुत असून या अज्ञानाचें मूल भ्रान्ती आहे. भ्रांतीची निवृत्ती विचारानें होते क्रियेनें नाहीं यास्तव दुःखोत्पत्तीचें साधक जें अज्ञान त्याचा नाश झाला पाहिजे तरच अशेष दुःखें दूर होऊन पुन्हा उद्भव न होतां निरंतर सुख प्राप्ती होत आहे ह्मणून ज्ञानापेक्षां कारण होय.

**प्र०** सर्वत्र पुरुष पंचविषयसुखभोगेच्छा करीत असतात व कित्येक विषयभोग त्याग करून तपारूढ असतात, ते परलोक भोगेच्छेनें असतात. एवं इह परलोक विषयभोगच सर्वत्र इच्छितात असें दिसतें. तीं विषय सुखें मोक्षांत नाहींत यास्तव मोक्ष व मोक्षाचें साधन कोणी इच्छीत नसून ज्ञानाधिकारी पण कोणी होत नाहीं असें होत आहे.

**स०** पुरुष चार प्रकारचे असतात; मुक्त, पामर, विषयी जिज्ञासु, यांत निर्वासना, निरभिमान ज्ञानामृतें, नित्य, तृप्त, ते मुक्त होत, शास्त्रसंस्कार रहित इह परलोक संबंधीं विषयभोगासक्त यत्न करणारे ते या लोकीं अतृप्त दुःखी रहात असून परलोक सुखाचें साधन करीत

२ किरण. ३ जाणण्यानें. ४ क्रियेनें. ५ अज्ञानापासून.

नाहींत; ह्मणून तेथें पण दुःखी होतात. हे केवळ पशुधर्मी पामर होत. वेदशास्त्रानुसार इहलोकसंबंधीं विषयभोग करीत असतां परलोक भोगापेक्षेनें निरंतर सकाम कर्मे करणारे ते पूर्वकर्मान्वयें यालोकीं विषयभोगें सुखी असून परलोकीं पण सांमत कर्माप्रमाणें सुख भोगतात यांस दुःखमिश्र अल्पक्षणिक सुख असतें पण देहात्मबुध्या सकाम कर्मामुळें जन्ममरण गर्भवासादि न चुकतां, संसारचक्रीं निरंतर भ्रमत राहतात. तथापि पामरापेक्षां श्रेष्ठ आहेत. हे विषयीं होत आणि उत्तम संस्कारें विषयदोषदर्शनानें ज्यास मोक्षेच्छारूपाविवेकउदय होतो, तो जिज्ञासु म्हणतो कीं गर्भवासादि मरणान्त सर्व दुःखच आहे.

**कारागृहं गर्भवासो बाल्यं केवलमूढता**
**तत्रापि दुःसहात्यंतं पराधीनतया स्थितिः ॥**

प्रथमतः गर्भवास तो कारागृहाहूनाही निंद्य, अत्यंत दुःसह, सर्वांग नाडीबंधनानें बांधलें असून जरायुवेष्टीत कर्णनासांत अमेध्य भरलेलें, जठरानल दाह, कृमिदंश, मातेच्या भक्षाभक्षानें, वातपित्तादिक पीडा; मूत्रमलादिकं अति दुर्गंधींत निवास, इत्यादि अनंत दुःखें निमूट सहन करणेंच भाग. निवारण उपायच नाहीं. व जन्माउपरांत बाल्यादिक दुःखा[illegible]स आरंभ, मूढता, पराधीनता, आपलेंच मलमूत्र आपण भक्षणें पुढें युवाव[illegible]र्थेत —

**कामबा[illegible]णव्रणैः पीडा कामिनीविरहज्वरः**
**पुष्कला पाप[illegible]संपत्तिर्यौवनं विपदां वनं ॥**

कामिनीबाणव्रणेंपीडित वि[illegible]चित्त, विरहताप, धर्मेल्लिघन, इत्यादि [illegible]तपापसंपत्तीची प्राप्ती, यावरून यौवन हें केवळ विपत्तीचें वनच

**नादासक्तं मृगं व्याधश्छिनत्ति निशितैः शरैः**
**रूपासक्तं नरं नारी रतिच्छुरिकयासकृत् ॥**

नादासक्तमृग व्याधहस्तें मृत होतो तद्वत रूपासक्तपुरुषास नारी सुरी-
त् होते. यानंतर वार्धक्यदशेंत आधि, व्याधि, निःशक्तता, कंप, दुर्गंध,
र्वगात्रशिथिलता, सर्वेंद्रियक्षीणत्व व तृष्णाक्रोधास तारुण्य, तद्योगें शरीर
ाहण्याची आशा, वित्तेच्छा, नानाभोगवासना, त्यामुळें अप्रतिष्ठा विटंबना
ाप्त होत असून—

**मृत्युः शरीरगोप्तारं वसूरक्षं वसुंधरा**
**दुश्चारिणी च हसते स्वपतिं पुत्रवत्सलं ॥**

देहरक्षकास मृत्यु, वित्तरक्षकास पृथ्वी, पुत्रलालनकरणाऱ्यास दुरा
चारिणी स्त्री, हीं हंसत असतात आणि—

**मार्गेषु मिलिताश्चोराः सख्यं तैः सहवर्धितं**
**ते गता धनमादाय पश्चाच्छोचति मंदधीः ॥**

मार्गी जातां चोरसमुदाय भेटला त्यांच्याशीं अविचारें सख्यत्व
करून संगत धरली तर तेच सर्वस्व हरतात तसेंच स्त्रीपुरुषादिक पुण्य
वित्त, हरून जातात व याचे वाट्यास दुःख मात्र येतें सारांश—

**दीर्घमायुर्जरा भुंक्ते धनं भूरि दुराधये**
**कलत्र पुत्रं दुःखाय संसारे सुखमद्भुतं ॥**

दीर्घआयुष्य हें वृध्धावस्थेंत दुःख भोगार्थच नेमिलें असतें. अन्य
कांहीं उपयोग नाहीं ह्मणजे धनवस्त्रादिरक्षणचिंता पुत्रकलत्रादिचे
दुःशब्द, दुराचरण, आधिव्याधिदुःख, अमके मृत झाले, अमके पदार्थ
नासले, हें पहात मात्र बसणें याउपर

**मरणस्य तु किं वाच्यं मृत्युदूतभयं ततः**
**नरके तु महद्दुःखं स्वर्गे पतनजं भयं ॥**

मरणदुःखास तर उपमाच नाहीं. नरकीं महद्दुःख स्वर्गीं पतनभयदुःख नंतर—

**उत्तमाधमाभावेन तत्राप्यस्ति विडंबना**
**यदि पश्वादियोनिः स्यात्तदा दुःखस्य का कथा ॥**

उत्तमाधमसंस्काराप्रमाणें अविश्रांतजन्ममरण, त्यांत पश्वादियोनीप्राप्ति, मग दुःखाचें काय वर्णन करावें

**एकतः सकला लोका विकर्षंति यथा बलं**
**पदार्थमालां बलवानेकः कालो गिलत्यसौ ॥**

एकटा काल भूतमात्रास आपणाकडे ओढीत असतो, व अखिल ब्रह्मांडांतील जीव मणिमंत्रौषधादिकउपायें आपणाकडे ओढतात, तरी बलवान काल सर्वांचा ग्रास करतो एवं;

**पुनर्जन्म पुनर्मृत्युं पुनर्दुःखं पुनर्भयं**
**न जानाति गतिं जंतुर्निमग्नो मोहसागरे ॥**

पुनः पुन्हा जन्ममृत्युभयदुःखफेरे, या मोहसागरीं निमग्नजीव किती फिरतात याचा लेखाच नाहीं. याप्रकारें विचारें पहातां संसारांत आदिमध्यावसानीः—

**शोकमोहोभयं दैन्यमाधिर्व्याधिः क्षुधा तृषा**
**इत्यादि विविधं दुःखमिति संक्षेपकीर्तनं ॥**

शोक, मोह, भय, दैन्य, आधि व्याधि, क्षुधा, तृषा, जन्ममरणादिक अनंत दुःखेंच दिसतात; प्रापंचांत सर्वसौख्याचें मूळ वित्त मानितात तरी

**अर्थानामर्जने क्लेशस्तथैव परिपालने**
**नष्टे दुःखं व्यये दुःखं धिगर्थाः क्लेशकारिणः ॥**

प्रथम वित्तप्राप्तिस्तव जो यत्न तो पापकृत्यादिक दुःखदायी, नंतर त्याचे वृद्धीचा व्यवसाय तोही दुःखद, पुढें रक्षणचिंताभय, दुःख, इतक्या उपर स्वजनदायादिक विभागार्थ कलह करतात, हेंही दुःख कदाचित् व्यय झाला तरी दुःख आणि ईश्वरपरायण धर्म नाहीं तेथें राजा, अग्नी, तस्कर, व्याधी, या द्वारें नाश, हें पण दुःख व नष्ट झाल्याची चिंतनव्यथा हेंही दुःखच याप्रकारें पुत्रकलत्रपश्वादिक कोणत्याही विषयलोभांत संपूर्ण आयुष्य वेचलें तरी तृप्ति व सुख नसून महद्दुःखी करतात अशीं सर्व विषयसुखें दुःखानें ग्रस्त असून लौकिकीं अनेक उपायांनीं पण दुःखें दूर होत नाहींत इतकेंच नाहीं पण:—

**यं भूषयंति कनकैर्वसनैश्चंदनैरपि**
**अविचारित एवायं कायो रम्यत्वमागतः ॥**

ज्या देहास्तव नानाभोग इच्छिणें ते मुळींच परके केवळ जड अमंगळ क्षणभंगुर पंचभूतपिशाच्चनिवासस्थान असतां अविचारें माझें माझें ह्मणून वस्त्रालंकार चंदनादिकें भूषित करतात, तथापि मृत्यूचें खाद्य मार्गी जात असून त्याचे आणिकही अनेक विभागी आहेत

**पित्रोः किं खलु भार्यायाः स्वामिनोग्नेः श्वगृध्रयो**
**किमात्मनः किं सुहृदामिति यो नावसीयते ॥**

१ ग्रासलल.

प्रथम माता गर्भीत धारण करते ह्मणून देह मातेचा होय पित्या-वांचून माता गर्भ धारण करण्यास असमर्थ तर देह पित्याचा झाला, भार्या सर्व जीवित वेंचून सेवेंत राहते, यास्तव देह स्त्रीचा होत आहे, पुत्र, कन्या, भ्राता, स्वजनादिक अनेकप्रकारें रंजन करतात तर देह त्यांचा होय जीविकार्थ स्वामीस देह विकला जातो म्हणून देह स्वामीचा होतो, सर्वानुमतें शेवट देह अग्नीस देतात, तर देह अग्निचा झाला; श्वान शृगालादिकांचें खाद्य आहे तस्मात् देह त्यांचापण होतो इत्यादि अनंत विभागी असून आपणही देह माझा म्हणून भोगे-च्छेनें सुखदेण्याचें ऐवजीं शरीरास सहस्त्रशः कष्टानें दुःख मात्र देतात, हें प्रत्यक्ष अनुभवीं दिसत असून अविचारानें अनेक अकृत्यें करून जन्ममरणादिक दुःखास निमंत्रण करून घेतात ते. अतिमूढच म्हटले पाहिजेत. कारण विषामिश्र आहे. असें एकदां खचीत् कळल्यावर मरण भयानें तो पदार्थ मूर्खही सेवन करीत नाहीं किंवा हें माझें सुखाचें साधन आहे की दुःखाचें आहे इतकें ज्ञान पश्वादिकांसही आहे मनु-ष्याचे हातांत धान्य खाद्य दिसलें तर जवळ येतात, कोठी दिसली तर दूर होतात, यावरून योग्यायोग्य पशूही जाणतात मग. मनुष्यास तर ज्ञान विचार स्पष्ट आहे म्हणजे

**पुण्यस्य फलमिच्छंति पुण्यं नेच्छंति मानवाः**
**फलं नेच्छंति पापस्य पापं कुर्वंति यत्नतः ॥**

सुखाचें साधन पुण्य दुःखाचें, साधन पाप हें जाणत असून सुखाची इच्छा बाळगून पुण्यकर्म करीत नाहींत, व दुःख नसावें ही इच्छा ठेवून पापकर्म यत्नानें करतात, या प्रकारें जो देहेंद्रिय पटु असतांही मी जे कर्म करतों हें साधन सुखाचें आहे. वा दुःखाचें आहे; असा विचार न करील तो आपणच आपला वैरी होय जिवंतसर्प हातीं

धरणें कोणाचेंही मनीं येत नसतें कारण, पुढें अचूक मृत्यु दिसतो असेच सर्व विषय घातक.

**ज्ञात्वाप्यत्यंतवैरस्य यः पदार्थेषु मूढधीः**
**बध्नाति भावनां भूयो नरो नासौ स गर्दभः ॥**

शत्रुरूप जाणत असतां त्यांत आसक्त होतो, त्यास विषयलंपटसमानत्वें द्विपादगर्दभच ह्मटलें पाहिजे. जसें ज्वरितास व सर्पविषचढलेल्यास गोड पदार्थ कडू व कडूपदार्थ गोड लागतो, तसें अज्ञान व्याधीमुळें विषयांधास कडूविषय गोड व गोडपरमार्थ कडू लागतो एवं गर्भवासादि मरणांत सर्व दुःखच असतां यांत सकल दुःखाचें मूळ देहाभिमान आहे संपूर्ण शरीरें पुण्यपापमिश्रणानें उत्पन्न होतात त्यांत

**शुभैराप्नोति देवत्वं निषिद्धैर्नारकीं गतिं**
**उभाभ्यां पुण्यपापाभ्यां मानुष्यं लभते वशः ॥**

शुभकर्मे देवत्व. निषिद्धें नीचगति, पुण्यपापसमत्वें मनुष्यत्व, एवं मानव शरीरें समानपुण्यपापात्मक व इतर न्यूनाधिकें असतात जर केवल पुण्यकर्मफलाचींच देवशरीरें असतीं तर त्यांस जें दुःख होत असतें तें झालें नसतें पण स्वर्गीही शारीरदुःखें नसून स्पर्धा असूया पतनभयादिक, मानसिक दुःखें आहेत; तर स्वर्ग हा एक इहलोकवत पुण्यफलभोग देण्याचा बंदीखानाच होय असें झालें यावरून पापन्युन पुण्याधिकें देवशरीरें असतात, असें स्पष्ट होतें आणि तिर्यगादि नीच योनीची शरीरेंही मिश्र पुण्यपापयुक्त अधिकपापाचीं असतात; जें त्यांस पश्वादि योनिरूप प्रसिद्ध दुःख तें पापाचें फल व मैथुनादिक सुख पुण्यफल होय या प्रकारें सकल शरीरें पुण्यपापभोग निमित्त उत्पन्न होत असतात असे यावत अज्ञान

तावत् शुभाशुभकर्म व तज्जन्य पुण्यपाप निवृत्ती नसून पुण्यपाप असे पर्यंत देहोत्पत्तिविनाश होणें चुकत नाहीं, आणि राग द्वेष असे पर्यंत कर्मे होत असून ती राग द्वेष अज्ञान जनित आहेत एवं सर्व दुःखाचें बीज अज्ञान आहे कारण सकल प्रपंच व त्याचें सत्यत्व ज्ञान भान अज्ञानकालींच असतें जसें स्वप्न जग जोपर्यंत दिसतें व जागृती नसेपर्यंत तें आपणाहून भिन्न व सत्यच वाटतें तसें स्वस्वरूप अज्ञानही स्वप्नवत आहे त्यांतून ज्ञान जागृती नसेपर्यंत सर्व सत्यत्वें इहपरलोक दुःखें सुटत नाहींत तात्पर्य अज्ञानामुळें मनेंद्रियें विषयाकडे साहजीक जातात ह्मणजे विषयाकार होणें हे त्यांचे स्वाभाविक धर्मच होत यास प्रारब्धच कारण असतें असें सदोदीत नाहीं. ते मनेंद्रियें अविचाऱ्यास देहक्रियेकडे अधिक ओढून नेतात यास्तव विवेकानें त्यांचें आकलन करून निःशेष अज्ञान नाश करून सतत स्वस्वरुपाकार राहिलें पाहिजें हेंच सर्वांत उत्तम श्रेष्ट सुख असा ज्यास विवेक होतो तोच जिज्ञासु, वैराग्यशील, मुमुक्षु, ज्ञानाधिकारी होय असें स्पष्ट होत आहे शिवाय सर्वत्र जर विषयसुखच इच्छितात ह्मणावें तर सुषुप्तिसुखाची इच्छा कोणास झाली न पाहिजे कारण सुषुप्तींत कोणताच विषय नाहीं; यावरून विषयवृत्तीरहित जें सुख तेंच निरतिशयानंदरूपसत्य; आणि सर्वत्र पुरूष पण अत्यंत सुखाची इच्छा करितात तस्मात् सर्वत्र पुरूष आत्मलाभ नित्य सुखच इच्छितात असें होत आहे.

**प्र०** निरंतरसुखप्राप्तीस व अत्यंतदुःखनिवृत्तीस काय साधन, कितीप्रकारें, कसें आहे.

**स०** अत्यंतसुखप्राप्तीस व अत्यंतदुःखनिवृत्तीस मूळ दोनच मार्ग सांख्ययोग, ( ज्ञानकर्म ) असें आहे

**द्वौ क्रमौ चित्तनाशस्य योगो ज्ञानं च राघव**
**योगो वृत्तिनिरोधो हि ज्ञानं सम्यगवेक्षणम् ॥**

विवेकविचारें आपण आपल्या स्वरूपास गुरु शास्त्रमार्गें यथार्थ जाणून, देहाध्यास सोडून, चित्ताचें जें अखंड समाधान, त्यास ज्ञान ह्मणतात; आणि चित्तांतःकरणेंद्रियांचा बलात्कारें रोध, निर्विषय करणें, त्याबद्दल जी जी क्रिया, त्यास कर्म ह्मटलें आहे. ह्मणजेः—

**सुखदुःखप्रदो नान्यः पुरुषस्यात्मविभ्रमः ॥**

सर्व दुःखास मूळ पुरुषाचा मनोभ्रमच आहे.

**समाहितं यस्य मनः प्रशांतं ॥**
**दानादिभिः किं वद तस्य कृत्यं ॥**
**असंयतं यस्य मनोविनश्ये-॥**
**द्दानादिभिः श्रेदपरं किमेभिः ॥**

जर विवेकविचारें मन शांत आहे, तर जप, तप, व्रत, दानादिकांत विशेषत्व काय? जर वासनेनें मनादिक दुश्चित आहेत तर सर्व करूनही निष्फळ. वस्तुतः

**दानं स्वधर्मो नियमो यमश्च ॥**
**कृतानि कर्माणि च सद्व्रतानि ॥**
**सर्वे मनोनिग्रहलक्षणायाः ॥**
**परो हि योगो मनसः समाधिः ॥**

दान, धर्म, यम, नियम, जप, तप, व्रतादिक सर्वांचें सार मनोनिग्रह होय. एवं निर्वासन मन झाल्यास स्थिरविचारें आत्मज्ञान व दृढज्ञानें सर्व दुःख

निवृति होते. या अंतःकरणेंद्रियेंजयास पूर्वोक्त दोनच मार्ग असून ज्ञानास विहंगममार्ग व कर्मास पिपिलीका मार्ग ह्मणतात. जसा पक्षी वृक्षाग्रीं फल अवलोकन करून एक भरारीसरसा त्याजवळ जाऊन फलप्राप्त करितो, तसें सामर्थ्य पिपीलिकेस नाहीं. तथापि अनुसंधानुक्रमानें फळ पावते किंवा सशक्तपुरुष दूर अंतरावरील ग्रामीं सत्वर जातो व अशक्त हळु हळु पण जातो, तद्वत तीव्रप्रज्ञ सद्गुरुवाक्य श्रवणाबरोबर तत्काल ज्ञान आकलन करून प्रकृतीचे सर्व धर्म सोडणारा त्वरितमोक्षफळ प्राप्त करितो; व मंदप्रज्ञ रजतमक्षयें सत्ववृद्धीनें, निष्काम कर्माचरणें, तत्ववि-वेचनादिक्रमानें, ज्ञान व मोक्ष पावतो; असें ज्ञान कर्म दोन्ही मार्ग एकेच कारणीं असून अधिकारभेदें भेद आहे. यास्तव मोक्षेच्छूनें स्वाधिकार विचारून तसें वर्तलें असतां, निःशेष दुःखनाशें अखंड सुख प्राप्ती होत आहे.

**प्र०** निरंतर सुखरूपमोक्षप्राप्तीस वेदशास्त्रांत कर्म, उपासना, ज्ञान, असे मार्ग सांगितले आहेत, व आपण दोनच सांगितले याचें कारण काय आणि यांत स्वल्पायास व श्रेष्ठ कोणता आहे.

**स०** मुख्यत्वें ज्ञान व कर्म असे दोनच मार्ग असून कर्माचे अंतर्गत उपासनाभेद अधिकारपरत्वें झाला आहे ह्मणजे विषयाशापाश तुटल्याविना जीव दुःखमुक्त होणार नाहींत. ते विषय एकाएकीं सुटणें दुर्घट, यास्तव हळु हळु अंतरंगता होऊन विषय सोडण्यास वेदशास्त्रानें अनेक मार्ग प्रकाशित केले. जसें सूर्योदयीं बहुत मार्ग दिसूं लागतात; त्यांत जो ज्यास चालण्यास उचित तो त्या मार्गी चालता होतो, तसें जीव आपला अधि-कार विचारून त्या मार्गी चालतील तर क्रमानें मुक्त होतील असें वेदा-

१ जिंकण्यास. २ मुंगि

दिकांचें तात्पर्य आहे. यांत ज्ञानमार्ग स्वल्पायास व श्रेष्ठ आहे, परंतु त्यास चित्तशुद्धीची अपेक्षा असून चित्तशुद्धीचें साधन जी निष्काम-क्रिया यासच कर्म ह्मटलें आहे. आणि उपासना पण त्यांचे अंतर्गत मानसिककर्मच होय. ह्मणजे मूर्तिपूजक व मूर्तिनिषेधक दोन्ही कल्पितच आहेत. मूर्तिपूजक कल्पनेंप्रमाणें मूर्ति करितात व मूर्तिनिषेधक नुस्त्या कल्पनेवरच आपलें काम भागवितात यांत फरक तो काय? अज्ञान आहे तावत दोन्हीही सारखेच; परंतु दोन्ही कल्पनेस जे अधिष्ठान तें निर्गुणरूप मन वाणचिक्षुरादिकास अग्राह्य यास्तव सगुण अवताररूपाची उपासना प्रथम सांगितली आहे. यास्तव व्यक्ताव्यक्त[१] सर्व एकच परब्रह्म असून निराकार, व साकाराचा सत्य, मिथ्या, मात्र भेद आहे, साकार परिछिन्न अल्पमिथ्या असतां भेदबुद्धीनें त्याचे अर्चक परिछिन्न अल्प फल पावतात. तथापि दोन्ही रूपें कळल्याविना ब्रह्मज्ञान होतच नाहीं, ह्मणून साधकास आरंभीं सगुण साकारच मुख्य होय. त्यांत निष्कामकर्में चित्तशुद्धी व कर्म भोगांतीं व्यर्थ; एवं सगुण निर्गुण एकच जाणून बुद्धीमान निराकारी एकाएकीं मन स्थिर होणें दुर्घट, यास्तव प्रथम साकार उपासना मार्गें निर्गुण निराकारीं येऊन मिळतात. असे ज्ञान व कर्म असे दोनच मार्ग मुख्य आहेत.

**प्र०** मोक्षेच्छूस नित्यनैमित्तिक, प्रायश्चित, काम्य, अशीं कर्में शास्त्रांत सांगितलीं आहेत, तीं करशीं आणि नित्यनैमित्तिक कर्में झाल्यांत पुण्य नसून, न झाल्यांत पाप आहे. यास्तव पापाचें अनुद्भवाकरितां नित्यनैमित्तिकें केलीं पाहिजे. त्यांत तें पुण्य पाप सम होऊन मोक्ष होतो तर मोक्षेच्छूनें कर्मेंच करावीं, ज्ञानापेक्षां कारण नाहीं.

---

१ साकारनिराकार.

**स०** मोक्षादिकसुखेच्छूस वेदशास्त्रांत विहित, निषिध, मिळून

**अथातो धर्मजिज्ञासा धर्मः प्रोक्तः श्चतुर्विधः**
**नित्यो नैमित्तिकः काम्यः प्रायश्चित्तमिति क्रमात् ॥**

चतुर्विध कर्में सांगितलीं आहेत. यांत नित्यनैमित्तिक प्रायश्चित हीं विहित असून काम्य हेच निषिध ( काम्य वृद्धिनेच निषिद्ध होते ) यांत

**वर्णाश्रमसमाचाराः शौचस्नानादयश्च ये**
**आवश्यकास्तेनित्याः स्युरकृत्वा प्रत्यवैति यान् ॥**

ज्या ज्या वर्णाश्रमास उचित अंतर्बाह्य शौच, स्नान, संध्या, जप, अग्निहोत्रादिक जें कर्म तें न झाल्यास प्रत्यवाय आहे आणि सदोदित ज्याचें विधान हीं नित्य कर्में होत, व

**देशकालनिमित्ता ये ते तु नैमित्तिकाः स्मृताः**
**संक्रांतिग्रहणस्नानदानश्राद्धजपादयः ॥**

देश, काल, निमित्त, विधान, ग्रहण, संक्रांति, श्राद्धादिक, हीं नैमित्तिक कर्में ह्मणतात, आणि

**प्रायश्चित्तात्मका धर्माः कृच्छ्रचांद्रायणादयः**
**कामनापूर्वकं काम्यं मुमुक्षोर्न विधीयते ॥**

पापक्षयास विधानकर्म प्रायश्चित असून, फलानिमित्त विधानकर्म काम्य होय, हीं कर्में अज्ञानतावत् देहाहंतेनें करण्यांत सकामीस स्वर्गादिक फल व निष्कामीस चित्तशुद्धिफल देतात; पण जन्ममरण अभाव होत

---

१ नहाणें.

नाहीं. आणि जर नित्यनैमित्तिक न झाल्यांत पाप आहे तर त्या पापाची अनुत्पत्ती हेंच त्यांचें पुण्यरूपफल स्पष्टच आहे व पुण्य पाप अवशेष तावत् देहारंभक होतात, याकरितां मलिनांतःकरणें विवेकउदय नाहीं तावत् स्वाश्रमोचित नित्य नैमित्तिक निष्कामकर्में ईश्वरार्पित अगत्य करावीं, त्यानें चित्तशुद्धि होऊन ज्ञानाधिकार व ज्ञानानें मुक्ति होते. समान पुण्य पापें, मनुष्य देह येतो, तेथें विचार झाला तर ज्ञानानें मुक्तता होते. ज्ञानाविना केवळ कर्मानें मोक्ष नाहीं. कारण—

**अविरोधितया कर्म नाविद्यां विनिवर्तयेत्**
**विद्याऽविद्यां निहंत्येव तेजस्तिमिरसंघवत् ॥**

अविद्येचा व कर्माचा अविरोध आहे, ह्मणजे अविद्येपासूनच कर्में जन्म पावलीं, त्या कर्मानें अविद्या नष्ट कशी होणार ! अरे जेथें प्रकाश तेथें अंधार रहात नाहीं, तद्वत ज्ञान व कर्माचा विरोध आहे ह्मणून विद्येनेंच अविद्या व तदाश्रित कर्में नाश होतात ती विद्या—

**नागमेन न योगेन न व्रतेन जपेन च**
**विचारेण विना जातु दृश्यते हृदि योप्यजः ॥**

विचारावांचून वेदपाठ, योग, याग, जप, तप, व्रत, दानादिक कर्मानें कालत्रयीं प्राप्त नसून ज्ञानाभावें अज्ञान असेपर्यंत दुःखें दूर न होतां मुक्ती नाहीं. तस्मात् अविद्या ( अज्ञान ) नाशार्थ विद्या [ ज्ञान ] अवश्य संपादन केलें पाहिजे. यास्तव ज्ञानाची अपेक्षा वटत आहे.

**प्र०** दंडप्रहारकर्मानें घटनाशफल; वस्त्रक्षालनकर्मानें मलनाशफल, प्रत्यक्ष होत आहे. याचप्रकारें स्वाश्रमधर्मकर्मानें सकल दुरित दुःखें नष्ट होऊन मुक्ती संभवत आहे.

**स०** दंडप्रहारें घटनाशफल आत्मत्वीं संभवत नाहीं, कारण नाश अज्ञानाचा कर्ता आहे. अज्ञान ही कांहीं वस्तु नसून भ्रांती आहे. भ्रांती निवृती विचारानें होते क्रियेनें नाहीं. रज्जूवर सर्प स्तंभावर तस्कर भ्रम झाला तो दूर करण्यास दंडशास्त्र घातक्रिया वृथा असून दीपप्रकाशें रज्जू, स्तंभ यांचें ज्ञान होतांच, याचें भय, दुःख नष्ट होतें. तशी अज्ञान, भ्रांती अविचारानें आहे; त्यामुळें कर्मादिक दुःखें उत्पन्न झालीं. या अज्ञानाचें विरोधी ज्ञान [ विचारच ] मुख्य आहे, परंतु जशी

**दंडचक्राद्यभावेन यथा नोत्पद्यते घटः**
**न विवेकाद्यभावेन तथा ज्ञानं प्रजायते ॥**
**नोत्पद्यते विना ज्ञानं विचारेणान्यसाधनैः**
**यथा पदार्थभानं हि प्रकाशेन विना क्वचित् ॥**

दंड चक्रादि अभावें घटोत्पत्ती नाहीं, तशी विवेकवैराग्याभावें ज्ञानप्राप्ती नाहीं; जसा अंधारांतील पदार्थ प्रकाशाविना प्राप्त नाहीं, तोच प्रकाशानें प्राप्त, तसा आत्मज्ञानार्थ विचारच केला पाहिजे. आतां मलक्षालन कर्महीं आत्मत्वीं असंभव. आत्मा सदा शुद्ध, अमल, बोधरूप, स्वप्रकाश आहे; तथापि जसा मलिन आरसा असल्यास मुखाभास होत नाहीं किंवा चक्षूस रोग असल्यास सूर्य प्रत्यक्ष असून दिसत नाहीं, तो, आरसा निर्मळ केला अथवा रोग निवृत्त झाला तर स्पष्ट दिसतें, तसें अज्ञानावरणानें स्वस्वरूप आच्छादित आहे तें, तें आवरण दूर झाल्यास स्पष्ट होतें. यास्तव आवरण दूर करण्यास चित्तशुद्धीची अपेक्षा व चित्तशुद्धीस निष्काम कर्मोपासनाच मुख्य होय. आणि चित्तशुद्धी नंतरही, पदार्थज्ञान नाहीं, तो, भांबावतो ह्मणजे घट आण, या शब्दानें जर घट शब्दाची व घटअर्थाची माहिती नाहीं, तर तो भांबावतो तद्वत

पदपदार्थ माहिती नाहीं त्यास तत्वज्ञान होत नाहीं, यासच प्रतिबंध ह्मणतात. म्हणून प्रथम देहेंद्रियें मन, बुद्धी, चित्ताहंकारादिकांचें यथार्थ ज्ञान संपादन करून गुरुशास्त्रमार्गें तत्पद त्वंपदाचें[1] विवेचन केलें पाहिजे, त्यानेंच अज्ञाननाशें दृढज्ञान मुक्ती होते, केवल कर्मानें मुक्तता नाहीं.

**प्र०** महाराज प्रमादानें निषिद्धकर्म झालीं असतील तो दोष दूरीकरण्यास शास्त्रांत प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत, यांत ज्ञातपाप निवारणार्थ जें विधान बोधन केलें, तें असाधारण व जन्मांतरचे अज्ञात पापक्षयास जें विधान तें साधारण प्रायश्चित होय, पैकीं गंगादि महातीर्थस्नान, ईश्वरनामजप, हीं साधारण प्रायश्चित्तें होत, हीं केवळ प्रायश्चित्तें नसून काम्य व प्रायश्चितरूप आहेत. जसा अश्वमेध ब्रह्महत्यादिक दोष दूर करून स्वर्गफल देतो, तद्वत ईश्वरनामादिक साधारण प्रायश्चितानें सर्व पापक्षयें मोक्ष होत आहे, ह्मणून मुमुक्षूनें कर्मच करावीं ज्ञानाचें कारण नाहीं.

**स०** अनेक जन्मार्जित अनंत संचित कर्में एक जन्मांत नाश करण्यास प्रायश्चित समर्थ नाहीं, कारण जीवास अज्ञान तावत् पुण्यपापात्मक कर्में पृथक् पृथक् रहात असून भिन्न भिन्न भोगफलें देतात. एकेकाचा नाश करीत नाहींत, जर एकेकाचा नाश करीतीं तर पुण्य किंवा पाप एकच शेष राहिलें असतें, व एक राहण्यात शरीर परिग्रह नसून, सुखदुःख दोन्ही भोग, पुण्य पाप फलें झाले न पाहिजेत. नहुष राजा देह पातांतीं स्वर्गी गेल्यावर यमधर्मानें त्यास विचारलें, प्रथम तूं पुण्यफल भोगणार किंवा पापफल भोगणार, नहुषानें उत्तर केलें मी असंख्य पुण्य केलें असून पाप कोठें कसें राहील? धर्म राज ह्मणाले देहाहंतेनें सकाम पुण्यपापात्मक जें जें कर्म तें तें अज्ञान, तावत् पृथक् असून, त्याचें फल भोगते ते, भोगलेच

१ जीवईश्वराचे.

पाहिजे. यावरून जसें मोक्षास पाप प्रतिबंधक ह्मणून सकाम पुण्यही पापरूपच होय, परंतु त्यास पुण्य कां ह्मटलें? तर—

**काम्ये हि शुद्धिरस्त्येव भोगसिद्ध्यर्थमेव सा**
**विड्वराहादिदेहेन नश्यैंद्रं भुज्यते फलं ॥**

काम्यकर्मानें जें पुण्य तें भोगसिद्ध्यर्थ असतें, कारण विड्वराहादिक निंद्य देहानें. स्वर्गादिक उत्तम भोग प्राप्त होणें अयोग्य, तर देह पण चांगला पाहिजे; यास्तव काम्यरूप पुण्यानें उत्तम देह व भोग मिळतात. परंतु तें पुण्य व भोग अंतीं नष्ट होतात, ह्मणून बंधरूप असून चित्तशुद्धि फल नसतां ज्ञानास निरुपयोग अशीं, पुण्य पापकर्में ज्ञानाभावें अवशिष्ट, तोंपर्यंत जन्ममृत्यू दुःखनाश होत नाहींत. आणि गंगास्नानादिक प्रायश्चित पण चित्त शुद्धिद्वारा ज्ञानाचेंच साधन आहे, अविचाऱ्यास भोगफल व विचाऱ्यास चित्तशुद्धिफल एवं ज्ञानास चित्तशुद्धीची अपेक्षा आहे, त्या चित्तशुद्धीस ईश्वरार्पित निष्कामकर्मेंच मुख्य होत, त्यामुळें संचित पापकर्में दग्ध होऊन पुण्यकर्म फल हीं ईश्वरार्पित ह्मणून कर्त्याकडे न येतां, पाप पुण्य दोन्हीं जाऊन चित्तशुद्धि फल होत आहे, व चित्तशुद्धीनें ज्ञान आणि दृढज्ञानें मोक्ष; सारांश अविद्यक स्वर्गादिक सुखप्राप्त झालें. तथापि पुण्यक्षयें पुन्हा निपत्ती येणार, कारण दुःखाचें मूळ अज्ञान नष्ट झालें नाहीं, शिवाय कर्मांत देश, काल, द्रव्य, विधान व श्रद्धादिकांची अपेक्षा आहे. तसें न झाल्यास निष्फल किंवा विपरीत फल होतें. तशी ज्ञानांत कोणतीच अपेक्षा नसून तत्काल पुण्यपापात्मक सर्व कर्में निवृत्त होऊन परत उद्भव न होतां मुक्ती होत आहे ह्मणून विवेकी पुरुषास ज्ञानच साध्य केलें पाहिजे.

**प्र०** जन्मांतर संचितांतील फलोन्मुख झालें तर, जें वर्तमान शरीरारंभक कर्म तें प्रारब्ध भोगानें निवृत्त होतें. आणि संचितकाम्यापैकीं जसा कोणी

पुरुष धनप्राप्त्यर्थ एखाद्या धनवानाचे आर्जव करितो तितक्यांत आपलें कार्य अन्य मार्गें निर्वृत झालें तर तो पुन्हः याचना करीत नसतां त्यास तो अर्थ प्राप्त होत नाहीं. तशी काम्यकर्मे इच्छेच्या अभावें नाश होऊन शेष संचितें, साधारण प्रायश्चित्तानें लयास जातात व वर्तमानकाळीं जीं नित्य नैमित्तिक क्रियमानकर्मे घडतील तीं भावीजन्मास कारण होत नसतां वर्तमानपापाचा नाश करितात एवं संचित प्रारब्ध क्रियमाण हीं तिन्हीं कर्मेच नष्ट झालीं तर देहोत्पत्तिस कारणच राहिलें नाहीं ह्मणून अनायासें मुक्ती. अशीं कर्मे करून मुक्तता संभवत आहे.

स०—जन्मांतर संचित कर्मांतून परिपक्वतेनें फल देण्यास प्राप्त झालें जें प्रारब्धरूप वर्तमानशरीर तें भोगांतीं निवृत्त होतें हें सत्य परंतु अनेक जन्मार्जित संचित इच्छेच्या अभावें किंवा प्रायश्चित्तानें एक जन्मांत निशेष नाश होत नाहींत. जर इच्छेच्या अभावें संचित कर्में नष्ट होत असतीं तर अशुभ कर्माचें फल कोणास झालें नसतें कारण अशुभ कर्मानें पाप होत असतें त्याचें फल दुःख आहे, दुःखाची कोणीच इच्छा करीत नसतात तत्रापि भोग चुकत नाहीं ह्मणजे

॥ सुकृतैः सुखमायाति दुःखमायाति दुष्कृतैः ॥

कर्मरूप बीजांतून वासना अदृष्ट असे दोन अंकुर उद्भवतात यांत शुभ कर्मामुळें शुभवासना व धर्मरूप अंकुर निघतो त्याणें शुभ कर्माकडे प्रवृत्ति होऊन पुण्ययोगें सुखभोग होतो. अशुभ कर्मानें अशुभ वासना व अधर्मरूप अंकुर निघून अशुभ कर्म प्रवृत्तीनें पापामुळें दुःखभोग घडतो यांत वासनेच्या उपायानें क्षय होतो पण अदृष्टाचा भोगविना क्षय नाहीं. एवं प्रायश्चित्तानें किंवा इच्छेच्या अभावें संचित कर्में निःशेष नष्ट होत नाहींत हे सिद्ध आणि वर्तमानकाळीं देहाहंतेनें जी क्रियमाण

कर्में होतील त्याचें पुण्य पाप पण होणार; त्याचेंही फल निश्चयात्मक आहे. निष्कामास चित्तशुद्धी, सकामास भोगार्थ देहारंभक याप्रमाणें अज्ञान्यास कर्मभोग चुकत नसून ज्ञान्यास कर्म बाधक नाहींत. कारण कर्ता, कर्म, फल हीं तिन्हीं परमार्थी सत्य नाहींत; अज्ञानकल्पित मिथ्या आहेत तस्मात् मुमुक्षूस निष्काम कर्मे चित्तशुद्धिद्वारा ज्ञानसंपादन करणेंच योग्य.

**प्र०**—जलसिंचन वृक्षाच्या उत्पत्तिवृद्धिरक्षणार्थी अगत्य हेतु तसे स्वाश्रम धर्म कर्मानें शुद्धांतःकरण होऊन ज्ञानोत्पत्ति वृद्धिरक्षण होते आणि उत्पन्न झालेला वृक्ष जलाविना नष्ट होतो तद्वत कर्माच्या अभावें उत्पन्न झालेलें ज्ञानही नाश होईल. जसें कोणी स्थळीं कोणीं तपस्वी येऊन राहतात तें स्थळ कांहीं निमित्तें अशुची झालें तर सर्व निघून जातात तसें कर्माच्या अभावें अंतःकरण मलिन झाल्यास ज्ञान वैराग्य राहणार नाहीं यावरून ज्ञान वैराग्यादिकांचें उत्पत्तिवृद्धिरक्षणार्थ कर्म अवश्य केलें पाहिजे एवं ज्ञानकर्म उभय मोक्षास असलें पाहिजे.

**स०**—जलाचें सिंचणें वृक्षोत्पत्तिवृद्धिरक्षणास हेतु तद्वत् ज्ञानास कर्म हेतू नाहीं. कारण ज्ञान हें कांहीं नवीन उत्पन्न होत असतें असें नसून तें मूळचेंच स्वतःसिद्ध स्वप्रकाश आहे जसा प्रत्यक्ष सूर्य अभ्राच्छादित दिसत नाहीं किंवा कांच भाजनांत दीप असतांही त्या पात्रावर मल आहेत तर बाहेर प्रकाश होत नाहीं. त्या अभ्राचा व मलाचा अवरोध आहे तो दूर झाला तर सूर्य दीप प्रकाशीत होतात तसा अज्ञान भ्रांतीनें ज्ञान सूर्य आवृत्त आहे तें आवरण दूर झाल्यास स्पष्ट होते व तो निरंतर निरापेक्ष आहे ह्मणून त्याचे उत्पत्तिरक्षणांत क्रियाकर्माची अपेक्षा नाहीं. जसें स्वप्न निवृत्तींत जागृत होऊन स्वप्न मिथ्या जाण

णेंच उपयोग किंवा मदांधकारें रज्जू सर्पवत् भासली ती रज्जू दीपप्रकाशें ओळखून स्वस्थ होणें इतकीच विचाररूप क्रिया अन्य; त्याचे निवृतींत काहीं कर्म नको. तसें ज्ञानानुभवें अज्ञानकृत सर्व मिथ्या यथार्थ समजून मी असंग, अक्रिय इत्यादिक अनुसंधान निरंतर ठेवणें इतकेंच विचाररूप कृत्य आहे; यांत क्रियाकर्मांचा काय उपयोग? कारण बंध ही कांहीं वस्तु नसतां भ्रांति आहे; भ्रांतीची निवृत्ति विचारानें होते क्रियेनें नाहीं. जसा शुकपक्षी आपणच नलिका धरून मला कोणी बांधलें आहे अशा स्वकल्पनेनें धरलेली नळी सोडून बंधांत पडतो तसा आपलाच संकल्प आपला शत्रू होतो. विचारें पहातां सकल जगत् मुक्त अक्रिय असून आपलेच भावनेनें बंधमोक्ष कल्पून दुःखी होतें. आरशांत काय प्रतिबिंब असतें जो पहातो तोच भासतो. तसें स्वसंकल्पानेंच नानाकार भासतात. निद्रिस्ताजवळ स्वर्गभोग वा सर्प व्याघ्र प्रत्यक्ष आले तरी मनांत कल्पना नसल्यानें तद्विषयक सुखदुःखें त्यास होत नसतात व स्वप्नस्थास कोणतीही वस्तू प्रत्यक्ष नसून मनांत कल्पना असल्यानें सुख दुःखें होतात अथवा कोणी गृहस्थाचा पुत्र प्रवासास गेला तो तिकडे मृत झाला तरी वर्तमान न कळल्यानें त्याचा पिता सुखांत असतो किंवा तो सुरक्षित असून कोणीं सांगितलें कीं मृत झाला तें ऐकून दुःखी होतो एवं पुत्राचे मरणें जिवंत रहाणें दोन्हीं सुख दुःखास कारण नसून

**मनो हि जगतां कर्ता मनो हि पुरुषः स्मृतः**
**मनःकृतं कृतं लोके न शरीरकृतं कृतं ॥**
**चित्तं कारणमर्थानां तस्मिन्सति जगत्त्रयं ।**
**तस्मिन् क्षीणे जगत् क्षीणं तच्चिकित्स्यंप्रयत्नतः॥**

सर्व संसारास कारणभूत मनच मुख्य आहे. मनोकृत तेंच फलास हेतू मन नसतां शरीरकृत तें कर्म व्यर्थ मनोदयातच नामरूप जगाची उत्पत्ति मनक्षीणें जगत्क्षय यावरून

**चित्तं जानीहि संसारं बंधश्चित्तमुदाहृतः ।**
**पादपः पवनेनैव देहश्चित्तेन चाल्यते ॥**

बंधमोक्षादिकास कारण मनच आहे. जसें वायूनें वृक्ष हालतात तसें मनानें देहाचें चलन वलन होतें एवं—

**मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः**
**बंधाय विषयासक्तं मुक्त्यै निर्विषयं स्मृतं ॥**

मनुष्याचे सुख दुःखास कारण एक मनच दिसत आहे; तें विषयासक्ते बंध निर्विषये मुक्त करिते, याप्रकारें धर्माधर्म वैराग्य, ऐश्वर्य, सुख, दुःख, पुण्य, पाप, जन्म, मृत्यु, स्वर्ग, नर्क, सर्व विश्व मनःकल्पित आहे तें मन वश नाहीं तावत दुःख नाश नाहीं आणि मन पण तेव्हांच वश होतें जेव्हां स्वस्वरूपानुभवें सर्व मिथ्या दृढ निश्चयें संपूर्ण कामवासना जाऊन निर्विषय होईल याविना अविचारानें सर्व बाह्यत्यागें दिगंबर होऊन घरोघर भिक्षा मागितली तरी मन वश होत नसतां दुःखें मिटत नाहींत अशी ही मन कल्पनाच

**न ह्यस्त्यविद्या मनसोऽतिरिक्ता**
**मनो ह्यविद्याभवबंधहेतुः ।**

अविद्या माया प्रकृति अज्ञानादिक नामें भ्रांतीरूप असून तद्योगें जे कर्माचे कर्ते यांस मी कर्ता, अमुक पुण्य, अमुक पाप इत्यादिक संशयामुळें पुनरावृत्ती होती आणि जसें नेत्रदोष मंदांधकार दोषानें सत्य

वस्तुवर भेद होऊन रज्जु सर्प शुक्ति रजत भासे इष्टा निष्ट वासनेनें कर्म प्रवृत्ती होते व नेत्र तिमिरदोष निवृत्तीनें भेद भासत नाहीं तर कर्म पण होत नाहीं; तसें स्वस्वरूपअज्ञानानें नानात्वभेद व भेदामुळें वासना, वासनेनें राग द्वेष आणि तदर्थ कर्मप्रवृत्ती होत असते व विद्याप्राप्तींत कर्माचें कारण नानात्म भेदवासना नष्ट झाल्यानें तत्कार्यकर्मे पण सहज नाश होतात. एवं कर्माचें कारण भेद ज्ञानच होय यास्तव विवेक उदय नाहीं तोंपर्यंत चित्तशुध्यर्थ निष्काम कर्मे अवश्य करून नंतर फलप्राप्ती उपरांत साधनाची उपेक्षा असते ह्मणजे रात्र असे पर्यंत दीपाची प्रतिष्ठा; सूर्योदयावर त्यास कोण पुसतो ? तद्वत शुधांतःकरण झाल्यावर तत्साधनरूप जें कर्म त्याची अपेक्षा नसतां उलट ज्ञानास प्रतिबंधक आहे म्हणून मुमुक्षूनें सर्व कर्मत्याग ( संन्यास ) करून श्रवणादिकच केलें पाहिजे; यायोगें समूळ अज्ञान नष्ट होऊन आवरण नाश होतो. अज्ञानावरण गेल्यास तदाश्रित कर्मे विलयास जातात. पुढें मी असंग, अकर्ता, अभोक्ता, या निश्चयबळें जळांतील पद्मपत्र न्यायें, क्रियमाण कर्माचा स्पर्श होत नसून भर्जित बीजवत् अंकुर न निघतां सर्व दुःखनाश होतो. शिवाय कर्म व ज्ञानाचा "तमः प्रकाशवत्" विरोध आहे. जेथं ज्ञान पूर्ण तेथें कर्म व कर्ताच नाहीं. जेथें साहंकार कर्म कर्ता, तेथें ज्ञान नसतां दुःखें आहेत एवं ज्या ज्ञानोदयांत कर्म राहूंच शकत नाहीं. तें कर्म ज्ञानास साहाकारी कसें होणार ? या प्रकारें ज्ञान, कर्म, समसमुच्चय पण घटत नाहीं; क्रम समुच्चय आहे, ह्मणजे पूर्व काळीं अज्ञान दशा तावत् कर्म आहे तस्मात् मोक्षेच्छूस ज्ञानच संपादन करणें योग्य.

**प्र०**—सर्व जग मुक्त आहे. मग ज्ञान व ज्ञानसाधनाचें काय प्रयोजन ? आणि स्वकल्पनेनेंच सर्व बद्ध ह्मटलें तर स्थावरांत मन कल्पना नाहीं, असे जे केवळ जडवत् असतील तेच मुक्त, सुखी, ह्मणावे कीं काय?

स० सर्व दुःखाचें बीज देहाभिमान आहे, ह्मणजे

**यावद्देहेंद्रियप्राणैरात्मनःसन्निकर्षणं ।**
**संसारः फलवांस्तावदपार्थोऽप्यविवेकिनः ॥**

देहेंद्रियें, मन प्राणादिक् आत्म्याहून भिन्न मिथ्या असतां अविवेकानें जड, चेतन ऐक्यत्वें, सर्व सत्य जाणून मी कर्ता, भोक्ता, हाच अध्यास बाधक असून हेंच आत्मत्वीं आवरण आहे. तें अहंकारावरण दूर करण्याचीं सर्व साधनें होत ज्याप्रमाणें

**इक्षौ गुडस्तिले तैलं काष्ठे वन्हिर्दृषद्ग्रयः ।**
**धेनावाज्यं वपुष्यात्मा लभंते नाप्रयत्नतः ॥**

उसांत गूळ, तिळांत तेल, काष्ठांत अग्नी, पृथ्वींत जुळ, गो अजा स्तनीं दुग्ध, पुष्पांत गंध, दुधांत घृत असतांही क्रियेविना प्राप्ती नाहीं; किंवा चिंतामणी असून परिक्षा नसल्यास दरिद्र दूर होत नाहीं; अथवा गाईस कांहीं व्रण झाले त्यास गाईचें घृत उपचार आहे; तेथें गाईचें घृत गाईतच आहे असें ह्मटल्यानें तें दुःख दूर होत नाहीं. तर घृत गाईहून पृथक् काढूनच उपचार केला पाहिजे तद्वत्

**एवं सर्वशरीरस्थः सर्पिर्वत् परमेश्वरः ।**
**विना चोपासनां देवो न करोति हितं नृषु ॥**

सर्वांचे अंतर्यामीं आत्मा दुग्धांत घृतवत् पूर्ण आहे; तथापि देह तादात्में अज्ञानाच्छादित ह्मणून मोक्षार्थ निरुपयोग यास्तव जड व चेतन पृथक् करण्यास साधनापेक्षां आहे, आणि स्थावरादिक जडांत उपाधिभेदें अवस्तेचा भेद आहे ह्मणजे सर्व सृष्टी वासनेमुळें आहे. यांत घन वासना ती केवळ जड सुप्तवत् होत. जसें सुप्तास कांहींच कळत नाहीं तसें स्थावर

असून मध्यम वासना ते स्वप्नावस्थेंत असतात. जसें स्वप्नस्थास थोडकें ज्ञान भान असतें तसें आहारादिक किंचित् ज्ञान तीर्यगादिकांस आहे आणि स्पष्ट वासना ते मनुष्यादिक जागृदवस्थेंत स्पष्ट व्यवहारांत अखंड लागले रहातात ही स्वप्नजागृती होय; खरी नव्हे. व क्षीणवासना तेच बोध-जागृत मुक्त. एवं स्थावर सुषुप्तींत आहेत ह्मणून त्यांची कर्मवासना बीजांत वृक्षवत् गुप्त असते, ती अन्यजन्मीं स्पष्ट होते; त्या काळीं तदनुसार स्पष्ट सुखदुःखें भोगतात यामुळें सांप्रत त्यांची पूजा झाली किंवा तोड जोड झाली तरी त्यास स्पष्ट सुख दुःखें भासत नाहींत शिवाय जितके दृष्टिगोचर जड चेतन आहेत तेथें जडीं अस्पष्ट, चेतनी स्पष्ट, सुख दुःखें असतात, ते जडत्वें सुखी ह्मटले तर त्यांचें नाशरूप दुःख पण मोजलेंच पाहिजे; आणि स्वस्वरूपबोध नसतां बोधसाधनाची सामुग्रीही नाहीं; अशास सुखी, मुक्त, कसें ह्मणतां येईल? जे वस्तूस वस्तुरूप यथार्थ जाणून द्वैतभ्रान्तीनें पुन्हा वासना नाहीं तेच मुक्त. एवं जड, चेतन उभय विकारच होत व सर्व विकार दुःखाचें मूळ अज्ञान आहे. तन्नाशार्थ ज्ञान व ज्ञानसाधनास यत्न अवश्य केला पाहिजे.

प्र०—साकार निराकार एकच होय असें आपण पूर्वीं सांगितलें आहे तर आकाशांतील मेघोदक कोठेंही पडतां समुद्रांत जातें. तसें कोणच्याही देवाचें अर्चन एकेच ठिकाणीं जाणार. मग ते देव मिथ्या व कर्त्याचें कर्म निष्फळ किमर्थ? कारण अमुक कर्मोपासनेनें देव, पितृलोकादिक इहपरलोक विषयभोगादिक संपूर्ण सुखप्राप्ती अमुक कर्मानें देव पितृऋणाची मुक्तता, अमक्या कर्मानें मोक्ष, अमुक पुण्य, अमकें पाप, देवादि सर्व ईश्वराधीच रूपें असें विधिनिषेध बंध, मोक्ष इत्यादिक नानाभेदकर्मप्रवृत्तीफल व पुत्रहीनास परलोक नाहीं; यास्तव कर्मेच करावीं असें वेदानेंच सांगितलें असून जीवाच्या सुखार्थ साध्य साधनें कथन केलीं तर वेद शास्त्र सत्य प्रमाण कीं मिथ्या अप्रमाण?

**स०**-ब्रह्मात्मरूपनिश्चलसमुद्रांत अकस्मात् अहंभावरूप तरंगस्फुरणानें विद्या, अविद्या, देश, काल, कर्मादिक त्रिगुणात्मक शरीरें अनेक जीव उत्पन्न झाले यांत जे आपले वास्तव स्वरूपीं अहंप्रत्ययें राहून जगाभास संकल्पात्मक मिथ्या जाणून सदां अंतर्निष्ठ राहिले ते ईश्वरभावनिरिच्छ स्वतंत्र जीवन्मुक्त झाले आणि जे स्वस्वरूपविस्मरणानें त्रिगुणात्मक देहादि दृश्यसंबंधें बाह्यवृत्तीनें जगद्विषयांत सत्यत्व बुद्धि योगें गृहण त्यागेच्छेनें सात्विकादिक कर्में करूं लागले त्यामुळें जीवत्वभाव परतंत्र दुःखी झाले जसा एकच नट अनेक रूपें धरून त्या त्या भावांत आलिप्त असतो त्यांतील सोंगाड्या एकच आहे असें ज्यास दृढ ज्ञान आहे त्यास तत्संबंधीं हर्ष खेद बाधक नसतां ज्यास पृथक् जाति व्यक्ति भिन्न व सत्य वाटतात त्यास हर्ष खेद होतात तसें वेदान्तमतें मूळ सर्व एकच परब्रह्म तत्व सत्य असून अविचाऱ्यास तो मायोपाधिक भेद मिथ्या असतां सत्य वाटतो. जसें एकाच मुळाचे वृक्षापासून सहस्त्रावधि शाखा पत्रें असतां त्याच भिन्न भावनेनें भेद पावतात तसें निराकारच मायायोगें साकार भासतें तथापि मायेहून अलिप्त आहे. जसा अग्नीपासून धूम उद्भव होतो पण धूमांत वन्ही नसतो; जलावर फेन येतो तरी फेनांत जल नाहीं; धान्यावर साल असतें परंतु सालींत धान्यकण नाहींत तसा निराकारावर मायासंबंधें आकार येतो पण तो आकार ब्रह्मात्मा नव्हे तथापि हा सर्व एकाच वृक्षाचा जगद्विस्तार होय

**खवाताग्निजलोर्वीषु देवतिर्यङ्नरादिषु ।**
**अभिन्नः सच्चिदानंदाद्व्यिते नामरूपिणी ॥**

आकाश, वायू, अग्नी, जल, पृथ्वी, देव, तिर्यग मनुष्यादिक अभिन्न आहेत असें ज्यास दृढ ज्ञान असून अभेद भक्तीनें निरहंकार, निष्काम, कोणत्याही देवाची उपासना करतात ते अर्चिरादिमार्गें क्रममुक्तिमार्गी लागतात

जसें नटाचें सोंग लटकें तरी देणगी खऱ्या नटासच जाते तसें साकार मिथ्या तरी कर्त्याची क्रिया मूळाधिष्ठानाकडेच जाते. त्या जगत्वृक्षाचें मूळ यथार्थ न जाणून

**भेददर्शनमास्थाय मुक्तिमिच्छन्ति ये नराः ।**
**ते महाघोरसंसारे पतन्ति च न संशयः ॥**

भेदभावनेनें नानाकार सत्य समजून जे पुरूष ज्या देवतेची सकाम उपासना करतात तद्वारें अंतर्यामीं परमात्माच त्या देवतेच्या रूपें तशीं फळें त्यांस देतो पण ते देवाकार परिच्छिन्न असून उपासकाचें भिन्नत्वबुद्धीनें सहेतुक कर्म असल्यानें

**अंतवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम् ।**

त्यांस अल्प परिच्छिन्न अंतवत एकच फल होत असून पुण्याधिक्यें धूममार्गें स्वर्गादिक फल व भोगक्षयें पतन पापाधिक्यें अधःपतन एवं पुण्यपापफल भोगार्थ संसारांत अविश्रांत भ्रमत रहातात पण मुक्ती नाहीं आणि एकाच उदकापासून कडू,गोड,आम्ल,तिक्त जसें बीज तसा वृक्ष व फल,तद्वत् निष्कामकर्में चित्तशुद्धीनें मोक्षमार्गप्राप्ती व सकामें संसारप्राप्ती. कारण मुख चुकवून खीर सर्वांगीं लेपन केली तरी क्षुधानिवृत्ती नाहीं; किंवा पाणी देणें वृक्षाचे मुळास असतें तेथें न देतां शाखा पत्रीं दिलें तर मूळ कोरडें राहिल्यानें ती क्रिया वृथा जाते. तद्वत् जगत्कारणाचें मूळ न जाणतां भेदभावनेनें ईश्वर तुष्ट होत नाहीं. अरे एकाच देहांत विषयग्राहक पंचेंद्रियें आहेत व तत्द्वारें पृथक विषय देहांतच एकत्र होतात; तथापि भोजनरस कर्णद्वारें अथवा सुगंधतैल नेत्रद्वारें घातलें, तर सुख जाऊन उलट दुःख होईल ह्मणून जेथील तेथेंच योजिलें पाहिजे. तसेंच परमात्मारूप यथार्थ जाणून कर्मोपासना केली पाहिजे. आतां अनेकत्व वेद बोधन करताता. याचें

रहस्य असें कीं स्वअज्ञानानें जीव मोहित होऊन शब्दादिक विषय सत्य व श्रेयस्कर जाणून यथेष्टाचरणीं झाले हें नाशास कारण आहे असें विचारून ईश्वरानें वेद प्रगट केले. वेद ह्मणजे जाणणें त्या आपल्या स्वरूपाची आपणास विस्मृती झाली त्याची पुन्हा प्राप्ती व्हावी एतदर्थं-च वेदाची मुख्य प्रवृत्ती असून, नानात्व सत्य नाहीं; असा अद्वैत बोध केला तथापि कामासक्त मलिन चित्तजीवें तें वचन अग्राह्य करून विषयार्थ पुनःपुन्हा तींच कर्में करून अति दुःखित झाले, आणि आह्मीं जीव ईश्वराहून भिन्न, अल्पज्ञ, आत्मशक्ति, अस्वतंत्र जननमरणधर्मी दुःखी आहोंत तर सुखी कसे होऊं अशी सुखाची इच्छा करूं लागले पण खरें सुख कोणतें व तत्प्राप्तीचें साधन काय हें कांहींच जाणत नाहींत त्यांचे दुःखाचा परिहार कसा व्हावा तर त्यांस स्वस्वरूपज्ञान झालें पाहिजे, व ज्ञानप्राप्तीस चित्तशुद्धी झाली पाहिजे, आणि चित्तशुद्धीस निष्काम कर्में झालीं पाहिजेत. या विचारें जसा पिता बालकास आपले घरांतील गौप्य प्रथम न सांगतां सुशिक्षण देतो; तोच प्रौढ अधिकारी झाल्यावरं सांगतो तसा बालबुद्धीअविकाऱ्यास वेदादिकांनीं, यथेष्टाचरण बंद करून, विषय सुटण्यास कर्मोपासना ज्ञान एवं त्रिकांड मार्ग प्रकाशित केला यांत जे तमोगुणी बहिर्मुख अति विषयासक्त त्यांस कर्माधिकार सांगून रजोगुणी अति विषयासक्त नसतां विषयत्यागासही असमर्थ यांस गुरु ईश्वरोपास्तिभक्तिमार्ग सांगितला व सत्वगुणी विषयवासनारहित शुद्धचित्तें जाणणें मात्र उरलें त्यांस ज्ञानाधिकार सांगून विश्वोत्पत्ती, स्थिति, लय, एकाच अधिष्ठानापासून आहे असा उपक्रम उपसंहार दाखवून तेंच आपलें मूळ स्वरूप आणि तद्रूप होण्यांतच परम सुख आहे तत्प्राप्तीचें साधन निष्काम कर्मोपासना होय. इत्यादि क्रम मोक्षमार्गी नानात्व भेद जीवाचे सुखार्थ वेदशास्त्रांनीं सांगितला. तत्रापि निष्काम कर्में तीं विषयसुखरहित निष्फळ ह्मणून जीवांनीं वर्ज केलीं व विषयवासना

सोडींत नाहींत असे विषयग्रस्त अतिदुःखित जीवांस पाहून त्यांचें कोणत्या प्रकारें कल्याण व्हावें या कळकळीनें अमुक प्राप्तीस अमुक विधान व रोचनार्थ स्वर्गादिक फल दाखवून सकाम कर्मे वेद सांगते झाले व यथेष्टाचरण बंद होण्यास त्याचे मार्गे विधिनिषेध लावून दिले; ह्मणजे काळ, वेळ, जाती, वर्ण, न पाहतां वाटेल तें भक्ष्य, वाटेल तेव्हां वाटेल त्या जातीचें घेत होते. तेथें स्वजातीचे ( ब्राह्मणांनीं ब्राह्मणाचे ) सायंप्रातर वैश्वदेव करून अन्न घ्यावें अन्य अपवित्र घेण्यांत पातक सांगितलें. परस्त्री, धन, अन्यायें ग्रहण करीत होते हें पाप आहे ह्मणून अमुक कर्मानें धन, पुत्र, कलत्र, प्राप्ती सांगितली. इत्यादि विधिमुखें विषयत्याग दर्शित केला. विषयार्थ अमुक कर्म अवश्य केलेंच पाहिजे नाहींतर प्रायश्चित्त आहे असें विधिवाक्याचें तात्पर्य नाहीं. कारण विषयाकडे सर्वांची साहजिक प्रवृत्ती असते. भोजन करा स्त्रीसंबंध करा हें कोणास सांगावें लागत नसतें. सारांश विषयवृद्धी बहुत झाली ती, संकोचांत आणण्याचें वेदाचें तात्पर्य आहे यास्तव सत्वरजतमात्मक वासनेनें जसजसा अधिकारी तसतसें फलप्राप्तीचें साधन विधान वगैरे विधिमुखें विषयनिषेधाची युक्ती केली ह्मणजे असें करितां करितां कांहीं काळें कंटाळून विषयाशा सोडितील तर; निष्कामकर्मादिक्रमें स्वसुखाकडे येतील. या विषयलोभानें पूर्वीं जे वेदाज्ञा मुळींच मानीत नव्हते ती मान्य करून सकामकर्मे करूं लागले; त्या योगें स्वर्गादिक अल्प सुख मिळून पुनःपुन्हा दुःखी होऊं लागले. जसा

**वंशपात्रमिवापूर्णं पूर्णं घटशतैरपि ।**
**क्रियाजालं कथं साधो विरागाय च जायते ॥**

बासाचा करंडा करून त्यांत शतशः घट जल ओतिलें तत्रापि भरणार नाहीं तद्वत् कोणत्याही प्रकारें कर्माची पूर्णताच होत नसते ह्मणजे—

**ब्रह्मणो दिनमारभ्य यावदद्य कृताः क्रियाः ।**
**मुहूर्तं हंत संसारी नैव निश्चिततां गतः ॥**

ब्रह्मदेवानें सृष्टी उत्पन्न केल्यादिवसापासून आजपर्यंत किंचित् विश्रांती न घेतां भेदवासनायुक्त कर्मेंच केलीं ह्मणूनच पुनःपुन्हा जन्म मृत्यु होतात. एवं देहात्मवासनेमुळें कर्म; शुभाशुभकर्मे, पुण्यपाप, तद्भोगार्थ उत्तमाधम देह, देहयोगें पुनःकर्म, अशीं कर्मानेंच सर्व संसारदुःखें असून तींच कर्में भेदभावें सकाम करा असा वेदशास्त्राचा सांगण्याचा जर खरा अभिप्राय असता तर जीवांचे दुःखास कारण तींच झालीं असतीं. आधींच रोग्यास कुपथ्य आवड, त्यावर तसेंच अनुमोदन देणारा वैद्य; मग तो निरोगी कसा होणार? तसेंच जीव आधींच विषयेच्छाव्याधिग्रस्त; त्यावर तशीच वेदाज्ञा असेल तर त्याची दुःखांतून सुटका कशी होणार? अरे एक अद्वैतच वेद सांगत असून, जिव, ईश, जगत् नाना भेद हीं सांगतात हा केवढा विरोध? तस्मात्, विश्वोत्पत्ति, जीवेश्वर, नानात्वभेद, कर्मफल विधानादिक सांगणें हें जीवाच्या अधिकाराप्रमाणें बालाख्यायिकावत् रोचनार्थ आहे असें सिद्ध झालें. भेद सत्य असें वेदशास्त्राचें सांगण्याचें खरें तात्पर्य नाहीं. आतां सर्वांस जन्मापासून ऋणत्रय आहे यास्तव यावज्जीव अग्निहोत्रादि कर्मच करावें याणेंच मोक्ष असें ह्मटलें तर सर्व कर्मे केल्यानें मोक्ष वा एककर्मे केल्यानें? जर एककर्मानें मोक्ष हटला तर इतर सर्व कर्मे सांगितलीं तीं व्यर्थ झालीं; व सर्व कर्मे करण्यानें मोक्ष ह्मटला तर सर्वत्र कर्में कोणासच घडत नाहींत; बाल्यावस्थेंत वा उपनयनब्रह्मचारि अवस्थेंत पण अविवाहें अग्निहोत्रादि सर्व कर्में होत नाहिंत अशा अवस्थेंत मृत होतात त्यांस अधोगतीच ह्मटली पाहिजे मग ब्रह्मचाऱ्यास ब्रह्मलोकादि प्राप्ती सांगणाऱ्या श्रुतींस विरोध येतो आणि जें जें कर्में तें तें अमुक कर्मे अमुक फल असें फलार्थच सांगितलें आहे फलाविना कर्मच नाहीं तस्मात ज्यांस इह पर लोक भोगवासना त्यांसच

कर्म सांगितलें आहे. भोगेच्छा नाहीं त्यास ऋणत्रयादि कर्म प्रतिबंधक नाहीं, हें सिद्ध. एवं तत्तल्लोकभोगवासनेनें तदधिकाऱ्यांस तें तें कर्म केलें पाहिजे असें सिद्ध झालें. निर्वासनिकांस नाहीं. या प्रकारें सर्व मुळींच मृगजळ मग त्यांतील मासोळे जीवेशादि उत्तम मध्यम निकृष्ट हें ह्मणणें काय? असें सर्व नश्वर; त्याची आशा करणें मूखर्त्व होय,

**उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् ।**
**आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥**

भेदबुध्या ज्या सकामकर्मीनें जनन मरण नरकपातादिक अनिवार अनंत सतत दुःखें तीं पापरूपच होत. हें पूर्वींच सांगितलें आहे. तिकडून परतत नाहीं तो आपणच आपला शत्रू होतो. विवेकी आपला उद्धार आपणच करितो. तो आपणच आपला मित्र अशी

**अभाग्यं परमं पुंसां परपिंडोपजीवनं ।**
**तत्कथं नाम सौभाग्यं पुत्रपिंडोपजीवनं ॥**

पुत्रादिक पर पिंडावर जीवनेच्छा तुच्छ. ह्मणजे—

**मृतशब्देन संबोध्य मृतपिंडं मृ[illegible]**
**मृताय दास्यते पुत्रः [illegible]**

ज्या तिथीस पिता मृत झाला [illegible] यु-
मुखग्रस्तपुत्र पिंड देतो. तर श्रुतिशा[illegible] जें मो[illegible] श्रेष्ठ,
श्रेयस्कर, उत्तम; कीं श्राद्ध, [illegible] उत्तम; याचा [illegible] मोक्षामृत
प्राप्तीस्तव यत्न कां करूं [illegible] तात्पर्य—

**अशना[illegible] पिपासां च शोकं [illegible] जरां मृतिं ।**
**अत्ये[illegible] श्रुतिशास्त्रेभ्यो मा भव श्राद्धभक्षकः ॥**

क्षुधा, तृषा, शोक, मोह, जरा, मृत्यु, हे धर्म देहाचे होत. ते अविचारें आपणावर घेऊन श्रात्धभक्षक प्रेत होणें अति निंद्य आहे तस्मात् गुरुशास्त्रमार्गें ब्रह्मात्मैक्यतात्पर्य यथार्थ समजून नित्य सत्य, सुख, स्वरूप, शुद्ध, बुद्ध, चिदानंदघन होणेंच योग्य. देहाध्यासें श्राद्धपिंडभक्षक होणें योग्य नाहीं. कारण—

**यात्रासमागमसमे न तर्कितगतागते**
**पशुपुत्रकलत्रादौ ममता न मता मम ॥**

पुत्र कलत्र पश्वादिकांचा संयोग यात्रस्थवत् क्षणिक आहे त्यावर पामर ममता ठेवितात व तदर्थ अनेक कर्में करूनमरणाचें ओझें आपणावर घेणें महामूर्खत्व आहे.

**यन्मयापरिजनस्यार्थे कृतं कर्म शुभाशुभं**
**एकाकी तेन दह्येहं गतास्ते फलभोगिनः ॥**

मातेच्या गर्भोदरीं सप्तमारम्भ नवममासांत असह्य गर्भयातना
दु: [illegible] होतो, तेव्हां हा जीव ह्मणतो कीं, ज्याकरितां शुभा-
[illegible] तें सर्वत्र सुखफल भोगून गेले. येथें माझें कोणी
र [illegible] र्मांचें दुःखफल मी एकटाच भोगीत आहें, तर
अ [illegible] अशाश्वत विषयार्थ कांहीं एक न कारि-
तां [illegible] केली असून ती विसरून अनेक कर्में अ
करितों [illegible] आहे सकाम कर्मांमुळें आदिमध्यांती
निस्सीमदुःख [illegible] य, पितर, [illegible] ची मुक्तता करून निरंतर सुखी
कसें करील? तस्मात्

**स्नातं तेन स [illegible] नतीर्थसलिले दत्ता च सर्वावनि-**
**र्यज्ञानां च [illegible] सहस्रमखिला देवाश्च संतर्पिताः ।**

**संसाराच समुध्दृताः स्वपितरस्त्रैलोक्यपूज्योप्यसौ**
**यस्य ज्ञानविचारणे क्षणमपि स्थैर्यं मनः प्राप्नुयात् ॥**

आत्मज्ञानानेंच सर्व कर्माची मुक्तता व निरतिशयानंदसुख ( मोक्ष ) प्राप्ती, हें सिद्ध. या ज्ञानास चित्तशुद्धी, व चित्तशुद्ध्यर्थ प्रथम निष्कामकर्माची अपेक्षा आहे या हेतूनें जसा—

**फलश्रुतिरियं नृणां न श्रेयो रोचनात्परम् ।**
**श्रेयो विवक्षया प्रोक्तं यथा भैषज्यरोचनम् ॥**

बालकास पिता रोगनाशार्थ औषध देतो, तें कटु असल्यानें बाल सेवन करीत नाहीं, ह्मणून रुचीस्तव किंचित् शर्करा देतो. त्या लोभानें बालक औषध सेवन करितें. पण पित्याची दृष्टी रोगनाशार्थ असते. तसा विषयत्यागार्थ कर्मादिक सांगण्याचा वेदादिकांचा अभिप्राय आहे; असें खरें रहस्य न जाणतां भेदभावें सकाम कर्में जे करितात, ते, कष्ट वृथा दवडून विपत्तींत मात्र येतात. जसा अमुक गृहीं जाण्यास पिंपळावरून मार्ग आहे असें कोणीं सांगितलें त्याचे तात्पर्यार्थी लक्ष न देतां जो पिंपळावर चढूं लागतो तो मूर्ख होय. विचारी त्या शद्बाचे लक्षार्थावर चालते होतात. किंवा खरें खोटें नाणें एकसारखें दिसत असून परिक्षक पारखून घेता[illegible] व मूढ नाडले जातात; तद्वत् कर्माकर्माची गती गहन आहे [illegible] समजणार सूक्ष्मबुद्धिपुरुष विरळे आहेत सारां[illegible] वेदादिकांचें सांगणें आहे कीं, व्याधी असे[illegible] [illegible]न पथ्य सांभाळावें लागतें; तसें अज्ञान तावत विधि [illegible] [illegible]ास्त्र सर्वसत्य व प्रमाण आहेत.

**प्र०**—कर्मांचा सर्वस्व त्याग करावा किंवा स्वीकार करावा ? कारण कोणतेंही कर्म कामनेवांचून होतच नाहीं व सकामकर्म आपण वर्ज सांगितलें तर सकाम निष्काम कर्म कोणतें व कसें जाणावें ?

**स०**—जसें क्षयरोग्यास किंचित कुपथ्य घातक, किंवा दुग्ध भरलेलें प्रचंड पात्र मिठाच्या एका खड्यानें सर्व नासून जातें; तशी विषयवासनेनें सकामकर्में यथार्थ घडलीं तर आत्मअंतवंत एकच फल होऊन भोगांतीं पुण्यक्षयें पुन्हां विपत्ती अयथार्थ झाल्यास निष्फळ किंवा विपरित फल होतें. जसें वेश्यागारी मूढ सर्वस्व धन वेंचून टाकितात व शेंवटीं दरिद्र दुःख पावतात तसें स्वर्गादिक विषयकामीं कामुक सर्वस्व स्वकर्मवित्त वेंचून अनेकानीं चबळलेलें उच्छिष्टशेष स्वर्गविषयसुख विकत घेऊन पुण्यक्षयें परिणामीं संसारावर्ती पडतात आणि एक शुनीमागें अनेक श्वान परस्पर कलह करितात; तसें स्वर्गांतही न्यूनाधीक सुकृत भेदें विषय प्राप्तींतही भेद असतो यामुळें असूया स्पर्धा द्वेष पतनभयादिक दुःखें आहेतच यावरून जसा परीस देऊन त्याबद्दल धोंडा घेणें किंवा उंसाची गोडी जाणून त्याचा पाला चावणें तशी कामिकाची गती आहे जसा कोणी पुरूष स्वापराधानें परवशबंदींत पडतो; सर्वसमाननृपास कोणावर दंड अनुग्रह करण्यांत प्रीति व द्वेष नसतो त्याच्या करणीप्रमाणें त्यास फल देतो तसें देहाहंतेनें विषयार्थी सकाम कर्माचे कर्ते ते त्या कर्माचे वश परतंत्र होऊन, पुण्यपापफल भोगार्थ स्वर्गीं नरकीं जातात; व बंदीवानाची टीप पुरी होताच राजसेवक त्यास तत्काल तेथून काढून
शीत्र कामनिक कर्मकर्त्याची गतागती होत असते. जसें दुग्धबल
पौ ग्यास गुणावह व रोग्यास अवगुण करतें. सुवर्ण पवित्र
पण त्य. र तें अपवित्र होतें. वाचा शुद्धच आहे तरी
भगवन्नामविरा ीनें पातकी होते भूमी उत्तम तरी जसें
बीज तसा वृक्ष . कर्में, साहाजिक शुध्द निर्दोष असून कर्त्याच्या वासना संकल्पामुळें तशी निंद्य व बाधक होतात. तोच हेतुरहित सांग स्वधर्म घडला तर अंतःकरण शुध्द होऊन ज्ञानप्राप्ती व दृढज्ञानानें नित्य सुख आहे यावरून—

**हरिप्रसादकाम्या च चित्तशुद्धेश्च कामना**
**मोक्षस्य कामना चेति कामनेयं न कामना ॥**

ईश्वरप्रसादार्थ, चित्तशुध्यर्थ, मोक्षार्थ, जीं जीं कर्मे तीं तीं कामनिक नसावीत कारण गमावलेली वस्तू न मिळेपर्यंत दीप त्याग करणें अयोग्य. नदीपार जाणें आहे तर नौकेचा आश्रय घेतला पाहिजे. भोजनेच्छा आहे तर पाकक्रिया केली पाहिजे. तद्वत शुभाशुभ वासना आहे तावत् स्वाश्रम धर्म आळसरहित अवश्य केला पाहिजे. ह्मणून ज्यास आपलें खरें हित करणें असेल त्यानें सकामकर्मे निःशेष सोडून—

**तस्मात्तया कामनया स्नानदानजपादिकं**
**तीर्थव्रततपोनिष्ठामोक्षकामैर्विधीयतां ॥**
**मोक्षार्थी न प्रवर्तेत तत्र काम्यनिषिद्धयोः**
**नित्यनैमित्तिके कुर्यात्प्रत्यवायबिवर्जितः ॥**

स्नान, दान, जप, तप, तीर्थ, व्रतादिक नित्य नैमितिक निष्काम कर्मे मोक्षेच्छेनें राजाज्ञावत ईश्वराज्ञित अगत्य केलीं पाहिजेत हीं कामनिकवत बाधक नसतां उपयोगी आहेत ह्मणजे चित्तशुध्दीनें ईश्वरप्रसादानें विवेक, वैराग्य, ज्ञान, आणि ज्ञानानुभवें, नित्यमुक्तत्व व अज्ञानजनावरही एकेपरी उपकार होतो.

**यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ॥**
**ज्ञाने जातेपि न त्याज्यं लोकानुग्रहहेतुना**
**यो वासनापरित्यागः कर्मत्यागः स एव हि ॥**

श्रेष्टाचरण पाहून तेही सुमार्गी लागतात यास्तव ज्ञानी पण निर्हेतुकर्मे परोपकारार्थ करितात; तात्पर्य संपूर्ण कामवासनेचा त्याग हाच सर्वकर्मत्याग होय. केवल क्रियेचाच त्याग असा अर्थ नाहीं.

प्र०—कृतकर्मफल भोगल्यावांचून कोटिजन्मीं पण क्षय नाहीं असें श्रुति शास्त्रें ह्मणतात; जसें बीज लाविल्यानें वृक्ष होऊन फल देतो, तसें कर्मानें पुण्य, पाप, तज्जन्यसुखदुःखभोग, तदर्थदेहोत्पत्ती, देहयोगें पुन्हा कर्म; एवं कर्मांतून सुटणेंच असंभवीत आणि ज्ञानार्थ शेवट सर्वकर्मत्याग सांगितलाच आहे तर पूर्वींच सर्व कर्में सोडिलीं असतां बरें कीं नाहीं? यास्तव अशेष कर्म त्याग करावीं असेंही कोणी ह्मणतात.

स०—देहाभिमान कायम असून, चित्तशुद्धी नसतां अविचारानें कर्मोपासनात्याग केवल मूर्खत्व होय; त्यागाचे मुख्य दोनच प्रकार आहेत ( सर्व क्रियारूप कर्मच त्यागणें वा कर्मजन्यफलाचा त्याग करणें ).

**ये तु बोधेन संप्राप्ताः सर्वकर्मातिगां दशाम् ।**
**न विधेः किंकरास्तस्मात्स्वच्छंदं विचरन्ति ते ॥**

जो सद्गुरुवाक्यश्रवणाबरोबर पूर्णबोधें तृप्त, प्रकृतीचे सर्व धर्म सोडून द्वंद्वमुक्त, निरहंकार निर्वासना निःसंदेह सर्वकर्मातीत तद्दशेस प्राप्त झाला, त्याचे ठिकाणीं जाति, वर्ण, आश्रम, धर्म, कर्म, असो वा नसो तरी तो त्याहून अलिप्त असंग स्वछंद आहे त्यास विधिकिंकरत्व नाहीं कारण आधाराविना आधेय रहात नसतें. यांत कर्माचा मूळ आधार अज्ञान आहे तें अज्ञान नष्ट झाल्यानें तदाश्रित संचित अनायासेंच नष्ट होतें व क्रियमाणकर्माचा आधार देहांत अहंकार आहे, त्याचेंही मूळ अज्ञानच तें अज्ञान प्रथमच नाश पावलें आहे; ह्मणून तोही मृतप्राय असून क्रियमाणकर्माचें बाधकत्व रहात नाहीं आणि प्रारब्धकर्माचा आधार वर्तमान स्थूल शरीर आहे, यास्तव जसें गजभक्षित कपित्थ भूमींत पुरलेलें मोतीं हीं सबंधाकृती दिसतात, तरी दग्ध आहेत तसें स्थूल शरीर

असेपर्यंत पूर्वप्रवाहें निर्हेतु निरहंकारें अर्भकवत् कर्मे घडतांही भर्जितबीजवत् निरंकुर ह्मणून त्यास बाधक नाहींत. असा जो स्थिरधी, गुणातीत, इष्टानिष्टसम तोच त्यागी सन्यासी. त्यास कोणतेंही कर्म करतां न करतां बाधक नाहीं यास सर्वकर्मत्याग घडत असून सर्वकर्मत्यागी ह्मणतात आणि–

**वेदोक्तमेव कुर्वाणो निःसंगोर्पितमीश्वरे ।**
**नैष्कर्म्यां लभते सिद्धिं रोचनार्था फलश्रुतिः ॥**

कर्ता कर्म फल याचें वर्म यथार्थ न जाणतां वेदाज्ञेप्रमाणें यथार्थ कर्म फलेच्छारहित ईश्वरार्पित करणारा यास कर्मफलत्यागी ह्मणतात हा सर्व कर्म करीत असून रोचनार्थ फल जाणून कर्मफलापासून अलिप्त राहून क्रमानें मोक्ष पावतो. तात्पर्य संसारनिवृत्तीस त्याचें कारण अज्ञाननाश झाला पाहिजे तें अज्ञान स्वस्वरूपज्ञानानेंच नष्ट होतें; अन्योपाय नाहीं असें ज्ञान जरी स्वतंत्र आहे, तरी त्यास चित्तशुद्धीची अपेक्षा असून चित्तशुद्धीस निष्काम कर्मोपासनाच मुख्य होय अशा क्रमानें त्यास फल होते एवं या दोन प्रकाराविना अन्य कोणत्याही प्रकारें कर्मत्याग घडत नाहीं कारण मूळ त्रिगुणानें सर्व सृष्टी झाली व त्या गुणावरून वर्णाश्रम झाले त्या वर्णाश्रमांत जे जे स्वाश्रम धर्म कर्म ज्यास सांगितले ते ते त्यानें त्रिगुणाहंकार असे पर्यंत केलेच पाहिजेत यांत पूर्वोक्त निष्कामें चित्तशुद्धी व सकामें संसार यास्तव देहाभिमान असेपर्यंत स्वाश्रमकर्मे सविधी करावीं असे उभय प्रकार नसतां अविचारें कर्म सोडल्यास अकरणीं प्रत्यवाय आहे किंवा स्वधर्म टाकून परधर्म घेतला तर तो अधर्मच झाला अथवा ब्राह्येंद्रियें तुष्णींभाव व आंत चित्तादिकीं

१ बालक. २ भाजलेले. ३ स्थिरबुद्धि. ४ त्रिगुणाहूनपर. ५ अनुकूलप्रतिकूल

क्षोभ हे पण कर्मच होत आहे. ह्मणजे सांडणें मांडणें हे धर्म अविद्येचे होत. ते मनांतून निःशेष नाहींसे न होतील तावत् कर्मत्याग संभवत नाहीं जसा रथारूढपुरूष न चालतांही शेंकडों कोस जातो तशी अविद्या त्यास भ्रमण करविते. यावरून कर्ता करण कर्म यांचें बीज न समजता अकर्ता होत नाहीं. नाहीं तर पश्वादिकही अकर्ते होतील. तसेच देहात्मविभाग जाणून शरीरकर्में घडल्यास तो कर्ताही होत नाहीं. जो कर्ता कर्तृत्वाभिमानी कर्मजन्यफलेच्छायुक्त, त्यासच कर्म बंधनकारक आहे. म्हणून क्रियोत्पत्तीचें मूळ जी वासना तिचा सर्वस्व त्याग झाला पाहिजे

**यो वासनापरित्यागः कर्मत्यागः स एव हि ।**

जो कामवासनेचा परित्याग त्याचेंच नांव कर्म, मग त्याग कर्म करण्यांत न करण्यांत बाधक नाहीं ह्मणजे पर्वतास अग्नी लागतां श्वापदास जा म्हणून सांगावें लागत नसतें आपणच जातात तशीं कर्त्यास कर्मेंच सोडून जातात. तस्मात जसें तृप्तभोजन झाल्यावर अनेक पदार्थ सिद्ध असून तसेच राहतात, त्याग करावा लागत नसतो. नदीपार गेल्यावर नावेचा त्याग नको. मुक्काम आल्यावर भाड्याचे तट्टाचा त्याग करावा लागत नाहीं. सहजच त्याग अशी पूर्णतृप्ती निर्वासना, तेथून कर्मेंच जातात. बळेंच त्याग करणें लागत नाहीं आणि देहाभिमानीस वासना तो कर्म करो, न करो दोहींत बध्ध आहे कारण कर्मोत्पत्तीचें मूळ वासना तें मूळ निर्मूळ झालें नाहीं तावत कर्म व तज्जन्यदुःखें दूर होत नाहींत यास्तव गुरुशास्त्रमार्गे त्यागवर्म यथार्थ जाणून आपला अधिकार विचारून तसें केलें पाहिजे. अनधिकारें कर्मत्याग केल्यास हत्तीचें अलंकार गर्दभास भूषणप्रद न होतां भारानें प्राणांत प्रसंग आणतात. तसें होईल व स्वाश्रम धर्म हा मोक्षमार्गाचा दीप आहे, आणि अज्ञानरूप काळोखी रात्र होय

रात्रीं पंथनिर्गमप्रसंगीं जर दीपाची उपेक्षा केली तर तत्काल अडखळून पडतां कामक्रोधादिक वाटपाडे सुकृतधन हरण करतील म्हणून स्वधर्म दीप अगत्य ठेवलाच पाहिजे आतां स्वधर्म सुखप्रद आहे पण आरंभीं आचरण्यांत दुःखद आहे, या समजुतीनें जे त्यागितात ते केवळ पशूच ह्मटले पाहिजेत. शिदोरी वाहतां प्रथम जड वाटते. पाकनिष्पत्तींत प्रथम धूमादिक दुःख असतें पण भोजनसमयीं अतिसुख आहे; तसाच स्वाश्रमधर्म परिणामीं अतिसुखप्रद होतो ह्मणजे—

**अनित्यानि शरीराणि वैभवं नैव शाश्वतं ।**
**नित्यं संनिहितो मृत्युः कर्तव्यो धर्मसंग्रहः ॥**

शरीरादिक सर्व अशाश्वत असून मृत्युमात्र रोकडा आहे आणि इहपरलोकीं एक धर्मच उपयोगी आहे—

**वने जने शत्रुजलाग्निमध्ये महार्णवे पर्वतसंकटे वा ।**
**सुप्तं प्रमत्तं विषमस्थितं वा रक्षंति पुण्यानि पुराकृतानि॥**

वनीं, जनीं, जल, अग्नी शत्रुपुढें सुप्तींतप्रमत्तदशेंत पुण्यरूपधर्मच सर्वत्र रक्षण करतो व—

**धनंच भूमौ पशवश्च गोष्ठे कान्ताः गृहद्वारि जनश्मशाने।**
**देहश्चितायां परलोकमार्गे कर्मानुगो गच्छति जीवएकः॥**

पुत्र, कलत्र, वित्त, पशू, स्वजन, शरीरादिक सर्व या लोकींच रहातात परलोकीं बरोबर कोणी येत नसून शुभाशुभकर्म मात्र जीवा समागमें जात असतें; व त्याचें फल त्या एकट्यासच भोगावें लागतें हें मुमुक्षूनें क्षणोक्षणीं स्मरण ठेवून जोंपावेतों हेम रजत् ताम्रपात्रें अप्राप्त तोंपर्यंत

मृन्मयहीं बरी. शाल दुशाले अप्राप्य तावत् धाबळ कामळ पण बरी. तद्वत नित्यसुख अप्राप्त तोंपर्यंत अधमलोक नरकादि दुर्गतीपेक्षां इहपर लोक भोगसुखें पण बरी. यास्तव अविचारानें अशाश्वत विषयार्थ स्वधर्म त्याग नकरतां जसाकृषीकार जों जों पेरणी ज्यास्त तितका लाभ अधीक समजतो. तसें अबोधजिवानें धर्मसंचयांत निरंतर अतृप्त असावें; कारण यश, कीर्ति, लक्ष्मी, औदार्य, तेज, बळ, बुद्धि, विद्या, आरोग्यादिकपरिवार धर्माचा असून तेथें सर्व सुखें राहतात; व अपयश, अपकीर्ती, अलक्ष्मी, कृपणता, निर्बळता, मूर्खत्व, तुच्छत्व, आधिव्याधि, क्लेशादिक अनंतपरिवार अधर्माचा आहे तेथें सर्व दुःखें राहतात; आणि एक गेलें तेथें दुसरें येतें या नेमानें जेथून स्वधर्म गेला तेथें अधर्म येतो. व तत्संयोगें त्याचा सर्वप-रिवारही आपलें निवासस्थान जाणून येतो त्यायोगें दारुणविपत्ती भोगाव्या लागतील म्हणून ज्यांस तीव्रवैराग्यानें विषयदोषदृष्टीनें सर्ववासना जाऊन कर्मफलावर अनादर झाला त्यानें विधानोक्तकर्मत्याग करून ज्ञानाभ्या-सीप्रवृत्त व्हावें एवंः—

**विषयाख्यग्रहो येन सुविरक्त्यसिना हतः**
**स गच्छाति भवांभोधेः पारं प्रत्यूहवर्जितः ॥**
**संन्यस्य सर्वकर्माणि भवबंधविमुक्तये ॥**

विषयाख्यगृह वैराग्यासिने ज्यानें निर्मूळ केला, तोच निर्विघ्नभवसमुद्रपार होतो. अविचारें, अनधिकारें, कर्मत्याग ( सन्यास ) केला, व ज्ञानाभ्यासीहीं प्रवृत होत नाहीं, तो ज्ञान, कर्म उभयभ्रष्टपतित होतो, ह्मणजेः—

**मौनानीहानिलायामदंडा वाग्देहचेतसां**
**नह्येते यस्य संत्यंगवेणुभिर्न भवेद्यतिः**
**वाग्दंडोथ मनोदंडः कर्मदंडस्तथैव च**
**यस्यैते नियता दंडास्त्रिदंडीति स उच्यते ॥**

शम, दम, श्रद्धा, समाधान, श्रवण, मननाभ्यासादिकार्थे, वाग्दंड, मनोदंड शरीरदंड असे सांगितले आहेत; ते नसून केवळ वेणुदंडें यतिवेष व—

**यस्त्वसंयतषड्वर्गः प्रचंडेंद्रियसारथिः**
**ज्ञानवैराग्यरहितं त्रिदंडमुपजीवति ॥**
**तितिक्षाज्ञानवैराग्यशमादिगुणवर्जितः**
**भिक्षामात्रेण यो जीवेत्स पापी यतिवृत्तिहा ॥**
**सुरानात्मानमात्मस्थं निन्हुते मां च धर्महा**
**अविपक्वकषायोस्मादमुष्माच्च विहीयते ॥**

आंत कामक्रोधादि प्रबळ, व शम, दम, ज्ञान, वैराग्यादि रहित भिक्षामात्रें दंडावर जिवन, त्यानें देव, पितर, सर्वांस नाडलें असून:—

**वपनदंडकमंडलुगैरिकैरपि सुभस्मपटादिविधारणैः**
**शमदमादिभिरुज्झितमानसो भवतिनैव यतिश्च न**
**[ उच्यते ॥**

वपन, दंड, कमंडलु, काषाय, भस्म, रुद्राक्ष धारण, मात्रें यति होत नसतां मुक्त होत नाहीं. मुख्यत्वें:—

**ज्ञानदंडो धृतो येन एकदंडी स उच्यते**
**काष्ठदंडो धृतो येन सर्वाशी ज्ञानवर्जितः**
**स याति नरकान् घोरान् महारौरवसंज्ञकान् ॥**

ज्ञानरूपदंडच अवश्य तो नसतां काष्ट दंड धारणें, महारौरवनरकीं जातो आणि—

**ब्रह्मतत्त्वं न संज्ञातं त्यक्तं चैव स्वकर्मकं**
**भ्रष्टो लोकद्वयेनाशु या तियात्यसौ निरयेपुमान् ॥**

ब्रह्मतत्व यथाशास्त्र जाणत नसून तत्प्राप्त्यर्थ साधनही न करतां उद-राद्यर्थीयतिवेषानें स्वकर्म त्याग करतो तो उभयभ्रष्ट नरकांत जातो सारांश—

**प्रत्यक्तत्त्वविवेकाय संन्यासः सर्वकर्मणां**
**श्रुत्या विधीयते तेषां तत्त्यागी पतितो भवेत् ॥**
**चित्तविक्षेपशांत्यर्थं दंडकंथादिधारणं ॥**

कर्मत्याग सन्यास हा तत्वविवेचनार्थ, ह्मणजे श्रवणादिकें आत्माना-त्मपृथक् करून चित्त शांत निर्विषय करण्यास सांगितला आहेः—

**वाग्दंडे मौनमातिष्टेत्कर्मदंडे त्वनीहतां ।**
**मानसस्य तु दंडश्च प्राणायामो विधीयते ॥**

ह्मणजे दुर्वासना न होण्यास मौन्यानें वाचा, अक्रियत्वार्थे शरीर, प्राणरोधें मन, आकलन केलें पाहिजे. परंतु गृह, दारा, सुत, वित्त, लोकादि संगा-पासून असंग, स्वच्छंद, स्वतंत्र, झाल्याविना एकांत ध्यान धारणादिक न घडतां विक्षेप जात नाहीं तो प्रतिबंध न राहता वस्तुविचार करून दृढानुसंधानें देहाध्यास दूर व्हावा; यास्तव गृह, दारा, सुतादिक सर्व पदार्थ वासनेसह कर्मत्याग करून वपन, दंड, काषायादिक धारण सांगितलें आहे एवंः—

**देहात्मानौ पृथक्कृत्य यतिर्भवति नान्यथा ।**
**आत्मानात्मविवेकज्ञो यतिरेव नचेतरः ॥**

देह व आत्म्याचें पृथक् पण यथार्थ जाणून समुळ देहाध्यास दूर करील तोच यती, सन्यासी, त्यागी, मुक्त; इतर नव्हे. ज्यास अत्यंत क्षुधा व्याप्त झाली तो सर्व काम टाकून प्रथम भोजनोद्योग करितो; तद्वत् ज्यास दुःखरूपसंसाराचा खचित कंटाळा येऊन तीव्र मोक्षेच्छा झाली, तोच सर्व सोडून तत्साधनीं तत्पर होतो त्यासच कर्मत्याग संन्यासाधिकार आहे असें नसतां केवळः—

**देहन्यासी च संन्यासी नैव काषायवाससा ॥**

देहेंद्रियें पोषणार्थ, काषायादिकेंशरीर सन्यासवेष, व आंत अज्ञानवासना कामक्रोधादिक धडधडीत, त्यानें बाह्यसंसार, कुटुंबमात्र त्याग केला परंतु आंत घराचार मांडला आहे तेथें वासनेचें सर्वकुटुंब कामादिक आहे; तें दृढ विवेक वैराग्यावांचून दूर होत नसतें; ह्मणून यास नाममात्र संन्यास ह्मटला पाहिजे. यानें कोणतेंच साफल्य नसतां संसारयातना सुटत नसून उलट ज्ञान, कर्म उभय भ्रष्ट होऊन महा रौरवीं जातात जसाः-

**वेष्ट्यो न ताडितः सर्पो वृथा वल्मीकताडनं ।**
**मनसो निग्रहो नास्ति वृथा कायस्य मंडनं ॥**

सर्प घरांत शिरला तो आंतच प्रतिष्ठित असून बिळावर दंडप्रहार करणें हें व्यर्थ. तसा मन, परिवारकामादिक निग्रह नसून बाह्य आश्रमादिकें कायेची विटंबना, ती वृथा. तात्पर्य. ज्ञानहीनानीं आश्रमधर्माची किंचित् अवज्ञा न करता जसा राजदानाध्यक्ष मी दाता अशी आढ्यता न बाळगून स्वाधिकाराचें कर्म निर्हेतु, निरभिमान, यथास्थीत करतो, याप्रमाणें मी कर्म करितों हा अहंकार न ठेवून फलेच्छारहित यथोचित कर्मोपासना करावी त्यासच नैष्कर्मसिद्धिफल होत आहे. एवं कर्मत्याग ही न करून कर्तेपणाही आपणाकडे वेऊं नये तर क्रमानें मनेप्सित परमपुपुरुषार्थप्राप्ती कृतकृत्यता होऊन कर्मातून मुक्तता होत आहे.

प्र०—परमपुरुषार्थ ह्मणजे काय? आणि किती प्रकारचा कशास ह्मणतात.

स०—सकळ पुरुषांचे इच्छेचा जो विषय धर्म, अर्थ, काम, मोक्ष, या चार प्रकारें पुरुषार्थ ह्मटला आहे. त्यांत प्रथमचे तीन गौण होत ते सोडून शेवटचा चतुर्थ जो मोक्षरूप मुख्य, तोच विवेक्यास अवश्य ग्राह्य असून त्यासच परमपुरुषार्थ ह्मणतात. कारण सर्वत्रांस अत्यंतदुःखनिवृत्ती, निरंतरसुखप्राप्तीची इच्छा असते; आणि नित्यसुख जें त्यासच मोक्ष, परमपुरुषार्थ, ह्मटला आहे.

प्र०—समस्त पुरुषांस दुःख होण्याचें मूळ कारण काय व त्याची अत्यंत निवृत्ती, नित्यसुखप्राप्ती कोणत्या साधनानें, केव्हां, कशी होत आहे?

स०—पुरुषास सर्व दुःखाचें मूळकारण स्वस्वरूपअज्ञान[1] आहे अज्ञानापासून अविवेक[2] होतो, अविवेकानें अभिमान[3]. अभिमानानें रागद्वेष[4], रागद्वेषानें शुभाशुभकर्म[5]. कर्मापासून धर्माधर्म; धर्माधर्में पुण्यपाप होतें. पुण्यपापफल, सुखदुःखभोगार्थ देह. देहाहंकारें दुःख, एवं भेदज्ञान, यासच अज्ञानादि ह्मणतात व या अज्ञानाचें कारण कांहीं नसून त्रिगुणात्मक[6] मिथ्याभ्रांती आहे; जशी रज्जू न कळण्यानें तीच सर्पभासून भयप्रद होते, तसा स्वस्वरूपविस्मरणानें देहच मी वाटतो या अज्ञानानें नामरूप जगत सत्य भासून भय व दुःख होत असतें, तस्मात विवेकविचारें जीवात्म्यऐक्यज्ञान यथार्थ जाणून समूळ देहाध्यास सोडला पाहिजे, ह्मणजे निःशेषअज्ञान[7] नष्ट होतें; अज्ञाननाशें अविवेकनाश होतो. अविवेक नष्टें अभिमान नाश होतो;

१ जीव आत्म्याचे ऐक्य अभेदज्ञान अभाव २ भेदज्ञान ३ देहात्मबुद्धी ४ अवस्तूंत वस्तुत्वबुध्या प्रीतिद्वेष ५ बरीवाईटक्रिया ग्रहणत्यागार्थी ६ सत्वादि तीन गुणांची ७ नानात्वभेद

अभिमाननाशें रागद्वेषनाश, रागद्वेषनष्टें कर्मअभाव, कर्माभावें पुण्यपाप अभाव; पुण्यपापाभावें देहाभाव; देह नाहीं तर दुःखही नाहीं; एवं मूळ अज्ञाननाशें सर्व दुःख नाश होऊन पुन्हा उद्भव न होतां निरंतर सुखप्राप्ती होते. आणि आत्मा अनात्मा पृथक् करणानें त्या ज्ञानाची-प्राप्तताहोते.

**प्र०**—आत्मा व आनात्मा सत्य मिथ्या कोणतें व कसें समजावें ?

**स०**—स्थूळ, सूक्ष्म, कारण, देहत्रयविलक्षण, पंचकोशव्यतिरिक्त, अवस्था-त्रयसाक्षी, सच्चिदानंद, चैतन्यमात्र, निर्विकार, सर्वांहून परदेहादिकीं सर्वत्र परीपूर्ण असून असंग, ज्ञानमात्र. तोच मी आत्मा व या व्यतिरिक्त देहा-दिकदृश्यमात्र अनृत, जड, दुःखात्मक, परिछिन्न[3], विकारी, तो आनात्मा ह्मणजे सृष्टींत जें जें दिसतें, भासतें, कळून येतें, तें तें मिथ्या अनात्मा, व जें न दिसे न भासे न कळे अविकारपणें सर्वांस जाणे तेंच सत्‌चित् आनंद आत्मरूप होय. यांत सत ह्मणजे सर्व असताचें अधिष्ठान जशी रज्जू मंदांध-कारामुळें सर्पत्वें भासते अशी निर्विकारब्रह्मात्म्यावर मायायोगें नामरूपसृष्टी भासत आहे अंधारनाशें सर्प नाहींसा होतो पण रज्जूचा नाश नाहीं तद्वत मायानाशें नामरूपजगाचा अभाव होतो पण अधिष्ठानाचा होत नाहीं असें जें देश, काल, वस्तु, परिछेदरहित त्रिकाल नित्य सत्य, ह्मणजे अमुक स्थळीं नाहीं असा परिच्छेद नाहीं. अमके समयीं नसतो, अमुक काळीं असतो, असा काल परिच्छेद नाहीं; अमक्या वस्तूंत असतो, अमुक पदार्थांत नसतो, असा वस्तु परिच्छेद नसून, आकाशवत् सर्वत्र पूर्णव्याप्त; ह्मणून आत्मा सद्रुप ह्मटला आहे. चिद्रुप ह्मणजे चैतन्य ज्ञानरूप त्रिकालाबाधित घटपटादिक सर्वांस प्रकाशक ज्या योगें ज्ञाता, ज्ञान, ज्ञेय, कर्ता, करण, क्रिया

१ सत्यमिथ्या २ सत्‌चेतन सुख ३ अल्प

भोक्ता, भोग्य, भोगणें, प्रकाशित होतात, अशी जी त्रिकालज्ञानशक्ती ज्या ज्ञानाचा कधींच लोप नाहीं ह्मणजे जागृतींतील शब्दादिकपंचविषय एकमेकांहून जरी भिन्न आहेत, तरी त्यांचें ज्ञान एकच आहे. जसा शब्द ऐकूं येतो, पदार्थ दिसतो, येथें शब्दाहून पदार्थ भिन्न झाला तथापि ज्या ज्ञानानें शब्द कळला, तेंच ज्ञान पदार्थ पहातें; तेंच ज्ञान रस जाणतें, असें ज्ञान ह्मणून एकच आहे. तसेंच स्वप्नांत अनेक विषय भासतात तरी तेथें ज्ञान एकच आहे याचप्रमाणें सुषुप्तींत कांहीं नाहीं जाणणें हें, पण ज्ञानच होय. जशी अमुक वस्तु अमुक ठिकाणीं आहे हें पाहणार डोळाच तशी ती तेथें नाहीं हेंही डोळाच पाहतो. तद्वत जें ज्ञान जागृत्स्वप्नांत सर्वांचें अस्तित्व प्रकाशितें तेंच ज्ञान सुषुप्तींत सर्वांचा अभाव प्रकाशीत असतें या अवस्थात्रयातें ज्ञान जसें एक तसेंच गतकाल व पुढें येणाऱ्याचें ज्ञान एक अभेदच आहे. याअर्थी तें उत्पत्तिनाशरहित नित्य सत्य स्वयंप्रकाश असें सिद्ध होत आहे; कारण वृत्यादिक सर्वांचे उद्भव, लय, जसे या ज्ञानास कळतात तसे या ज्ञानाचे उद्भव लय पाहणारा अन्य कोणी साक्षी दिसत नाहीं; आणि वृत्यादिक देहांन्त सर्वांस एकमेकांची जशी अपेक्षा आहे तशी या ज्ञानास कोणाची अपेक्षा पण दिसत नाहीं. असें जें निरापेक्ष साधनावांचून ज्ञान तेंच स्वप्रकाश, आत्मरूप असें श्रुतिशास्त्रें ह्मणतात यास्तव आत्मा चिद्रुप ह्मटला आहे. आनंदरूप ह्मणजे एकच गुळ अनेक पदार्थांत मिश्र केला असतां त्या दरेक पदार्थाची चव जरी पृथक भासते तरी त्या सर्वांत गोडी एकच गुळाची असते; तसें संपूर्ण आनंदाचें उम्द्भवस्थान जेथून विषयादि अखिलानंद उत्पन्न होतात ह्मणून आत्मा आनंदरूप ह्मणतात असा जो नित्य सत्य त्रिकालाबाध्य तो मी आत्मा व आपणास न जाणून अन्यासही न जाणे; असें जें अज्ञान आणि

१ निरापेक्ष

त्याचें कार्यभूत भौतिक दृश्यमात्र सर्व प्रपंच, असत् जड, नाशवंत, सापेक्षक, परप्रकाश, दुःखरूप, मिथ्या, तो अनात्मा असें जाणावें.

**प्र०**—असें जाण्यापासून विशेष उपयोग कोणता होत आहे?

**स०**—प्रपंचापवाद अज्ञानयोगें मजवर कल्पित आरोप आहे.

**यो हि देहं पृथक्कृत्य चिति विश्रम्य तिष्ठति**
**अधु नैव सुखी शांतो जीवन्मुक्तो भविष्यति॥**

मी जो नित्य, सत्य, स्वयंप्रकाश, आत्मा, तोच मी अज्ञानोपाधियोगें जीवत्वास आलों; कारण, सत्यज्ञानानंतब्रह्मलक्षणें श्रुति सांगतात, तींच लक्षणें पूर्वी सांगितलेली, साक्षीज्ञानाचीं, आहेत. यावरून जीवईश्वर उपाधिरूप जो प्रपंच तो दोरास सर्प ह्मणण्याप्रमाणें मिथ्याभ्रांती आहे. जेव्हां खऱ्या दोरास आपण विमरतों तेव्हां तोच सर्प भासून दुःखद होतो. याचप्रकारें स्वस्वरूप विस्मरणानें नामरूपें नानाकारविश्व सत्य व दुःखद भासतें; यास्तव विवेचनानें देहादिकाहून आत्मा पृथक् करून तोच मी सच्चिदानंद निर्विकार असें चित्तस्थैर्यें जीवब्रह्मऐक्यभावें निरंतर अनुसंधानें समूळ देहाध्यास सोडल्यास महत्सुखलाभ, उपयोग, असून सकलबंधांतून तत्काल मुक्तता होत आहे.

**प्र०**—शुद्धपरब्रह्मास जीव ईश्वरादिक प्रपंचारोप कसा आला व तो सत्य वा मिथ्या आहे?

**स०**—अनादि शुद्ध निर्विकार जें परब्रह्म त्यास अनादि प्रकृतिसंबंध कल्पित आहे; जीमध्यें सत्व, रज, तम, हे तीन गुण सारख्यामानानें असून ब्रह्मात्म्याची व्याप्ती आहे तिला प्रकृति, चित्छक्ति, मूलाविद्यादिक ह्मण-

तात. या प्रकृतिची प्रधान, निकृष्ट अशीं दोन रूपें आहेत तीच विद्या, अविद्या नामें होय ( एकत्वबोधक ती विद्या; अनेकत्वबोधक ती अविद्या. अविद्येचे अभावि विद्या विद्येचे अभावीं अविद्या ह्मणतात ). या प्रकृतींत जीवाचीं पुण्यपापात्मक अनादि कर्मे वासनारूपें बीजांत वृक्षवत गुप्त असतात; तीं कर्में सृष्टीचे आरंभीं फलोन्मुख होतात तेव्हां ही प्रकृती गुणवैषम्यास ( सत्वाधिक्यास ) प्राप्त होऊन, तिचे विद्या, अविद्या असे दोन प्रकार स्पष्ट होतात; ज्यांत शुद्धसत्व अधिक असून इतर दोन गुणांनीं गढुळ झाली नाहीं, तिला विद्यामाया ह्मणतात. ज्यांतील सत्वगुण रजतम गुणानें गढुळ झाला ती अविद्या ह्मटली आहे. पहिली शुद्धसत्वप्रधान जी माया त्यांत अधिष्ठान चैतन्याचें प्रतिबिंब झालें तो शुद्धसत्वोपाधिमुळें जगत्कर्ता ईश्वर व अविद्येंत अधिष्ठानचैतन्याचें जें प्रतिबिंब उमटलें तो मलिनसत्वोपाधिमुळें जीव; या उभयतांस स्थूळ, सूक्ष्म, कारण, अशीं तीन शरीरें असून पूर्वोक्त जीवास कर्मफलभोग व्हावा ह्मणून, ईश्वरेच्छेनें मायेपासून पंचतन्मात्रात्मक सूक्ष्म पंचमहाभूतें, व त्यापासून वासनामय सूक्ष्म शरीरें, भासमात्र उत्पन्न झालीं. तेथें भोग स्पष्ट घेतां येत नाहीं ह्मणून आकाशादिक पंचमहाभूतें स्थूल उत्पन्न केलीं. त्याचे पंचीकरणेंकरून स्थूलदेहादि दृश्यमात्र झाले; या देहांत अन्नमयादिक पंच कोश आहेत, त्यांत जीव वेष्टीत होऊन स्वस्वरूपविस्मरणानें जन्ममरण दुःख भोगतो व ईश्वर मायोपाधित अलिप्त राहून स्वस्वरूपस्मरणामुळें नित्यमुक्त आहे या विद्या अविद्या उपाधी बाधित केल्या तर जीवईश्वर एकब्रह्मरूपच ठरत आहे एवं एकच परब्रह्मास उपाधिभेदें जीवेश्वरभेद व जगदारोप आला तो मिथ्या होय. पंचकोशविवेचनानें मी आत्मा असंग, अक्रिय, अभोक्ता, असें ज्यास दृढज्ञान होईल तो ब्रह्मच होतो.

१ उत्तम २ कनिष्ठ

**प्र०**—या आरोपाची निवृत्ती कोणत्या साधनानें केव्हां होते व त्यापासून फल काय होत आहे. ?

**स०**—ब्रह्मस्वरूपज्ञानानें विद्या अविद्या निवृत्त होतात विद्या अविद्या-निवृत्तीनें विद्या व ब्रह्मसंबंध यांची निवृत्ती. विद्या व ब्रह्मसंबंधनिवृत्तीनें जीव-ईश्वरभावनिवृत्ती; जीवईश्वरभावनिवृत्तीनें जीवईश्वरभेदाची निवृत्ती. या प्रकारें देहत्रय पंचकोश विवेचनानें एकेच काळीं सर्व आरोपांची निवृत्ती होऊन शुद्धज्ञानानें जीवन्मुक्तीफल होत आहे व सर्व विश्व आपणच आहोंत असें स्पष्ट अनुभवीं येतें यास्तव जसा

**नीरात् क्षीरं पृथक्कृत्वा हंसो भवति नान्यथा ।**
**क्षीरनीरविवेकज्ञो हंस एव न चेतरः ॥**

हंस नीर क्षीर पृथक् करितो तसा सत्यासत्य निवाडा करून देहाहून आत्मा पृथक् जाणून समूळ देहाध्यास दूर करील तोच यती व मुक्त. इतर नव्हे.

**प्र०**—जीव ईश्वराचीं तीन शरीरें पूर्वीं संक्षिप्त सांगितलींत परंतु स्पष्ट बोध झाला नाहीं तर कारणशरीरादि कसें झाले व जर सर्व एकच परब्रह्म आहे तर एक अज्ञ एक सुज्ञ एक बध्ध एक मुक्त असे विरुध्द किमर्थ ? कदाचित कर्मयोगें जीवास बंध म्हटला तर ईश्वर पण उत्पत्ती, पालन, संहार, दंड, अनुग्रह हीं कर्में करीत असून त्यास बाधक नसतां जीवास किंनिमित्त ?

**स०**—ज्याप्रमाणें कोणी पुरुषाचा वि[illegible] पूर्वीं त्यास गृहस्थ हें नांव नसून भार्यायुक्त झाल्यास [illegible] प्राप्त होतें त्याप्र-

माणें अनादिशुध्दनिर्विकार परब्रम्हास पूर्वी नामरूपरहित असंगपणा असून पूर्वोक्त त्रिगुणसाम्यामूळप्रकृती जेव्हां त्यास आवरण करून असते तेव्हां त्यास ईश्वरत्व प्राप्त होतें ( हेच प्रकृतिपुरूष होत ). म्हणजे वस्तुतः ब्रम्ह असंग असतां कल्पितउपाधियोगें औपचारिक नांव येत आहे तें अवास्तव होय आणि जसें एकच जलपूरितघटांत एकच चंद्राचें एकच प्रतिबिंब उमटतें त्याच घटाचीं दोन शकलें करून अमलजल व समलजल भरून ठेविलीं तर एकच चंद्राचीं दोन प्रतिबिंबें दोहींत पृथक् होतात तसें पूर्वोक्त चैतन्य जेव्हां त्रिगुणसाम्य प्रकृत्यावृत्त असतें तेव्हा त्या प्रकृतीचीं दोन रूपें विद्या अविद्या ज्या पूर्वी सांगितल्या त्याही त्यां प्रकृतीचे अंगभूत अस्पष्ट असतात त्यांत एकच अधिष्ठानचैतन्याचीं प्रतिबिंबें दोन रूपानें होतात त्यांत विद्याप्रतिबिंबितास ईश्वरनाम पूर्ववत तसेंच राहून अविद्याप्रतिबिंबितास कुटस्थ( जीव )त्व येत आहे म्हणजे वस्तुतः चैतन्याचे ठिकाणीं भेद नसून नामाचा उपचार ही सत्य नाहीं तथापि जसें सूर्यास तमारि हें नांव आहे पण विचारें पहातां सूर्याचें रूपच प्रकाशमय असतें. अंधकाराशीं युद्ध करून त्यानें हें नांव मिळविलें असें नाहीं तस्मात तमारी हें नांव सूर्याचे ठिकाणीं केवळ उपचारिक आहे तसेंच चैतन्यास ही उपाधियोगें जीवत्व ईश्वरत्वाचा कल्पित आरोप आहे तो वास्तविक नाहीं हीच प्रकृती जेव्हां तमोगुणाधिक्य वैषम्यतेस प्राप्त होते तेव्हां त्यासच कारणशरीर ह्मणतात ह्मणजे पूर्वोक्त ईश्वर कूटस्थ यांचीं जीं त्यांत प्रतिबिंबें उमटलीं तींच त्या कारणशरीराच्या समष्टी व्यष्टि अभिमानामुळें स्वस्वरूप विसरून अव्याकृत व प्राज्ञ अशी संज्ञा पावतात हीच अव्याकृताची प्रलयावस्था व प्राज्ञाची सुषुप्ती अवस्था होय या उभयतांचें कारण ॰रीरांत समष्टि व्यष्टि इतकाच भेद आहे. सर्वशरीराच्या अभिमा॰ ॰म समष्टित्वें अव्याकृत व एकच शरीरा-

१ ज्या अधिष्ठ॰ ॰षते त्यास ब्रह्म ह्मणतात २ ज्यावर ॰भ्रमाने एकत्र देह ॰. ३ समुदाययुक्त ४ एकत्र.

च्या अभिमानामुळें जीवास व्यष्टित्वें प्राज्ञ संज्ञा आहे हेंच अव्याकृत व प्राज्ञ तमोगुणाधिक्यावृत होतें, तें स्वोपाधिकृत सत्वगुणाधिक्यवैषम्यतेनें होय. जेव्हां समष्टि व्यष्टि सूक्ष्मशरीराभिमानी होतात तेव्हां सर्व जीवांच्या अपंचीकृत सूक्ष्म शरीराची जो एकत्रता तीच ईश्वराचें सूक्ष्म शरीर असून पूर्वोक्त जो अव्याकृत तोच सर्वांतर्यामित्वें अभिमान धारणकरण्यानें या देहीं हिरण्यगर्भ नाम पावतो व एकच सूक्ष्मशरीराच्या अभिमानामुळें पूर्वोक्त प्राज्ञ त्यासच तैजस नांव आलें असून तेंच त्याचें सूक्ष्मशरीर होय आणि हिरण्यगर्भतैजसाची पूर्ववत ऐक्यता होते तेंच हिरण्यगर्भतैजस जेव्हां स्वकीयोपाधिकृत रजोगुणवैषम्यतेनें समष्टि व्यष्टि स्थूलशरीराभिमानी होतात तेव्हां स्थूलपंचीकृत पंचमहाभूतापासून उत्पन्न झालें जें जगद्रुपसमष्टिशरीर तेंच ईश्वराचा स्थूलदेह असून त्या देहाचे अभिमानामुळें पूर्वोक्त हिरण्यगर्भास विराट नाम आलें; व स्थूलपंचीकृतपंचमहाभूतांचें जें जगदंतपार्ती व्यष्टिशरीर तोच जीवाचा स्थूलदेह असून याचा अभिमानी जो पूर्वोक्त तैजस त्यासच विश्वसंज्ञा येत आहे आणि विराट विश्व यांची ऐक्यता पूर्ववत होते एवं जशी ईश्वराचीं दोन रूपें एक नित्य सत्य सामान्य चैतन्य ब्रह्म; दुसरें अनित्य मायीक विशेषचैतन्य ईश्वरत्व यांत मायीक तें मायोपाधिबाधित झाल्यास नाहींसें होतें; ह्मणून मिथ्या. तशींच जीवाचीं दोन रूपें, एक नित्य, सत्य, सामान्य, चैतन्य, कूटस्थ; दुसरें अनित्य, आविद्यक, विशेष, चैतन्य, चिदाभास, तें अंतःकरणोपाधिबाधित झाल्यास नष्ट होतें. ह्मणून मिथ्या अशीं, एकच चैतन्याचीं दोन्हीं प्रतिबिंबें असून विद्या अविद्या उपाधिभेदें जीवेश्वर भेद झाला. वास्तविक एकच आहे. यांत जसा ऐंद्रजालिक आपले मायेनें अनेक खेळ करून इतरांस मोहित करितो पण, आपण मोह पावत नाहीं; कारण त्यास स्वस्वरूपाचें सतत स्मरण असतें. तसा ईश्वर शुद्धसत्वोपाधिमुळें आपल्या मूलाधिष्टानास

१ समुदाययुक्त २ एकत्र

न विसरल्यानें ती माया त्याचे स्वाधीन असून कर्मकर्तृत्वाभिमान कर्मजन्य फलेच्छा ही नसतां, ही सर्व माझीच कल्पितमाया मिथ्या आहे अशानिश्चयें त्यांत प्रीतिद्वेष पण नाहीं ह्मणून सर्वज्ञ, सर्वशक्ती, नित्यमुक्त, सृष्टीसृजनादिक कर्म करीत असून त्यांत अलिप्त, असंग, स्वतंत्र, आहे; व जीवाची उपाधि अविद्या नाना व विचित्र यास्तव जीव अविद्येंत मोहित होऊन स्वस्वरूप अभानानें देव, तिर्यक् मनुष्यादिक त्या त्या देहतादात्म्यें कर्ता भोक्ता झाला ह्मणून अल्पज्ञ अल्पशक्ती परतंत्र बद्ध झाला जसा रज्जूवर सर्पाचा उद्भव कालत्रयीं झाला नसून, अंधारामुळें रज्जू न कळल्यानें भासतो तसा मूलाधिष्टानीं स्थूलसूक्ष्मादिजगत्प्रपंचाचा उद्भव कालत्रयीं झाला नसून मायोपाधियोगें स्वस्वरूप अज्ञानानें भासतो; या देहद्वयास मूळ कारण कांहीं तरी असलें पाहिजे; ह्मणून या अज्ञानासच कारणशरीर नांव खरें नसतां उपचारिक आलें आहे तें स्थूल सूक्ष्म देहद्वयकार्यावरून अनुमानानें मात्र जाण्यास योग्य आहे. वास्तव जर अधिष्टानसत्तेहून पृथक केलें तर यास कांहींच रूप नसता अस्तित्वही नाहीं असें जें जगदुत्पत्तीचें मूळ ह्मणून त्यास कारणशरीर ह्मणतात.

**प्र०**—पूर्वीं आपण त्रिगुणसाम्यावृत्त परब्रह्मापासून सत्वगुणाधिक्यानें जीवेश्वरोत्पत्ती सांगितली आणि सांप्रत तमोगुणाधिक्यें त्यांचें कारण शरीरासह सांगतां तर यांत पूर्वापर विरोध येत आहे.

**स०**—पूर्वीं सत्वगुणाधिक्यें उत्पत्ती सांगितली त्यांत हेतु इतकाच कीं कोणी एखादे धान्याचें बीज जलयोगें आपलें पूर्वरूप सोडून फुगलें मात्र असतें पण अंकूर[१] बाहेर पडला नसतां, तो बाहेर येण्याचा समय समीप असतो तद्वत तमोगुणाधिक्यावस्थेंत ह्मणजे प्रलयसुषुप्तींतच स्वस्व-

---

१ कोंम

रूपविस्मरणानें जीवईश्वराची अव्याकृत प्राज्ञ रूपानें उत्पत्ती झाली असते परंतु त्या अवस्थेंत कोणताच व्यवहार नसल्यामुळें त्यांजी उपलब्धी होत नाहीं व ज्या काळीं सत्वगुणाधिक्यरूप उपाधिवैषम्य प्राप्त होते त्यासमयीं ह्मणजे हिरण्यगर्भतैजसअवस्थेंत ( अहंब्रह्म ) या मायास्फूर्तियोगें अहंकाररूपकोम स्पष्ट बाहेर पडतो; त्यामुळें सामान्यानुमानें जीवेश्वराची उत्पत्तीचीं उपलब्धी होते; आणि त्यापासून पुढें पंचभूतादिक अखिलसृष्टी झाली यास्तव पूर्वी सत्वगुणाधिक्यें उत्पत्ती सांगितली एवं त्यांत व यांत विरोध नाहीं.

**प्र०**—या जीवेश्वराचीं सूक्ष्म, स्थूल, शरीरांचा, पण स्पष्ट बोध होईल अशीं कृपाकरून सांगितलीं पाहिजेत.

**स०**—पूर्वोक्त जो ईश्वर त्यापासून मायोपाधियोगें मी एकाचा अनेक होईन या इच्छेनें जसा स्वप्नांत एकच पुरूष वासनात्मक स्वसंकल्पानें अनेकत्वें होतो तशी शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, पंचतन्मात्रात्मक, आकाश, वायू, अग्नी, जल, पृथ्वी, अशीं पंचमहाभूतें सूक्ष्म, उत्पन्न झालीं. माया, त्रिगुणात्मिका व तिजपासून भूतें झालीं ह्मणून ते त्रिगुणही या भूतांत आले या त्रिगुणात्मक पंचभूतांपासूनच अखिल ब्रह्मांडें व चतुर्दश भुवनें व त्या भुवनांतील प्राणी आणि त्या प्राण्यास खाण्याचीं अन्नें व त्या त्या लोकांस योग्य अशीं शरीरें उद्भव पावलीं यांत पूर्वोक्त जो कारण शरीराभिमानी प्राज्ञसंज्ञक जीव त्यास पुण्य पापकर्माचा सुखदुःखभोग व्हावा ह्मणून पंचभूतांचे उत्तम, मध्यम, कनिष्ट, तीन विभाग करून सर्व सृष्टी केली ह्मणजे शुद्ध निर्विकारब्रह्मीं ज्ञानाज्ञान दोन्हीं नसुन विशेषाकारें जें ज्ञान स्फुरलें तीच माया ती स्वतः निःसत्व जड असतांही अधिष्टान सत्तेनें चेतन होऊन विशेष ज्ञान ( जाणतेपण ) आलें. विशेष जाणीव आल्यानें अज्ञान ( नजाणणें ) ही अर्थांतच येतं आहे. तसेंच

ज्ञानाज्ञान मिश्रणानें तिसरें अन्यथाज्ञान ( विपारितजाणणें ) ही आलें हेच त्रिगुण सत्व रज तम होत. यात सत्व गुणज्ञान ह्मणजे ( यथार्थ जाणणें ) तमोगुणअज्ञान ( नजाणणें ) रजो गुण अन्यथाज्ञान ( ज्ञानाज्ञान मिश्रण विपरित जाणणें ) यांचे त्रैविभागें ज्ञानशक्ति, क्रियाशक्ति, द्रव्यशक्ति, या उत्पन्न होऊन त्यापासून ज्ञाता ज्ञान, ज्ञेय, भोक्ता, भोगणें; भोग्य, कर्ता; कर्म, करण इत्यादिक त्रिपुटि उत्पन्न झाल्या पैकीं सत्वगुणज्ञानशक्तीप्रतिबिंब ( जीव ) योगें भोक्ता, रजोगुणक्रियाशक्तीभोक्त्याचें साधन तमोगुणद्रव्यशक्तीजडमात्रभोग्य होय यांत प्रथम

**पंचप्राणमनोबुद्धिदशेंद्रियसमन्वितं ।**
**अपंचीकृतभूतोत्थं सूक्ष्मांगं भोगसाधनं ॥**

पंचप्राण, पंचज्ञानेंद्रियें, पंचकर्मेंद्रियें, मन, बुद्धी अशीं सूक्ष्म सत्रा तत्वें एकीकरणानें अपंचीकृतसूक्ष्मदेह भोगसाधनरूपभासमात्र वासनेचा निर्माण झाला. ह्मणजे एकच वासना सत्रा प्रकारें विभाग पावली ती अशी—

**व्योम्नः श्रोत्रं भुवो घ्राणं जलाज्जिव्हाथ तेजसः**
**चक्षुर्वायोस्त्वगुत्पन्ना तेषां भौतिकता ततः ॥**

आकाशाचे श्रोत्र, पृथ्वीचें घ्राण, जलाचीजिव्हा, तेजाचे चक्षु, वायुची त्वचा, अशीं पंचमहाभूतसत्वांशापासून एकेक निराळीं उत्पन्न झालीं आणि

**व्योमादीनां समस्तासात्विकांशेल्प एवतु**
**जायते बुद्धिमनसी बुद्धिः स्यान्निश्चयात्मिका**

सर्वभूताचे सात्विकांश एकीकरणानें मन बुद्धी होतात यासच अंतःकरण ह्मणतात यांत संशयात्मक तें मन, निश्चयात्मक ती बुद्धी; असे हे सात पंचभूतसात्विकांशाचे झाले. तसेच

**वाक्पाणिपादपायूपस्थानि कर्मेंद्रियाणि तु**
**व्योमादीनां रजांशेभ्यो व्यस्तेभ्यस्तान्यनुक्रमात् ॥**

वाचा, हस्त, पाद, गुद, उपस्थ, हीं पंचकर्मेंद्रियें पंचभूत रजांशापासून पृथक पृथक झालीं व

**समस्तेभ्यो रजोंशेभ्यः पंचप्राणादिवायवः**
**जायते सप्तदशकमेवं लिंगशरीरकं ॥**

सर्व भूतांचे रजांश मिळून पंचप्राण होतात. येणेंप्रकारें पंचप्राण पंचकर्मेंद्रियें, पंचज्ञानेंद्रियें, मन, बुद्धी, अशीं सत्रा तत्वें मिळून एक लिंगशरीर होत असतें त्याचा परिस्फोट असा; १ आकाश शद्बगुणी आहे त्यांतील सत्वगुणभाग श्रोत्र, रजोगुणभाग वाचा, श्रोत्र शद्बग्रहण करितात; वाचा शब्दोच्चार करते, श्रोत्रज्ञानेंद्रिय व वाचा कर्मेंद्रिय आहे; २ वायु स्पर्शगुणी असतो याचा सत्वगुणभाग त्वचा, रजोगुण भाग हस्त, त्वचा स्पर्शग्राहक व हात देणेंघेणें करितात, त्वचा ज्ञानेंद्रिय पाणी कर्मेंद्रिय होय; ३ अग्नी प्रकाशधर्मी; याचा सत्वगुणभाग चक्षु, रजोगुण भाग पाद; चक्षू रूप अवलोकन करतात; पाय गमन करतात; चक्षु ज्ञानेंद्रिय, पाद कर्मेंद्रिय आहेत. ४ जल रसगुणी यांतील सत्वगुणभाग जिव्हा रजोगुण उपस्थ, जिव्हा रसग्राहक आणि उपस्थ विसर्गकर्मे, जिव्हा ज्ञानेंद्रिय उपस्थ, कर्मेंद्रिय. ५ होय पृथ्वी गंधगुणी, यांतील सत्वांशभाग घ्राण, रजोगुणभाग गुद, घ्राण गंधगृहणाधिकारी, गुद मलत्यागकर्मी, घ्राण ज्ञानेंद्रिय, गुदकर्मेंद्रिय आहे. पंचभूत सत्वांशमिश्रणाचें अंतःकरण झालें तसेंच पंचभूत रजांश मिश्रणाचे पंचप्राण झाले

**एतल्लिंगशरीरं तु तप्तायः पिंडवद्यतः ।**
**परस्पराध्यासयोगात्साक्षिचैतन्यसंयुतं ॥**

असें हें लिंगशरीर केवळ जड असून अधिष्ठानसत्तेनें अग्निसंयोगें लोह तप्त दाहक होतें तद्वत इंद्रियादिक आपापलें कर्मकर्ते होतात. यासच चिज्जडग्रांथि ह्मणतात ह्मणजे पूर्वी जे प्रकृतीपुरूष सांगितले त्या उभयांशेंच संपूर्ण विश्व बनलें त्यांत चेतनांश भाग पुरुषांत, जडत्वभागें देहेंद्रियादिक प्रकृती अंग होय. या प्रकतीरूप अंतःकरणांत चेतनात्म्याचे प्रतिबिंब झालें. स्वस्वरूप विसरून अविवेकें देहेंद्रियतादात्में जड चेतन एक करून कर्ता भोक्ता होतो; व देहसंबंधाचें सर्वांचे धर्म कर्म आपणावर घेऊन अनेक जन्मार्जित पुण्य पाप भोगार्थ तदनुसार शरीर धरतो आणि देहांतकाळीं कर्मानुसार वासना जाईल तिकडे प्राणमनादि सत्रा जातात. एवं कर्मभोग सरतांच वासनेनें स्थूल देह सोडला कीं बुद्धीनाशें प्रतिबिंब नाश होतें ह्मणून देह निचेष्टित जडवत् पडतो त्यास व्यवहारांत मरण ह्मणतात. तेकाळीं वायूंत गंधवत हा जीव पूर्वोक्त वासनात्मक सूक्ष्मदेहीं अस्पष्ट राहून पुन्हा ही वासना नूतन देह धरील तेथें सत्रा तत्वें व प्रतिबिंबजीव हीं स्पष्ट होतो यास जन्म ह्मणतात. हाच देह सर्व दुःखास मूळ असून ही वासना आपल्या मुळ उगमास विसरून भिन्न पडली ती परत स्वस्वरूपीं न मिळेल तावत महा प्रलयीं पण हिचा नाश नसतां जेथें जल तेथें अर्क-प्रतिबिंब तद्वत वासना हेंच लिंगशरीर व त्यांत अधिष्टान चैतान्याचे प्रतिबिंब जीवरूपें होऊन जन्ममरण भ्रमण करीत आहे.

**इदं लिंगशरीराख्यमामोक्षान्न विनश्यति**
**आत्माज्ञानाविनष्टेस्मिन्साविद्ये सशरीरके ॥**

या वासनात्मक लिंग शरीराचा आमोक्षांत नाश नसून दुःख दूर होत नाहीं. आत्मज्ञानें अविद्या नष्टेंच नाश होतो अन्योपाय नाहीं. या सूक्ष्म-

शरीरास भोग साधनरूप स्थूलशरीर असणें अवश्य आहे कारण वासनेनें जें पूर्वोक्त कल्पित शरीर सूक्ष्म धरलें तेथें स्थूलभोग स्पष्ट घेतां येत नाहीं; त्या भोगापेक्षेनें या वक्ष्यमाण स्थूलदेहाचा उद्भव होत असतो जसा वर्ख कुटण्यास चर्माचें आवरण वर द्यावें लागतें तेव्हां आंत पत्रा वाढतो तसा स्थूल भोग सुखदुःख भोगण्यास सूक्ष्म देहावर हा स्थूलदेह निर्माण केला तो असा. पूर्वोक्त पंचमहाभूतांतील त्रिगुणापैकीं सूक्ष्मदेहांत सत्व, रजअंश, ज्ञानक्रिया कळणें, चळणें, चेतनत्व, चंचलत्व असे दोन्ही विभाग जाऊन बाकीचा जो तमोगुणांश द्रव्यशक्तिरूप निकृष्टभाग केवळ जड उरला त्याचें पंचीकरण करून पंचवीस तत्वांचा मांसमय स्थूलदेह भोगायतनरूप आणि पदार्थ मात्र भोग्य उत्पन्न केले ते

**पंचीकृतमहाभूतसंभवं कर्मसंचितं**
**शरीरंसुखदुःखानां भोगायतनमुच्यते ॥**
**द्विधा विधाय चैकैकं चतुर्धाप्रथमं पुनः**
**स्वस्वेतरद्वितीयांशैर्योजनात्पंच पंच ते ॥**

पंचभूतांचे दोन दोन भाग प्रथम करून त्यांतून स्वतांचा मुख्य एकेक भाग ज्याचा त्यांत तसाच ठेवून उरलेल्या अर्ध्याचे पुन्हा चार चार भाग केले व ते एकेक भूतांत परस्पर मिळविले अशी मिळून पांचाचीं पंचवीस तत्वें एकीकरणानें हा स्थूल देह भोग घेण्यायोग्य जडत्वें स्पष्ट झाला या भूतांचे आपापले मूळ धर्म अस्पष्ट प्रथम होते ते पुढील कोष्टकाप्रमाणें.

| | आकाशचो | वायूचे | अग्नीचे | जलाचे | पृथ्वीचे |
|---|---|---|---|---|---|
| १ | अंतःकरण | मन | बुद्धी | चित्त | अहंकार |
| २ | व्यान | समान | उदान | प्राण | अपान |
| ३ | श्रवण | त्वचा | चक्षू | जिव्हा | घ्राण |
| ४ | वाचा | पाणि | पाद | उपस्थ | गुद |
| ५ | शद्ब | स्पर्श | रूप | रस | गंध |

यांचे पंचीकरण ह्मणजे वांटणी करून मुख्य अर्धभाग ज्याचा त्यांत तसाच ठेवून अर्ध चार भाग चौंहीस खालीं दाखविल्या कोष्टकाप्रमाणें परस्पर वाटून दिले ते—

| | पंचभुतें | आकाश | वायू | अग्नी | जल | पृथ्वी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | आकाश | अंतःकरण मुख्य. | व्यान | श्रवण | वाचा | शद्ब |
| २ | वायू | मन | समान मुख्य | त्वचा | पाणि | स्पर्श |
| ३ | अग्नी | बुद्धी | उदान | चक्षु मुख्य | पाद | रूप |
| ४ | जल | चित्त | प्राण | जिव्हा | उपस्थ मुख्य | रस |
| ५ | पृथ्वी | अहंकार | अपान | घ्राण | गुद | गंध मुख्य |

वर सांगितल्याप्रमाणें अंतःकरण मनादिक पांच एकत्र झाल्यानें आकाशाचे कामक्रोधादिक पांच धर्म स्पष्ट होऊन जाणतेपणानें देहाचें रक्षण होत असतें. व्यानसमानादिक पांच एकत्रतेनें वायुचे चलनवलनादिक पांच धर्म स्पष्टत्वें देहाची सर्व क्रिया होऊं लागली. श्रोत्र त्वचादिक

पांच एकीकरणानें अग्नीचे क्षुधा तृषादिक पांच गुण भासक झाले त्यानें देहाचें पोषणादिक होतें. वाचा पाणि आदि पांच एकत्र मिळाल्यानें जलाचे शुक्र शोणितादिक पांच द्रवत्वे झाले त्यानें सर्वांगसंधी पूर्ण भरतात शद्बस्पर्शादिक पंच एकत्र झाल्यानें पृथ्वीचे अस्थिमांसादिक पांच जडत्वें सर्व शरीरास आधारभूत होतात हे पुढील कोष्ठकाप्रमाणें.

| | पंचभूतें | पंचभूतांचीं तत्वें | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | आकाश | काम | क्रोध | शोक | मोह | भय |
| २ | वायू | चलन | वलन | धावन | प्रसारण | अकुंचन |
| ३ | अग्नी | क्षुधा | तृषा | आळस | निद्रा | मैथुन |
| ४ | जल | शुक्र | शोणित | लाळ | मूत्र | स्वेद |
| ५ | पृथ्वी | अस्थि | मांस | त्वचा | नाडि | रोम |

## यांचा स्पष्टार्थ.

(१.) **आकाशाचीं** कामक्रोधादिक पांच तत्वें आहेत, यांत १ काम हा आकाशांत वायुचा भाग आहे कारण कामनेनें, वृत्ति चंचल असते व वायुस्वभाव पण चंचल ह्मणून कोणतीही कामनीकचंचलता वायूपासून उद्भवत असते; २ क्रोध हा आकाशांत अग्नीभाग असतो क्रोधाच्या आवेशानें शरीर तप्त आरक्त होत असतें आणि अग्नी तप्त आरक्त स्वभावींच आहे यावरून क्रोध हा अग्नीपासून होत आहे; ३ शोक हा आकाशांत स्वतःचा मुख्य भाग आहे शोकप्राप्तीनें शरीर शून्याकार होतें व आकाश शून्यस्वभावी आहे; ४ मोह हा आकाशांत जलभाग आहे. मोह पुत्रादिकांकडे पसरतो जल प्रसरण स्वभावींच आहे; ५ भय हा

आकाशांत पृथ्वीभाग आहे भयानें शरीर अक्रिय, जड होत असतें, आणि पृथ्वी जड स्वभावींच आहे.

( २. ) **वायूचीं** चलनवलनादिक पांच तत्वें आहेत यांत १ चलन हा वायूंत जलभाग होय चलन चालण्यास ह्मणतात जल पण चालत असतें; २ वलन हा वायूंत अग्नीभाग होय वळण वळविण्यास ह्मणतात व तेजाचा प्रकाश ही वळत असतो; ३ धावन हा वायूंत स्वतःचा मुख्य भाग आहे धावन वायूचा स्वभाव आहे; ४ प्रसारण हा वायूंत आकाशभाग आहे प्रसरण पसरण्यास ह्मणतात व आकाशही सर्वत्रीं पसरलेंच असतें; ५ आकुंचन हा वायूंत पृथ्वीअंश होय पृथ्वी पण संकोचित स्वभावी आहे.

( ३. ) **अग्नीचीं** क्षुधा तृषादिक पांच तत्वें आहेत. यांत १ क्षुधा हा अग्नींत स्वतःचा मुख्यभाग आहे, क्षुधा प्रदीप्त असल्यास जें भक्षण केलें तें पचन होतें व अग्नींत जें पडलें तें भस्म होतें; २ तृषा हा अग्नींत वायु आहे वायु आर्द्रवस्तुस शुष्क करतो कंठही तृषेनें शोषतो; ३ आळस हा अग्नींत पृथ्वीभाग होय आळसानें देह जड होतो पृथ्वी जडच आहे; ४ निद्रा हा अग्नींत आकाशअंश होय निद्रेंत देह शून्यवत् होतो आकाश शून्यच आहे. ५ मैथुन हा अग्नींत जलाचा भाग आहे.

( ४. ) **जलाचीं** शुक्र शोणितादिक पांच तत्वें आहेत यांत १ शुक्र हा जलांत स्वतःचा मुख्यभाग आहे, शुक्र श्वेत असून गर्भाचा मूळ हेतू आहे जलही श्वेत असून वृक्षाचा मूळ हेतू आहे; २ शोणित हा जलांत पृथ्वीअंश असतो शोणित रक्तवर्ण जड असतें पृथ्वी पण जड रक्तवर्ण असते; ३ लाळ हा जलांत व्योमांश आहे लाल निंच उंच होते आकाशही निंच उंच भासतें; ४ मूत्र हा जलांत अग्नी आहे

मूत्रावरून ज्वरपरिक्षा होते वन्ही ज्वररूपच आहे; ५ स्वेद हा जलांत वायुभाग आहे श्रमानें घाम येतो वायु पण पंखाआदिक श्रम करण्यांत उद्भवतो.

( ५ ) पृथ्वीचीं अस्थी मांसादिक पांच तत्वें आहेत. यांत १ अस्थि हा पृथ्वींत स्वतःचा मुख्य भाग होय अस्थि श्वेत पीत काठिण असलात पृथ्वी पण कठिण क्वचित श्वेतपीत असते; २ मांस हा पृथ्वींत जलभाग आहे मांस आर्द्र असतें जल ही आर्द्र आहे; ३ त्वचा हा पृथ्वींत वायूभाग आहे शीतोष्ण स्पर्श त्वचेनें कळतात वायू स्पर्शधर्मीच आहे; ४ नाडी हा पृथ्वींत अग्नीभाग असतो नाडीनें ज्वर कळतो अग्नी ज्वररूपच आहे; ५ रोम हा पृथ्वींत व्योमांश होय रोम शून्यवत् आहेत कापल्यानें पीडा होत नाहीं आकाश शून्यस्वभावीच आहे. याप्रमाणें हीं सर्व तत्वें एकीकरणानें स्थूलदेह होतो आणि पूर्वोक्त सूक्ष्मदेह संयोगें चलन वलन ज्ञानक्रिया घडतात. जसें मृत्तिका पाषाणादि एकत्रतेनें गृह होते तसें अस्थि स्तंभाकार नाडीदोर मलमूत्रादिनें आंतून सर्व भरून मांसशोणित लेपनें वरून चर्मानें शोभित केलें त्यांत लिंगदेह वायवादि प्रवेशानें शब्दादिक क्रिया होऊं लागल्या असें हें स्थूलशरीर भूत तमोगुणाशीं केवल जड अति अमंगळ अपवित्र निःसार तुच्छ मिथ्या आहे.

**प्र०**–अशीं हीं देहादिक तत्वें मिथ्या जाणण्यांत काय उपयोग होत आहे?

**स०**–काम उत्पन्न होतो, शमन होतो, क्रोध उद्भव लय पावतो, लोभ उत्पत्ति नाश होतो असे शोक मोह क्षुधा तृषा आळस निद्र भयादिक उद्भव लय पावतात या सर्वांस मी जाणतों असें जें मीपण तूं मिरवतोस तें मुळींच या स्फूर्त्यादिक देहाचें नसून आत्माधिष्टानयोगें

आहे कारण देहच तूं असतास तर बऱ्या वाईट देहक्रियेस किंचितही न जाणतास; अग्नीस आपलें दाहकपण पृथकपणें कधींच कळत नाहीं, आणि तूं देहादि सर्वांस जाणतोस याअर्थी तूं त्यांच्याहून भिन्न हें स्पष्टच आहे. जसें व्यवहारांत माझें वस्त्र, माझें पात्र, माझे हात, माझे कान माझे डोळे ह्मणतात यांत विचार केला तर माझे ह्मणण्याचे जे जे पदार्थ त्याहून मी निराळा असें उघडच झालें. एवं जर—

**न त्वं देहो नेंद्रियाणि न प्राणो न मनो न धीः ।**
**विकारित्वाद्विनाशित्वाद् दृष्टत्वाच्च घटो यथा ॥**

देहेंद्रियादिकांचे उद्भव लय तुला कळतात तर तेच तूं कसा होशील? जसाः—

**घटद्रष्टा घटाद्भिन्नः सर्वथा न घटो यथा ।**
**देहद्रष्टा तथा देहो नाहमित्यवधारयेत् ॥**

घटाहून घटपहाणारा भिन्न तसें जें जें दृश्य तें तें माझ्याहून भिन्न ह्मणून मला कळतें तर ते धर्म स्थुलसूक्ष्मदेहाचे होत मी यांहून निराळा यांचा साक्षिमात्र असें समजणें असून अविचारानें:—

**दारा इमे मे तनया इमे मे धनं च मे मे पशवश्च मे मे ।**
**एवं नरो मेषसमानरूपो मेमेकृतः कालवृकेन नीतः ॥**

दारा, पुत्र, धन, पश्वादिक, देहापर्यंत भ्रांतीनें सर्वांस मी माझे ह्मणून त्या देहादिकांचे नामाश्रमादिक धर्म आपणावर घेऊन कालाचे मुखांत जातात ह्मणजे आत्मा नित्य, सत्य, देहादिकाहून भिन्न असतां देहच आत्मा व जगत सत्य जाणणें, या बुद्धीसच अज्ञान, अविद्या, विपरीतभावना, ह्मणतात. यास्तव यथार्थ विवेचनानें सत्यासत्य जाणून देहादिकाचा समूळ

अभिमान सोडला पाहिजे त्यायोगें सर्व दुःखनिवृत्ती, अखंडसुखप्राप्ती, असा महान उपयोग होतो.

प्र०–नामाश्रमादिक धर्म देहाचे होत, माझे ( आत्म्याचे ) नाहींत, हें स्पष्ट कसें जाणावें?

स० नाम–देहोत्पत्ती पूर्वी नांव नसतें. उत्पत्ति उपरांत त्या देहास कल्पित नाम ठेवतात; तें देहाच्या सर्वतत्वांत भिन्नाभिन्न शोधून पाहतां आढळत नसून, देह पातान्ती रहात नाहीं; व मी ( आत्मा ) नामरूपातीत जेथें रूपच नाहीं तेथें नाम कुठलें? यावरून नाम देहासच कल्पित ठरतें मला ( आत्म्याला ) नाम नाहीं; जाति–मी ( आत्मा ) व लिंगदेह पूर्वीचाच वर्तमानदेहीं असतो आणि भविष्यांत देहींही तोच येतो; पण ब्राह्मण क्षत्रियादिक जाति पूर्वदेहाची सांप्रतदेहीं नसतां सांप्रत जाती भावीं देहीं येण्याचा नेम नाहीं तसें शरीरांत विचारून पहातां जाती आढळत नसून ब्रह्मादि कीटकांत देह पंचभूतात्मक एकसारखे व चैतन्य पण सर्वत्रीं एकच व्याप्त; यावरून जाती स्थूलासच कल्पित मानली आहे, असें झालें. मला ( आत्म्याला ) जाती नाहीं. आश्रम–ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ, सन्यस्त, हेही भिन्न भिन्न कर्म, धर्म, आचारण, शरीराच्या वेषानें स्थूल देहासच कल्पित मानले असतात कारण ते मनुष्यमात्रीं नसून त्या त्या शारीरवेषक्रियेनें त्याच मनुष्यास दिसतात. तर आश्रम हीं स्थूलासच होय; मला ( आत्म्याला ) आश्रम नाहीं; संबंध माता, पिता, स्त्रीपुत्रादिकसंबंधपण स्थूलासच कल्पित दिसतो कारण देह केवळ जड असून चैतन्ययोगें वर्ततो व चैतन्य सर्वत्रीं एकच आहे. अन्य चैतन्यच नाहीं. जर दुसरें नाहीं तर संबंध कोणाचा कोणास कसा होणार? एवं संबंधस्थूलासच होय मला ( आत्म्यास ) संबंध नाहीं. जन्म–उत्पत्ति, त्याचा नाशही होतो पण मी ( आत्मा ) नित्य, सत्य, नित्यत्वामुळें

जन्माचा अभाव, आणि आत्म्यास जन्माचें मूळ कारण पण आढळत नाहीं; व जें ज्याचें कारण असतें तें त्या कार्यापूर्वी व पृथक असतें; पण मी ( आत्मा ) सर्वांहून आद्य आहे; मजपूर्वी व मजहून निराळी कांहीं वस्तूच नाहीं व जें जें भिन्न दिसतें, भासतें, तें तें रज्जुसर्पवत. आनात्मा मिथ्या. जसें मडकें गाडगें आदिक जल पूरित असतां, त्यांत सूर्य सहज बिम्बतो व जलाभावें अभाव होतो; किंवा काष्ठोपाधीनें अग्नी प्रगटल्यास उत्पन्न झाला ह्मणतात. उपाधि आकार तेच अग्नीचें रूप जाणतात उपाधिनष्टें अग्नीनष्ट ह्मणतात तथापि सूर्य अग्नी यांचेठिकाणीं उत्पत्ति, नाश, मिथ्या; तसें स्थूलदेहरूपघटांत लिंगदेहरूप जल आहे. त्यांत कुटस्थात्म्याचें प्रतिबिंब सहज उमटतें, व अंतःकरणोपाधियोगें चलनादिक सर्व क्रिया होतात; तें लिंगदेहजलयोगें स्पष्टत्वानें त्यास उत्पत्ति ( जन्म ) ह्मणतात व वासनाविलयें लिंगदेहजलअभावें अस्पष्ट नाहींसें होतें त्यास मरण ह्मणतात एवं देहोपाधिमुळें आत्म्यास जन्ममरण. ते मिथ्या होत. आत्मा त्रिकालीं अविकार आहे. जर जन्म स्थूलदेहासच आहे, मला ( आत्म्याला ) जन्म नाहीं. **मृत्यु**–मी ( आत्मा ) नित्य सत्य ह्मणून मला जन्म नाहीं हें वर सांगितलेंच आहे––

**आत्मा न जायते नित्यो म्रियते वा कथंचन ।**

जन्माभावें, मृत्युही नाहीं; हें निर्विवादच होय. मग, अस्ति जायते, वर्धते, विपरिणमते, क्षीयते, नश्यते, हे शड्विकार पण देहासच होत. जो जन्मतो तोच वृद्धि, क्षय, नाश, पावतो. हें स्पष्ट आहे. जसा प्रचारांत बाजार, हा शद्ब मात्र होय. परंतु त्यांतील सर्व वस्तू भिन्न भिन्न पहातां बाजार हा पदार्थ कांहीं नसून व्यर्थ नांव आहे. किंवा गृह, रथ, सेनादिक समुदायात्मक वस्तूचीं नामें असतां त्या त्या वस्तू पृथक् करून पाहूं गेलें तर गृह, रथ, सेना, हीं नामें मात्रच होत. पदार्थ नाहीं. तद्वत् हीं अनेक

तत्वें एकत्रतेनें शरीर नांव आलें आहे. तें सर्व निरनिराळें; केवळ जड, सापेक्ष, परप्रकाशी, मिथ्या असून, अहंकारानें देहाचे धर्म आपणावर घेतात, ह्मणून दुःखी होतात. जर दुसऱ्याचें ओझें आपण घेतलें, तर शीण येईल; यांत नवल काय? सारांश जशा प्रपंचांतील घट, पट, वृक्ष, पाषाणादिक अनेक वस्तू आहेत, त्या सर्व अनेक मिश्रणानें झालेल्या असतात. त्या केवळ नाममात्रें जाणणें तें खरें ज्ञान नव्हे. कारण नामरूप, हे अन्योन्याश्रयीं असतात. ते कोणत्या आधारें आहेत व त्यांत सतासत काय हें न समजतां, गुणसमुच्चयें नाममात्रच जाणणें तें खोटें. अरे दहा पदार्थ एकत्रतेनें जी वस्तु होते ती पदार्थ, व खोटी असते तशीच देहादिक सर्व मिथ्या, व देहाकरीतां आहेत आणि मी (आत्मा) या सर्वांहून निराळा असंग अविकार असून, यांस प्रकाशक मात्र आहे एवं जर—

**नाहं देहो जन्म मृत्युः कुतो मे**
**नाहं प्राणः क्षुत्पिपासे कुतो मे ।**
**नाहं चित्तः शोकमोहौ कुतो मे**
**नाहं कर्ता बंधमोक्षौ कुतो मे ॥**

देह मी नव्हे तर जन्म मरण ही, मला (आत्म्याला) नाहींच; प्राण मी नव्हे, तर क्षुधा तृषा मला कोठून? चित्त मी नाहीं, तर शोक मोहादि पण मला नाहींचे. मी कर्ता नाहीं तर बंध मोक्ष मला कुठलें? असें निश्चयात्मक जाणून सत्याचें सर्वदा अनुसंधान ठेवावें.

प्र०—आत्मा नित्य सत्य, सर्वांहून निराळा आणि स्थूल सूक्ष्म देहादि आभासांत सर्व जड सापेक्षक परप्रकाश मिथ्या हें कसें जाणावें? व जीवाचें रूप कोणत्या प्रकारें आहे?

---

१ देहांतरहाणारा २ अन्यापेक्षक.

स०–जसा सभेंत दीप आहे तो राजा मंत्री सेवकादिक सर्वांवर प्रकाश करतो; दीप नसेल तर अंधारामुळें त्यांच्या क्रिया होणार नाहींत. यास्तव दीप प्रकाशक मात्र होय. स्वप्रकाशें प्रकाशित रहाण्यांत, त्यास कोणाची अपेक्षा नसतां त्यांच्या शुभाशुभ क्रियेंत दीप अलेप असून त्यांतून कोणी आले गेले किंवा सर्वच गेले तरी शून्य गृहीं दीप प्रकाशित रहातो अथवा पांच छिद्रांचे घटांत दीप ठेवला तोच छिद्रद्वारें बाहेर प्रकाशतो तसा स्थूलदेहघट पंचज्ञानेंद्रिय छिद्रयुक्त आहे. त्यांत हृदयस्थ कूटस्थात्म दीपरूप आहे; तो साभास, अहंकार, जीवरूपराजा, बुद्धीरूपनर्तकी, इंद्रियरूपतालधारी, विषयरूपसभासद, हे सर्व जागृदवस्थेंत स्पष्ट असतां त्या सर्वांस प्रकाशतो; व स्वप्नावस्थेंत बुद्धिआभास मात्र असतां त्यांसही प्रकाशित आहे, आणि सुषुप्तींत सर्वांचा अभाव, तरीही प्रकाशतो; एवं अधिष्टान सामान्यचैतन्यात्मा त्रिकालाबाधित दीपवत निरापेक्ष अवस्थात्रयींनिरंतर, ह्मणून सत्य व जसा स्फटिक स्वतः प्रकाशबलहीन आहे. यास्तव अंधारांत असला तर व्यर्थ, तोच सूर्य प्रकाशांत प्रकाशित होतो. किंवा लोह स्वतः शीतल, कृष्णवर्ण, अप्रकाश तरी अग्नीसंगें तप्त रक्तवर्ण प्रकाशक होतें अथवा—

**आत्मचैतन्यमाश्रित्य देहेंद्रियमनोधिया ।**
**स्वकीयार्थेषु वर्तंते सूर्यालोके यथा जनाः ॥**

सूर्यप्रकाशें सर्व जनाची क्रिया होते त्यांत, सूर्य अलिप्त. तशी आत्माधिष्टानआश्रयें मनेंद्रियाभासादिकांची उत्पत्ती, स्थिति, व्यवहार, होऊन त्यांतच लय पावतात यावरून हे सर्व उद्भव लयधर्मी, सापेक्षक, परप्रकाश, जड, खोटे, ठरतात; आणि जसा सूर्यप्रकाश सर्वत्रीं सारखा असून ही स्वच्छोपाधिआदर्शांत विशेष प्रकाशतो, तसा अधिष्टानचैतन्याचा सामान्य ज्ञानप्रकाश सर्वत्रीं सारखा असून तोच स्वच्छोपाधिअंतःकरणात प्रतिबिंब-

रूप होऊन स्वस्वरूप विस्मृतींत देहाभिमान घेऊन विशेष ज्ञानरूप व्यवहाराचा कर्ता, भोक्ता, होतो. तेव्हांच यास जीवत्व येतें—

**तत्राविद्यासमायुक्तं चैतन्यं प्रतिबिंबितं ।**
**व्यावहारिकजीवोस्तु क्षेत्रज्ञः पुरुषोऽपि वा ॥**

या अविद्यायुक्तप्रतिबिंबासच व्यवहारिक जीव, क्षेत्रज्ञ चिदाभास, इत्यादिक ह्मणतात व—

**स एव जगतां भोक्ता नाद्ययोः पुण्यपापयोः ।**
**इहामुत्र गती तस्य जाग्रत्स्वप्नादिभोक्तृता ॥**

हाच मनेंद्रियसाधनद्वारा आंत बाहेर जागृत्स्वप्नांत व्यवहाराचा कर्ता, भोक्ता; यासच जागृदवस्थेंत व्यवहारीक जीव स्वप्नावस्थेंत प्रातिभासिक ह्मणतात. आणि सुषुप्त्यवस्थेंत यालाच पारमार्थिक संज्ञा आहे. व हाच अनादिकालापासून चालत आलेल्या पुण्यपापामुळें उत्पन्न जें स्थावर[1] जंगम[2], त्यांत वास करून शुभाशुभ कर्माचा भोक्ता, व परलोक गती जागृदादिअवस्था पण यासच आहेत. एवं अधिष्ठानचैतन्य, अंतःकरण, व प्रतिबिंब, असे तीन मिळून जीवाचें रूप आहे. आणि हाच वासनेनें बहिर्विषय ग्रहणास वृत्तिद्वारें निघतो; ह्मणजे पहाण्यास वृत्ति निघते तें चक्षुरिंद्रिय, श्रवणास निघते तें श्रोत्रेंद्रिय, इत्यादिक आभास वृत्ति यांचे जें निर्गमनद्वार तींच इंद्रियें झालीं व—

**परस्पराध्यासवशात्स्यादंतःकरणात्मनोः**
**एकीभावाभिमानेन परात्मा दुःखभागिव ॥**

---

१ अप्राण एकच ठिकाणीं भूमीत रोवले रहातात ते २ प्राणयोगे चलनादि करणारे.

परस्पराध्यासें आपलें अधिष्टान विसरून अंतःकरणेंद्रियादिक सर्व मीच जाणून त्यांचे कर्म धर्म आपणावर घेऊन दुःखी होतो. परंतु सुषुप्तींत सर्वांसह मूलाधिष्ठानीं लय पावतो. असा याचा उद्भव, लय असून, वृत्तिबुद्धिची अपेक्षा आहे. ह्मणून हा खोटा. यावरून जसा

**यथास्वप्नप्रपंचोयं मयि मायाविजृंभितः**
**तथा जाग्रत्प्रपंचोयं मयि मायाप्रकल्पितः॥**

स्वप्नप्रपंच वास्तव नसून मायेमुळें माझे ठायीं विस्तृत होतो, तसाच जागृत्प्रपंचमिथ्या असून अंत.करण आभास योगें माझे ठायीं कल्पित मिथ्या आहे तस्मात पुण्य, पाप, सुख, दुःख, कर्तृत्व, भोक्तृत्व, इहपरलोक, गमनागमन, विवेकादिक सत्ववृत्या रागादिक, रजोवृत्या प्रमादालस्यादितमोवृत्या हे सर्व अंतःकरणाभासाचेच धर्म होत. असें जाणून त्यांचा समूळ अभिमान सोडावा.

**प्र०**—मनेंद्रियें आभासादिक आपापले विषयव्यापार पृथकपणें स्वतंत्रकर्ते दिसतात ते जड मिथ्या ह्मणावे तर कर्ता भोक्ता आत्माच झाला व विकारित्व आल्यास नाशवंत झाला; मग अविकार, असंग, नित्य, सत्य, कसा ह्मणतां येईल?

**स०**—रूपावलोकन हा विषय चक्षूचा आहे तथापि सूर्यादिक प्रकाशाची त्यास अपेक्षा असते असे परस्पर संयोगें रूपविषय चक्षुग्रहण करतात, तरी कमी दिसतें, स्पष्ट दिसतें, दिसतच नाहीं. हे अंधमांद्यादिक चक्षूचे धर्म, चक्षु जाणत नसतात. जसा एखादे गृहाचे द्वारासमोर कोणी कांहीं पदार्थ ठेवला तो ते द्वार पहात, जाणत नसून जेव्हां त्या गृहाचा स्वामी त्या द्वाराकडे येतो तेव्हां त्या पदार्थास तो जाणतो, पहातो.

तद्वत ज्ञानेंद्रियेंहीं अंतःकरण आभासाचे निर्गमन द्वार होय; तद्वारें प्रथम अंतःकरणवृत्ती विषयास प्रकाशते; त्या वृत्तीसंबंधें इष्टानिष्ट सुख-दुःखाचा अनुभव करणारा पूर्वोक्त जीव असून त्यासही सत्तास्फुर्ती देणारा अधिष्ठानात्माच आहे. जसे—

**घटनीरान्नपिष्टानामुष्णत्वं वन्हियोगतः**
**वन्हि विना कथं तेषामुष्णत्वं स्याद्यथा क्वचित्॥**

पात्र, जल, अन्न, अग्नियोगें उष्ण होतात, वन्ही वांचून त्यांच्यांत उष्णत्व संभवत नाहीं. तसें—

**भूतभौतिकमायानां स्फूर्तित्वं स्वात्मयोगतः**
**विनात्मानं कथं तेषां स्फूर्तिता स्यात्तथा क्वचित्॥**

देहेंद्रियादिक भूतभौतिक आत्मसत्तेनें चेतन होतात त्यांस जसा

**यथा चुंबकसांनिध्याच्चलंत्येव अयादयः॥**

चुंबक निर्विकार निराळा राहून सन्निधि मात्रें अचेतन लोहास चलन सत्ता; देतो ती सत्ता लोहाची नाहीं, किंवा पांवा[1] मधुर शब्दप्रयोग करतो पण ध्वनिसामर्थ्य त्याचें नसतें. शस्त्रघातें वृक्षादिक छेदन होतात तरी ती शक्ती शस्त्राची नसते अथवा

**अग्निसंगाद्यथालोहमग्नित्वमुपगच्छति**
**आत्मसंगात्तथा गच्छत्यात्मतामिंद्रियादिकं॥**

लोह वन्ही ऐक्य झाल्यानें लोहच जाळतें; जलास गंध नसतां सुगंध-दुर्गंधजल असा व्यवहारांत शब्द प्रयोग होतो; परंतु लोह जल यांचे ते

---

१ उत्पन्नमात्र.

धर्म वास्तव नाहींत. अग्नियोगें लोह उष्ण, गंधयुक्तपृथ्वीचे सूक्ष्म अवयव तद्योगें जलास गंध येत असतो, तद्वत अंतःकरण आभास इंद्रियादिक आत्मसत्तेनें उद्भव होऊन जागृत्स्वप्न व्यवहार करून सुषुप्तींत त्यांतच लय पावतात एवं मनेंद्रिय आभास आपापला विषयव्यापार जरी करतात तरी अधिष्टानाविना त्यास पृथक स्वतंत्र सत्ता नाहीं. अरे सुखदुःखादि जाणणें हें ज्ञान जडांत नाहीं. आत्मचैतन्ययोगें त्यांच्यांत येत आहे. कारण देहेंद्रियेंआभास सर्व जड सापेक्षक आहेत. जर ते स्वतंत्र असते तर दुःख विषयाकडे न जातें; परंतु जातात. यावरून हे सर्व पराश्रित सापेक्षक जड खोटे विकारी होत; स्वतंत्र नाहींत असें ठरतें; आणि जसें अमुक नृपानें अमुक नगर वसविलें असें जनांत ह्मणतात पण तत्संबंधीं त्यास कांहींही करावें लागत नसून माहितही नसते तथापि सर्व सत्ता नृपाची आहे व त्या नगरची प्रजा यथेच्छ वर्ततां त्यांचे धर्माधर्म पण नृपास नाहींत तद्वत मनेंद्रियें आभासांचे कर्तृत्वादिकही आत्म्यास नाहींत पंचकोशभ्रांतीनें कल्पित त्रासतात ते मिथ्या. तात्पर्य जसा तक्षा शस्त्र धरतो तेव्हां कर्ता शस्त्रत्यागें अकर्ता होत आहे तसा मनेंद्रिय आभास संबंधें आत्माकर्ता व तदभावें अकर्ता आहे

**प्र०** पंचकोश कोणत्याप्रकारें व आत्म्याहून भिन्नाभिन्न कसे आहेत.

**स०** कोशनाम आच्छादन, करणाराचें असतें जसें भांडारगृहास, खड्गाचे म्यानास. किड्याचे गृहास कोश ह्मणतात तसें हे पंचकोश आत्म्यास आवरण आहेत, जसे धान्यावर साल आहे तोंपर्यंत वारंवार उद्भव नाश होतो तसें पंचकोश वेष्टणामुळें जीवास वारंवार जन्म मृत्यु होतात; धान्यकण सालीबाहेर निघाल्यावर पुन्हा उद्भवत नाहींत तसें

२ सुतार.

पंचकोश विवेचनानें देहाध्यास दूर झाल्यास जीवही शांती पावतात ज्याप्रमाणें तम हें गृहाश्रित असून गृहासच आवृत करतें किंवा शेवाळ हें जलापासून होऊन जलासच आवरतें अथवा पडळ हें नेत्राचें जल असून घट्ट होऊन दृष्टीआड पडदा करतें त्यानें मंदत्व अंधत्व येऊन वस्तुज्ञानांत फेर पडतो तद्वत माया ही ब्रह्माश्रित असून त्याचेच सत्तेनें आपलीं नामरूपें निर्माण करून त्यांस आच्छादिक करते यामुळें निजानंद लोपून विषयाकडे वृत्ति होते, व नानात्वभेदवासनेनें जीवत्व अस्वतंत्रत्व येत आहे असे अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय, आनंदमय हे पंचकोश देहत्रयात्मक जीवास वेष्टणरूप आहेत यांत स्थूलशरीरीं अन्नमय एक, सूक्ष्मदेहीं प्राण, मन, विज्ञान हे तीन, कारणशरीरांत आनंदमय एक, एवं पंचकोश होत. पैकीं–

१ पितृभुक्तान्नजाद्वीर्याज्जातोऽन्नेनैव वर्धते
देहःसोऽन्नमयो नात्माप्राक्चोर्ध्वं तदभावतः ॥

पिता माता जें अन्न भक्षण करतात त्यापासून वीर्य; त्यांतून ज्याची उत्पत्ति व जन्मानंतर अन्नानें वृद्धी. मरणाउपर अन्नरूप पृथ्वींत लीन असा जो पूर्वोक्त पंचभूतात्मक पंचीकृत स्थूल देह हाच मी समजणें यास अन्नमय कोश ह्मणतात. हा–

विण्मूत्रादिमलानां हि संचयो देह ईरितः
अस्मिन्नहंमतिश्चेत्स्याद्बाह्ये कस्मान्न संभवेत् ॥

अस्थि, मांस, रुधिर, चर्म, मलमूत्रादियुक्त, अतिअपवित्र, केवळ जड, तुच्छ आहे; यास जर मी, माझा ह्मणावा, तर बाहेरील मलादिकास मी माझे कां ह्मणूं नये? कारण अपवित्र जडत्वें दोन्ही तुल्यच आहेत.

---

१ अंधार.

आणि उत्पत्ति पूर्वी हा देह नव्हता. बरे, देहच नाहीं तर मग पूर्व कर्मे कोणी केलीं ? पूर्व कर्मे नाहीं ह्मटलें तर कर्माविना सांप्रत देह कसा झाला ? व हा देह नष्ट झाल्यानंतर वर्तमानकर्माचें फल परलोकीं कोण भोगणार ? आणि परलोकच नाहीं ह्मटलें तर वेदशास्त्र कर्मादिस विरोध येतो इत्यादि कारणानें हा स्थूलदेह मी नसून माझें ( आत्म्याचें ) राहण्याचें स्थळ असतां जन्मापूर्वी मरणानंतर या देहाचा अभाव आहे; तसेंच प्राण नसतां कोणतीच क्रिया करण्यास हा समर्थ नसून तत्काल निचेष्टित पडतो. यावरून प्राणाधारेंच याचें वर्तन दिसतें, तर प्राणच आत्मा, देह अनात्मा, असा हा अन्नमय कोश उत्पन्न नाश होणारा विकारी सुखदुःख भोगायतनरूप केवळ जड अशुचि परापेक्षक आहे, तर हा देह मी ( आत्मा ) नव्हे असें जाणून याचा समूळ अभिमान सोडून द्यावा.

२. आतां पूर्वोक्तपंचप्राण पंचकर्मेंद्रियें मिळून प्राणमय कोश ह्मणतात हा पण मी ( आत्मा ) होऊं शकत नाहीं; कारण प्राण हृदयस्थानीं राहून दिवस रात्र मिळून २१६०० श्वासोश्वास घेण्याची क्रिया करतो; अपान गुदस्थळीं राहून मलमूत्र विसर्ग क्रिया करितो; समान नाभिस्थानीं राहून अन्नरस सर्वांस पोचवितो; उदान कंठस्थानीं राहून अन्नजलाचा विभाग करितो, व्यान सर्वांगीं फिरत असून सकल अंगसंधिवलनक्रिया करितो. याप्रकारें,—

**पूर्णो देहे बलं यच्छन्नक्षाणां यः प्रवर्तकः**
**वायुः प्राणमयो नासावात्मा चैतन्यवर्जनात् ॥**

एकच वायुस्थान क्रियाभेदें भिन्न होऊन, सर्व शरीरांत व्यापून बलपुष्टि देतो व सर्वेंद्रियांस स्वस्व व्यापारीं प्रवृत्त होण्याचें साधन देते

तत्रापि त्यास चैतन्य मुळींच नाहीं. सुषुप्तींत नसून प्राण शरीरांत फिरत असतात; तरी कोणी मित्र शत्रु आला त्याचा आदर निषेध करीत नाहींत, व एकेदशीयाचें वास्तव्य आहे. तसेंच श्वासोश्वासांत क्षय वृद्धि पावतात ते मला कळतात, आणि यांचे क्षुधा तृषादिक धर्म पण मनामुळें भासतात मन मूर्छित असलें तर प्राण असूननसून सारखेच, यावरून प्राण मनानेच व्याप्त आहेत आहेत; एवं प्राणास मनाची अपेक्षा; तस्मात् प्राणही जड, विकारी, सापेक्षक, अनात्मा; सूक्ष्म, देह अंतःपातीं मी(आत्मा) नव्हे असें जाणावें.

३. आणि पूर्वोक्त पंचज्ञानेंद्रियें व मन मिळून मनोमय कोश ह्मणतात.

**अहंतां ममतां देहे गेहादौ च करोति यः**
**कामाद्यवस्थया भ्रांतो नासावात्मा मनोमयः ॥**

हें मन देहगेहादि[3] कीं, अहंता ममता करीत असून इंद्रियद्वारें बहिर्विषयीं गमनकरणारें, कामक्रोधादियुक्त, नियमराहितस्वभावी संकल्पविकल्पधर्मी महाचंचल उद्भवलय पावत असून मला कळत आहे आणि मनाची प्रेरक बुद्धी आहे जिकडे बुद्धिचा निश्चय तिकडेच मन वळत असतें, जोंपर्यंत बुद्धी निश्चय करीत नाहीं, तोंपर्यंत मन संकल्प करीत रहातें, पण संशय फिटत नाहीं यावरून मनाची सिद्धी बुद्धीमुळें आहे; तर मनही अन्या-पेक्षक विकारी उत्पत्ति विनाशी जड होय. ह्मणून हा मनोमय कोशही सूक्ष्मदेह अंतःपाती अनात्मा माझ्याहून भिन्न आहे. मी ( आत्मा ) नव्हे असें जाणावें.

४ आतां पूर्वोक्तपंचज्ञानेंद्रियें व बुद्धी मिळून विज्ञानमय कोश ह्मटला हाही आत्मा नव्हे. ह्मणजे—

---

१ ज्ञान २ कांहीं उपयोगी नाही ३ शरीरगृहादि ४ त्या देहाचे अंतर्गत

**लीना सुप्तौ वपुर्बोधे व्याप्नुयाद्वानखाग्रगा**
**चिच्छायोपेतधीर्नात्मा विज्ञानमयशब्दभाक् ॥**

बुद्धि सुप्तींत लीन[1] होते व जागृतींत नखशिखांत[2] व्यापून कर्ता होते; व दीपशिखावत क्षणोक्षणीं उत्पन्न नाश होते; ती मला कळत आहे. आणि बुद्धींत जो प्रतिबिंबीत स्फुरणत्वें साभास अंहकार त्यासच जीवों-दिक ह्मणतात. त्या योगेंच बुद्धिचा कार्यभाग चालतो. त्याविना बुद्धि वस्तु-ज्ञानास समर्थ नाहीं तर बुद्धि पण पराश्रित, सापेक्षक, जड, उद्भववलय, धर्मी, विकारी असून प्रतिबिंबावाचून तुच्छ आहे; तर हा विज्ञानमय कोशही सूक्ष्म देह अंतपाती ( आत्मा ) नव्हें असें जाणावें; व

५ पूर्वोक्त मूळस्फूर्ति विद्या अविद्या ईश जीव मिळून आनंदमय-कोश ह्मणतात. ह्मणजे—

**काचिदंतर्मुखावृत्तिरानंदप्रतिबिंबभाक्**
**पुण्यभोगे भोगशांतौ निद्रारूपेण लीयते ॥**

पूर्वोक्त ईश्वरसंबंधीं जी मूळप्रकृती, विद्या, अविद्या, वृत्ति, बुद्धी, आदिक परिणामें स्वस्वरूप विसरून बहिर्मुख झाली; नंचिवृत्ती पूर्वपूण्यकर्मफल भोगाचे अनुभवकालीं इंद्रियविषयरहित, निर्विकार, निर्विकल्प, अंतर्मुख, झाल्यानें त्यांत आत्मानंदाचें प्रतिबिंब उमटतें व नीचवृत्ती निद्रारूपें लीन होते, यास आनंदमयकोश संज्ञा आहे. हाही आत्मा ह्मणतां येत नाहीं कारण जशा थिजलेल्या घृतकणिका कठीण शुभ्र अनेक निरानि-राळ्या असतात त्याच तापविल्यानें अनेकत्व सोडून एकरस होतात तशा जागृत्स्वप्नांत नानाविषय ग्रहणार्थ अनेकाकार झालेल्या वृत्ती त्या सुषुप्तींत आपलें उपादानकारण[4] जी अविद्या तींत एकरूपें लीन होतात;

---

१ नाहिंशीं २ पायापासून मस्तकापर्यंत ३ विशेष चैतन्य चिदाभास ४ उत्पत्तिस्थान.

व बुद्धींत पडलेलें प्रतिबिंबही, जागृत्स्वप्नावस्थेंत अनेक सुखदुःखात्मक भोगानें श्रांत होऊन बुध्याभावें आपलें सुखरूप जें मूलाधिष्टान त्यांत लीन होते. जशी सूर्योदयीं पुरुषाची छाया फार लांब पडत असते, तीच प्रहर दिवसाचे सुमारीं आंखूड, मध्यम, होते; व तीच छाया मध्यान्हीं त्या पुरुषाचे पायाखालीं नाहींशी होऊन रहाते, (असून दिसत नाहीं ); तशी जागृदवस्थेंत, बुद्धींत, अधिष्टानचैतन्याची, प्रतिबिम्बत्वें पडलेला छायारूप जो जीव तो फारच बहिर्मुखत्वेंकरून अविद्याकल्पित नानानामरूपात्मकविषयाचे ठायीं, विहार करीत असतो; तोच स्वप्नावस्थेंत प्रत्यक्ष विषय व इंद्रियांस सोडून जागृतींत केलेला जो प्रपंचव्यवहार त्याचीच कल्पना करून केवळ मन मात्रेंच अर्धनिद्रिस्थवत स्मृत, विस्मृत, असा मध्यमपणें भास मात्र विषय कल्पून त्याशीं व्यवहार करतो; तोच सुषुप्तींत पूर्णनिद्रा व्याप्त झाल्यानें जसें गढूळ जळीं सूर्याचें प्रतिबिंब असतांही दिसत नाहीं तसा गाढ अज्ञानाच्या गढुळपणामुळें त्यांत अस्पष्ट असून जागृत्स्वप्नवत् व्यवहार करण्यायोग्य नसतो; आपल्या मूलाधिष्टानीं नाहींसा होऊन आच्छादित राहतो; ह्मणजे वस्तुतः आहे परंतु नाहीं; हा अत्यंतिक लय नसून कार्यरूपाचा ग्रास करून वासना संस्कारें आज्ञानांत कारणरूपें राहतो, व जागृत्स्वप्नांत जसा अधिष्टानात्म्याहून भिन्न असतो, तसाच या ठिकाणीं पण अज्ञान गवेसणींत सांपडून मूलाधिष्टानीं ऐक्य होतो; तथापि भेद जात नाहीं; ह्मणून हें ऐक्य उपचारिक होय. जशी कोणी पुरुषाचीं विहाराचीं तीन स्थानें असून त्या त्या स्थळीं त्या त्या व्यवहार काळीं तीं तीं नामें पृथक त्या एकासच येतात तद्वत या एकच जीवात्म्यास जागृत्स्वप्नसुषुप्तिस्थानीं त्या त्या व्यवहारीं विश्व, तैजस, प्राज्ञ, नामें येऊन हाच अज्ञानोपाधिविलयें अधिष्टानीं ऐक्यत्वें पुनः ईश्वररूप होतो. एवं अज्ञानबीज राहिल्यामुळेंच हा जीव पुन्हा अंतःकरण योगें जागृतींत स्पष्ट होऊन, मी सुखांत निजलों होतों, कांहीं जाणत नव्हतों, असा आनंदाचा व आज्ञानाचा केलेला अनुभव स्मृतिरूपानें सांगत असतो; आणि स्मृति, पूर्वानुभवाविना होतच नसते, व स्मृती हेंच

१ श्रमीत २ बेलींत ३ नाशें ४ आठवण.

अज्ञान होय. या आज्ञानकारणास्तवच यास “ कोश ” हें नाम आलें असून सुख व अज्ञान याचा अनुभव घेणारा हा जो प्राज्ञसंज्ञक प्रतिबिंबरूपजीव आत्मा तो नव्हे. कारण सुख आणि आज्ञानाचा अनुभव करणारा सुखरूप आत्म्याहून वेगळा, हें अर्थातच सिद्ध; व अधिष्टानकुटस्थात्मा आपण असंग, स्वतः सुखरूप असल्यानें, अनुभव घेणें त्यास घटत नाहीं. तो या जीवास सत्तास्फूर्ति मात्र देणारा याहून भिन्न आहे; तोच मी. ( आत्मा ) तर हा आनंदमय कोश, अनात्मा क्षणिकसुखद, जड, सापेक्षक, उद्भव, लय धर्मीं, मी ( आत्मा ) नव्हे, असें निश्चित जाणून यास मी ह्मणणें त्याग केलें पाहिजे; एवं अन्न, प्राण, मन, विज्ञान, आनंद हे पंचकोश नामरूप मात्रच केवळ जड, सापेक्षक, सुखदुःखात्मक, उत्पन्नविनाशीं अनित्य एकदेशी, परिछिन्न, विकारी , ह्मणून अनात्मा मिथ्या; व मी ( आत्मा ) निर्गुण, निराकार, निधर्म, निरापेक्ष, बोधरूप, नित्य, सत्य, सर्वत्रपूर्ण, निरंतर, सुखरूप, नामरूपातीत, पंचकोशाहून पृथकविलक्षण, सर्वांचा साक्षी, उदयास्तरहित त्रिकाल आहें, याप्रमाणें निःसंशय जाणून मी पंचकोश, या बुद्धीचा समूळ त्याग करावा.

**प्र०**—अवस्था कितीप्रकारच्या, काय रूपानें, कोणास, आत्म्याहून भिन्नाभिन्न कशा आहेत ?

**स०**—जागृत, स्वप्न, सुषुप्ती या तीन अवस्था बुद्धीचिदाभासाच्या होत; यांत १ वाचा, पाणि, पाद, उपस्थ, गुद हीं पांच मिळून कर्मेंद्रिय पंच, त्वचा, चक्षू श्रोत्र, जिव्हा, घ्राण हीं पांच मिळून ज्ञानेंद्रिय पंच; मन, बुद्धी, चित्त, अहंकार, हें अंतःकरणचतुष्टय; अशीं चौदा इंद्रियें अध्यात्म आहेत, यांच्या वायू सूर्यादिक चौदा देवता, अधिभूत होत; व शद्बस्पर्शादिक चौदा विषय, अधिदैव आहेत; अशी बेचाळिस तत्वांची त्रिपुटी होऊन प्रवृत्तीचा जो सर्व व्यवहार चालतो, ही जागृदवस्था ह्मटली आहे ती अशी—

---

१ वेगळा.

| ज्ञानेंद्रियाची त्रिपुटी | | | कर्मेंद्रियाची त्रिपुटी | | | अंतःकरणाची त्रिपुटी | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अध्यात्म | अधिभूत | अधिदैव | अध्यात्म | अधिभूत | अधिदैव | अध्यात्म | अधिभूत | अधिदैव |
| इंद्रिय | देवता | विषय | इंद्रिय | देवता | विषय | इंद्रिय | देवता | विषय |
| श्रोत्र | दिशा | शब्द | वाचा | अग्नी | वचन | मन | चंद्र | संकल्पाविकल्प |
| त्वचा | वायू | स्पर्श | पाणी | इंद्र | घेणेंदेणें | बुद्धी | ब्रह्मा | निश्चय |
| चक्षु | सूर्य | रूप | पाद | वामन | गमन | चित्त | वासुदेव | चिंतन |
| • जिव्हा | वरुण | रस | उपस्थ | प्रजापति | रति | अहंकार | रुद्र | अभिमान |
| घ्राण | अश्विनीकुमार | गंध | गुद | यम | मलत्याग | • | • | • |

एवं तीन एकत्र झाल्यानें त्रिपुटि होत असते; ती पूर्ण झाली तर प्रपंचकार्यें होतात; अपूर्ण असल्यास होत नाहींत, ह्मणजे चक्षूइंद्रिय, सूर्यदेवता, रूपविषय ह्या तीन एकत्रतेनें पहाण्याचा व्यापार होतो यांत चक्षू व सूर्य असून, रूप नाहीं, तर व्यर्थ, किंवा चक्षु, रूप दोन्ही असून, सूर्य नाहीं तरीही निरर्थ अथवा सूर्य व रूप असून चक्षूच नाहीं तरी पण निरुपयोगी ही अपूर्णत्रिपुटी होय; तस्मात पूर्वोक्त इंद्रिय, देवता, विषय, अशी त्रिपुटी झाली तरच प्रपंचव्यवहार चालतो, अशी ही त्रिपुटी अधिष्ठानाश्रयें होऊन, जागृतीचीं सर्व कार्यें होतात, ही जागृदवस्था होय. या अवस्थेंत जीवाचें विशेषेंकरून नेत्रस्थान, वैखरीवाचा, रजोगुण, क्रियाशक्ति, स्थूलभोग, व विश्वाभिमानी, असें नांव आहे. या अवस्थेचा स्वप्नसुषुप्तींत अभाव असतो आणि मी (आत्मा) निर्गुण, स्थान, क्रिया, भोग, नामरूपातीत, आहें; तर ही अवस्था स्थूलदेहचिदाभासाचीच जाणावी. २ जागृदवस्थेंतील अनंत जन्मींचें शुभाशुभ जें कर्म त्याचा संस्कार, वासनेंत सूक्ष्म असतो. त्यांतून निद्राकाळीं पंचविषयपदार्थ प्रत्यक्ष नसून मनःकल्पित भासमात्र विषयवासनात्मक उद्भव होऊन प्रत्यक्षवत् जो प्रपंचव्यवहार होतो, व अंतःकरण आभास शिवाय सर्वेंद्रियाची जी विलयदशा, अशा आत्मकाल प्रतितीस स्वप्नावस्थेंत जीवाचें कंठस्थान, मध्यमावाचा, सूक्ष्मभोग, सत्वगुण, ज्ञानशक्ति, तैजसनांव, आहे. या अवस्थेचा पण जागृत्सुषुप्तींत अभाव होतो, तर ही स्वप्नावस्था पण सूक्ष्मदेह बुध्दी आभासाची समजावी. आणि, ३ पुरूष निद्रेंतून जागृत होऊन निद्रेंत अनुभूत जें सुख व अज्ञान याचें स्मरण करून ह्मणतो कीं मी सुखांत निजलों होतों मला कांहीं कळलें नाहीं अशी सर्वसंघांची जी विलयदशा ही सुषुप्तीअवस्था होय. जसा कोणी पक्षी चारा चरण्यास्तव

---

१ परा, पश्यंति, मध्यमा, वैखरी, या चार वाचा आहेत. २ विरूनजाणे ३ समुदाय.

आपले घरट्यांतून बाहेर पडून सारादिवस भ्रमण करितो, व सायंकाळीं श्रमानें अतिश्रांत झाल्यानें फिरण्याचा व्यापार आटोपून पुन्हा विश्रांति घेण्याकरितां आपले खोप्यांत येतो, किंवा एखादे वेळीं थोडा श्रमित असेल तर ज्या वृक्षावर आपला माळा आहे, त्याचे खांदीवर कांहींकाळ बसून नंतर घरांत शिरतो; तसा हा जीव जागृदवस्थेंत इंद्रियद्वारा सुखदुःखभोग घेण्याचे परिश्रमानें श्रांत होऊन, आपलें स्वरूपभूतसुख घेण्याकरतां कर्मेंद्रिय ज्ञानेंद्रियाचा उपराग करून क्वचित् किंचित्काळ स्वप्नावस्था भोगून कधीं न भोगून सुषुप्त्यवस्थेस प्राप्त होतो. जसा कोणी श्रीमान दिवसभर आपले व्यापार संबंधें बहुत श्रमित होऊन, रात्रीं श्रमपरिहा-रार्थ, सुखप्राप्त्यर्थ, कोमलशय्येवर शयन करतो त्या काळीं सेवक हात पाय चेंपतात, वारा घालतात, तेणेंकरून कांहींवेळ आतां मी सुखी झालों असें त्यास बहिर्विषयापासून सुख वाटत असतें, नंतर बहिर्विषयजन्यसु-खाचा परित्याग करून आपलें स्वरूपभूतसुख भोगण्याचे अपेक्षेनें सेव-कांस आज्ञा करतो कीं आतां मला निद्रा येते तर तुह्मीं जा. या प्रकारें सर्व विषयांचा तिरस्कार करून निद्रेंत स्वस्वरूपसुखाचा अनुभव घेतो; तसाच हा जीव जागृत्स्वप्नावस्थागतसुखदुःखदप्रदभोग व इंद्रियादिक भोगसाधन यांचा व्यापार सोडून सुषुप्तींत आपले मूलाधिष्ठानांत लीन होतो; ते समयीं आज्ञानापासून उत्पन्न झालेल्या मोद प्रमोद आनंदा-त्मिकावृत्तीकरून हा जीव नष्टप्राय होऊन वासना वृतिद्वारास्वस्वरूप सुखाचा व अज्ञानाचा अनुभव घेत असतो, तोच पुन्हा जागृतींत आल्या-वर सुषुप्तींत केलेला सुख अज्ञानाचा अनुभव स्मृतिरूपें सांगतो कीं, मी सुखांत निजलों होतों कांहीं जाणत नव्हतों हा सुषुप्तींतील अनुभव त्या-च्यानें त्या अवस्थेंत सांगवत नाहीं, कारण जसा कोणी पुरूष आपली मुद्रिका कूपांत पडली ती काढण्यास्तव जलांत बुडी मारून पहातो व

मिळाली कीं तत्काल आनंदानुभव घेतो, परंतु जलानें आवृत आहे म्हणून बोलू शकत नाहीं ह्मणजे बोलण्याचें साधन जें वागेंद्रिय त्याची देवता अग्नी त्याचा जलाशीं विरोध आहे; यास्तव तिरोहित होतो तोच पुरूष जलाबाहेर आल्यावर बोलतो, तसाच हा जीव गाढ अज्ञानामुळें नष्टप्राय आच्छादित असून बोलण्याचें साधन इंद्रियें अज्ञानांत लीन असतात. जसें ग्रीष्मांत अति उष्मामुळें भूमीवरील तृण दग्ध होऊन भूमींत बीजरूपें गुप्त राहतें, तेंच वर्षाकाळीं पुन्हा वर येतें, तद्वत सुषुप्तींत हा जीव अज्ञानडोहीं मृतप्राय असतो, तोच जागृदवस्थेंत बुध्दिवृत्तींत स्पष्ट होऊन क्रिया करतो व वृध्दिवृत्त्याभावें पुन्हा सुषुप्तींत लय पावतो. या वेरझारा अज्ञान तावत चुकत नसून, कूटस्थात्मा या अवस्थेचा अभिमानी प्राज्ञसंज्ञक जीवाला ( प्रतिबिंबाला ) सत्तास्फूर्ति मात्र देणारा मुख्य बिंबभूत स्वप्रकाश अवस्थातीत, तिन्ही अवस्थेंत साक्षी रहात असून याहून विलक्षण भिन्न आहेत तस्मात ही अवस्था पण कारण देहरूपजीवाचीच होय असें जाणावें या प्रकारें तीन अवस्था आहेत.

**प्र०**–देहत्रय, अवस्थात्रय, कोशपंचक, हें अंतःकरण आभासयोगें मिथ्याभ्रांती असून, आत्माधिष्ठान मात्र या सर्वांहून पर,सच्चिदानंदरूप, विलक्षण आहे; पण तो अवस्थादिकाहून पृथक् जाणवत कां नाहीं आणि अवस्थादिकच मी असें भान होतें याचें कारण काय?

**स०**–वस्तू वस्तुरूपच असून अन्यवस्तुरूपें जें भान होतें ती केवळ प्रतिबंधानें भ्रांती असते, जशी रज्जू न कळल्यानें सर्प, तथापि मूळ अधिष्ठान रज्जू आहे, ह्मणून त्यावर सर्प भासतो; तसा आत्मा अनुभवीं न येतां भासण्यास मूळकारण, आत्मस्वरूपाचें अज्ञानच आहे, त्यायोगें

१ आच्छादित २ गुप्त.

आत्मानात्म ( सत्यमिथ्या ) ऐक्य झाल्यानें भ्रम होतो; तत्रापि मूलाधिष्ठान ब्रह्मात्मा आहे ह्मणून त्यावर मायायोगें, जगत् भ्रमानें भासतें; व भ्रमांत कांहीं अंश अधिष्ठानाचें सत्य, कांहीं अंशआरोपिताचें मिथ्या, असे दोन असतात जसें सत्यशुक्तीवर शुक्तीच्या, अज्ञानानें मिथ्या, रजत, कागद, अभ्रक असे तीन भासतात यांत रजतभास होतो, तेव्हां, कागद अभ्रक दिसत नसून, कागद भास होतो तेव्हां, रौप्य अभ्रक भासत नसतात व अभ्रक भासतो ते काळीं रौप्य कागद नाहींत, आणि वास्तव शिंपींत तिहींचा अभाव, तसें सत्याधिष्ठान कूटस्थात्म्यावर अधिष्ठानाच्या अज्ञानानें बुद्धी वृत्तीअभासयोगें जागृत स्वप्न सुषुप्ती या तीन अवस्था भासतात. यांत जागृतींत स्वप्नसुषुप्ती नसून स्पनांत जागृत्सुषुप्ती नाहीं; व सुषुप्तींत जागृत्स्वप्न नसतें; एवं एक अवस्थाकाळीं दोन अवस्थांचा अभाव. व वास्तवीक तर अधिष्ठानआत्मत्वीं तिहींचा अभाव आहे. तिन्ही अवस्थेंत आत्मा सच्चिदानंद अस्तिभातिप्रियत्वें एकच असतो आणि अवस्थांचा व्यतिरेक आहे ( एक आहे तर दुसरी नाहीं ) यावरून अवस्थादिक सापेक्षक जड होत. व पूर्णत्रिपुटीनें भासतात, नाहींतर, नाहीं ह्मणून मिथ्या, तरी भासत असून सत्यात्मा भासत कां नाहीं ? तर त्याचेच सत्तेनें हें सर्व उद्भवून विशेष व्यवहार करतात परंतु सत्यासत्यमिश्रणानें अविचाऱ्यास ग्राह्य नाहीं. जसें नेत्र असून उपनेत्र दीप सूर्यादिकप्रकाश आहे तर सूक्ष्मादिक वस्तु दिसतात पण जर मुख्य नेत्रच नाहींत तर दीप उपनेत्र असतांही व्यर्थ. तस्मात् पहाणारा मुख्य चक्षूच; व दीप, उपनेत्र, हीं उपकरणें होत. तसे मनेंद्रियें आभासादिक हीं सर्व विशेषज्ञान व्यवहाराचीं उपकरणें होत जसा दीप स्वप्रकाशें प्रथम अंधारास दूर करतो तदनंतर नेत्रानें वस्तु दिसते तसा कोणत्याही विषयीं पूर्वीं अधिष्ठानचित्प्रकाश होऊन नंतर बुद्धी आभासादिक हे विशेषज्ञान क्रिया कर्ते होतात एवं आत्मप्रकाशबळेंच याची सत्ता असते. आत्म्याविना

यांची उपलब्धिच नाहीं. परंतु अधिष्टान, आत्मस्वरूप, अशब्द, अस्पर्शादिक निर्गुण आहे व गुणरहित वस्तूस मनेंद्रियें अन्नास ग्रहण करण्यास असमर्थ, यावरून अंतःकरण आभासयोगें जें जें जाणलें जाईल तें तें मिथ्या. आत्म्याहून भिन्न. हें सांगणेंच नको. यद्यपि देहत्रय अवस्थात्रय कोशपंचक याहून अन्य कांहीं अनुभवीं येत नाहीं, तत्रापि ज्या सत्तेनें हे सर्व जाणले जातात तोच मी ( आत्मा )

**पंचानामपि कोशानां निषेधे युक्तितः श्रुतेः**
**तन्निषेधावधिः साक्षी बोधरूपोवशिष्यते ॥**
**योयमात्मास्वयंज्योतिःपंचकोशाविलक्षणः**

पंचकोशनिषेधें सर्वावधीचे अंतीं

**नोदेति नास्तमायाति न वृध्दिं याति न क्षयं**
**स्वयं विभात्यथान्यानि भासयेत्साधनं विना ॥**

उदयास्तव वृद्धिक्षयरहित सर्वाहून पर निर्गुण निराकार ज्ञप्तिमात्र नित्य सत्य निरापेक्ष साधनावांचून स्वप्रकाश आहे

**सर्वं येनानुभूयंते यः स्वयं नानुभूयते**
**तमात्मानं वेदितारं विध्दि बुध्दया सुसूक्ष्मया ॥**

ज्या योगें अवस्थात्रयादिक जाणवतात, पण तो जाणवत नाहीं, तोच मी ( आत्मा ) होय. जसें कारंजें असतें त्याची कळ उघडी झाल्यानें त्यांतील जलधारा बाहेर येतात व बंद झाल्यानें प्रवाह मिटून त्याचा पाहणारा मात्र बाकी राहतो. तसें स्थूळ देहांत अंतःकरण आभास कारंजें आहे. जागृत्स्वप्नांत त्याची प्रारब्धरूपकळ उघडी असल्यानें त्यांतून त्रिगुणरूपधारा बाहेर निघतात व प्रपंचव्यवहार होतो आणि

सुप्तींत प्रारब्धकळ बंद झाल्यानें त्यांचा उम्द्‌व लय जाणणारा ज्ञान मात्र जो कोणी सर्वांचे अंतीं उर्वरीत राहतो तोच मी ( आत्मा ) तात्पर्य शुद्धस्वरूप मनेंद्रियागोचर नाहीं. तरी गुणें गेल्यास प्रत्यक्ष होत आहे हें अनुभवीच जाणतात, इतर नाहीं. यास्तव जसजशी रात्र क्षीण, तसतसें सूर्य प्रकाशाचें बल अधीक व पूर्ण प्रकाशें रात्रीचा समूळ अभावं. तद्वत् अज्ञानजन्यत्रिगुणवासना विकल्पलयें आत्मसूर्य आपणच प्रकाशित होतो; व जों जों आत्मप्रकाशबल वाढेल तों तों वासना काम सकाम सर्वप्रकारच्या भ्रांती निःशेष लयास जातात. त्यासच प्रत्यक्ष स्पष्ट होत आहे यावांचून त्यास जाणण्यास अन्योपाय नाहीं.

**प्र०**—भ्रान्ती किती प्रकारें असून काय रूपें आहेत व त्याची निवृत्ती कशी होते.

**स०**—भेदभ्रांन्ती, भोक्ताभ्रान्ती, संगभ्रान्ती, विकारभ्रान्ती, जगत्‌सत्यभ्रान्ती अशी पांचप्रकारची भ्रान्ती अधिष्टानात्म्यावर अंतःकरण भासयोगें होते. ती मिथ्या आहे. या भ्रान्ती बिंम्बप्रतिबिंबादिक दृष्टांतानें दूर होतात त्या.

१ भेदभ्रान्ती ह्मणजे देवालयांत जो शद्ब करतो त्याचाच प्रतिध्वनी उलट उमटतो तो दुसऱ्या मनुष्याचा नसून अविचारें अन्य भासतो. किंवा मृद्‌घट कांचघट दोहींत दीप सारखा असून घटाच्या उपाधींत भेद ह्मणून भिन्न भिन्न भासतो अथवा दर्पणांत जो पहाणारा तोच प्रतिबिंबत्व भासतो अन्य नाहीं यांत प्रतिबिंब व दर्पण दोन्ही मिथ्या पण बिंबरूप एकच पुरूष असून तोच सत्य आहे; यास्तव त्या प्रतिबिंबाचे धर्म बिंबाहून भिन्नत्व, दर्पणांत स्थितत्व, मिथ्यत्व, याचा

१ जाणवत नाही. २ सत्वादित्रिगुण.

निश्चय केल्यास बिंब प्रतिबिंब एक ( अभेद ) च ठरतात. याच प्रकारें मायोपाधींत जें अधिष्टानात्म्याचें प्रतिबिंब त्यास ईश्वर व अविद्योपाधींत जें प्रतिबिंब त्यास जीव ह्मणतात. यांत मुख्य बिंब सामान्यचैतन्यत्रिकाला-बाधितसत्य व विशेषचेतन जीवेशवृत्तिबुद्धिलयें बाधित होतात, ह्मणून मिथ्या. जसा:—

**अक्षिदोषाद्यथैकोऽपि द्वयवद्भाति चन्द्रमाः**
**एकोऽप्यात्मा तथा भाति द्वयवन्मायया मृषा॥**
**जीवेश्वरादिभावेन भेदं पश्यति मूढधीः**
**निर्भेदनिर्विशेषेऽस्मिन् कथं भेदो भवेदयं ॥**

आकाशांत चंद्र एकच असून कोणीं चक्षुरोगी दोन पहातो, तसा एकच आत्मा विद्याअविद्याउपाधिभेदें अविचाऱ्यास जीवेश्वरभेदें भासतो त्या दोन्ही उपाधी मिथ्या जाणून त्याग केल्या तर जीव ईश्वर अभेद एक ब्रह्मरूपच आहेत अशी भेदभ्रांती निवृत्त होते.

२ कर्ताभोक्ताभ्रांती ह्मणजे स्फटीक कोणत्याही रंगाचा नसतां ज्या रंगाचे पदार्थाचा संयोग होतो तसा दिसतो पण—

**उपाधिनीलरक्ताद्यैः स्फटिको नैव लिप्यते**
**तथात्मा कोशजैः सर्वैः कामाद्यैर्नैव लिप्यते ॥**
**रागेच्छासुखदुःखादि बुध्दौ सत्यां प्रवर्तते**
**सुषुप्तौ नास्ति तन्नाशे तस्माद् बुद्धेस्तु नात्मनः ॥**

तो नील रक्तादिवर्ण, संयोगीवस्तुचा असतो. ती वस्तु दूर झाल्यास मण्यांत भासत नाहीं तद्वत् रागेच्छा सुखदुःख कर्ता भोक्तादिक सर्व धर्म अंतःकरण अभासाचेच होत. निद्रेंत मन अभास नसतां कांहीं भासत नाहीं

व त्याचा सदोदित लयोद्भव पण दिसतो ह्मणून तें खोटें समजून त्याचा समूळ त्याग करावा. कारण कीं, अधिष्ठानात्म्याचा व अंतःकरणाभासाचा संबंध भ्रांतीनें आहे, वास्तव तमप्रकाशवत् संबंधच नाहीं एवं जर संबंधभाव सिद्ध, तर त्याचे कर्तृत्वादिक अभावही सिद्धच. याप्रमाणें कर्ताभोक्ता ही भ्रांती निवारण होते.

३. संगभ्रांती ह्मणजे घट जल योगें आकाशस्थ सूर्य घटांत बिंबतो तथापि त्या घटाचे धर्म उत्पत्ती, नाश, गमनागमन

**जले शैत्यादिकं यद्वज्जलभानू न संस्पृशेत् ॥**

जलाचे शैत्यादिक धर्म प्रतिबिंबासच स्पर्श करीत नसतात तरमग त्याचें जें मुख्य बिंब ( सूर्य ) त्यास कसे लागतील? तद्वत्.

**बुद्धेः कामादिकं तद्वच्चिदाभासं न संस्पृशेत् ॥**

स्थूलदेहघटांत सूक्ष्मदेहजल आहे. त्यांत चित्भानूचें प्रतिबिम्ब चिदाभासरूपें होतें तरी त्यास देहादिकांचा संबंध वास्तव नाहीं; कारण प्रकाश मात्रच याचा स्वभाव आहे आणि प्रकाश व जडाचा संयोग होणें [illegible] टीत. वन्हीयोगें लोह पिटलें जातें तरी ते जडाचे आघात जडचसोस प्रकाशास तें ओझें घेणें अवघड. एवं प्रतिबिंबासच जर संबंध त्याचें जें मुख्य बिंब ( कुटस्थ ) त्यास शरीरसंबंध ना[illegible] नको. ह्मणजे सृष्टीपूर्वी आत्मा अद्वैत हें श्रुतिशास्त्रसिद्ध [illegible] ना निर्विकार एक अद्वैत रहातो त्याचा अनुभव जागृति[illegible] हें [illegible] पूर्वापरसंबंधाभावें मध्यें जो संबंध दिसतो तो [illegible] सृष्टीलयें [illegible] आद्यंतीं येतो. भासतो तस्मात् देहादिकांचे संबंध आत्मत्वें [illegible] वास्तव नाहीं उपाध[illegible] आत्मा त्रिकाली, निर्विकार, असंग आहे. [illegible] समजणें ही भ्रांति [illegible] [illegible]विचारें संगभ्रांती नि[illegible]

१ म[illegible] [illegible]. २ अंधार.

४ विकारभ्रान्ती ह्मणजे अंधकारांत रज्जू असून काय आहे ह्मणून पहाण्याच्या हेतूनें नेत्रद्वारें विशेषवृत्ती निघते ती वृत्ती अंधकारदोषामुळें दोराकार न पाहतां उलट सर्पाकार पहाते तथापि त्या दृष्टीनें मूळ दोराचे सत्यत्वाचा लोप होत नाहीं, पण तो दोर मंदांधकारउपाधीमुळें सर्पाकार भासतो तो सर्प, दोर न कळण्याचा परिणाम मिथ्या भ्रम आहे, रज्जूस विकारत्व आलें नाहीं. याचप्रकारें आत्मचैतन्याश्रित मूलाविद्या आहे तिच्या दोन शक्ती आवरण, विक्षेप, अशा आहेत. ती मूलाविद्या प्रारब्ध निमित्तानें प्रपंचविकारास धारण करते; तेव्हां जसा अंधकार व नकळणें दोन मिळून दोराचा सर्प भासतो, तद्वत् सत्यआत्म्याचे आवरणशक्तीमुळें आच्छादन व स्वस्वरूपविस्मरणांत विक्षेपशक्तीमुळें नामरूप प्रतिपादन असा नानाकारें जगत्प्रपंचरूपें अधिष्ठानात्माच भासतो तीं नामरूपें अविद्येचा परिणाम मिथ्याभ्रम होय. जसें—

**तक्रादि लवणोपेतमज्ञैर्लवणवद्यथा**
**आत्मा स्थूलादिसंयुक्तो दृश्यते स्थूलकादिवत् ॥**

तक्रांत लवण मिळाल्यानें मूढास सर्व लवणच वाटतें, तसा आत्मा स्थूलादिसंयोगें अज्ञान्यास स्थूलवत भासतो. एवं अज्ञानोपाधियोगें आत्म्यावर नामरूपजगत्प्रतिती आहे. आत्म्यास विकार नाहीं, अशी विकारभ्रांती नष्ट होत आहे.

५ जगत्सत्य, ही भ्रांती ह्मणजे कनकाहून कटक कुंडलादिक भिन्न नसतां नाम मात्रच भेद; घटशरावादिक सर्वमृत्तिकाच असते; बुद्धिबळाचे हत्ती घोडे उष्ट्रादिक सर्व काष्टच होय बाण खड्ग त्रिशूलादिसर्व लोहच; अनेकवस्त्रें सर्व सूतच; घृत पातळ किंवा थिजून आकार दिसला तरी सर्व घृतच असतें—

१ कार्य.

**यथा न तोयतो भिन्नाफेनोर्मिहिमबुद्बुदाः**
**आत्मनो न तथा भिन्नं विश्वमात्मविनिर्गतं ॥**

फेंस, बुडबुडे, लाटा, तरंग, सर्व जलच आहे; जलाहून भिन्न नाहीं तद्वत् ब्रह्मात्म्याहून जगत भिन्न नाहीं. अरे एकाच वस्तुचीं प्रचारांत अनेक नामें असतात, तसें कोणी ब्रह्म कोणी जगत् ह्मणतात अथवा कटक कुंडलादिकांचें मूळ सुवर्ण, तसें सर्वसृष्टीस मूळ अधिष्ठान ब्रह्म

**सच्चित्सुखात्मकं ब्रह्म नामरूपात्मकं जगत् ॥**

सच्चिदानंद आस्तिभातिप्रियरूपें प्रसिद्ध; त्याविना नामरुपजगत् सत्य सिद्ध होत नाहीं. नामरूपासच जगत संज्ञा आहे ह्मणजे वस्तुमात्र त्रिगुणपंचभूतात्मक, व पंचभूताचे मूळ संकल्प, आणि संकल्पास अधिष्टान ब्रह्म; एवं पंचभूतें पृथक करितां वस्तूस काय रूप राहतें? अविवेकें भेद भासतो तो मिथ्या यावरून—

**अध्यस्तो रज्जुसर्पोयं सत्यवद्रज्जुसत्तया**
**तथा जगदिदं भाति सत्यवत्स्वात्मसत्तया ॥**

रज्जुसत्तेनें, रज्जुवर, कल्पितसर्प सत्यवत भासतो तसें सर्व विश्व अधिष्टानात्मसत्तेनें अधिष्टानावर मायाकल्पितसत्यवत भासतें. अधिष्टानसत्तेहून पृथक केलें तर त्यास कांहींच रूप नाहीं याचकारणें जीव ईश जगत् मिथ्या ह्मणतात. एवं—

**मायामात्रमिदं द्वैतमद्वैतं परमार्थतः**
**इति ब्रूते श्रुतिः साक्षात्सुषुप्तावनुभूयते ॥**

द्वैत मायामात्र; व अद्वैतच सत्य, असें श्रुति शास्त्रें ह्मणतात, त्याचा सुषुप्तींत अनुभव आहे. कारण—

**अनन्यत्वमधिष्ठानादारोप्यस्य निरीक्षितं**
**पंडितै रज्जुसर्पादौ विकल्पो भ्रांतिजीवनः ॥**

आरोपितसर्प अधिष्ठानरज्जूहून भिन्न नसतो, तद्वत भेदास मूळ भ्रान्तीच आहे. ह्मणजे—

**चित्तमूलो विकल्पोऽयं चित्ताभावेन कश्चन ॥**

जगतेत्प्रपंचाचें मूळ चित्तच दिसतें; सुषीत चित्ताभावें जगदाभाव असतो, तस्मात सर्व एक ब्रह्मात्माच अद्वैत, सत्य, सिद्ध, अन्य कांहीं वस्तूच नाहीं. असें विवेक विचारें पक्कें समजून त्यानें दृढानुसंधान ठेवि-ल्यास जगत्सत्यत्वभ्रान्ती निवृत्त होते. अशा या पांच भ्रान्ती मिथ्या आहेत.

**प्र०**—सर्व सृष्टी आपण मिथ्या सांगतां पण प्रत्यक्ष सर्व आहे ती खोटी कशी ह्मणावी ?

**स०**—अरे गारुड्याच्या खेळांत नानाकार प्रत्यक्ष दिसतात; सूर्य-रश्मी जलवत् भासतात; आकाशास रंग नसता लाल, काळे, दिसतात; अग्नी कोलीतभ्रमणाचें चक्र भासतें; शिंप असून रजतभास होतो; स्तंभ असून तस्कर भासतो; दोर असतां सर्प भासतो; जल स्वच्छ असून हिरवें काळें दिसतें इत्यादिक अविचारानें दिसतात, भासतात, म्हणून खरें कीं काय ? आद्यंतविचारें पहातां मूळ कांहीं नसून भ्रान्तीनें क्षणिक दिसतात, नाश होतात, म्हणून मिथ्या. याचप्रमाणें जगतही आहे. ज्याचें अधि-करण कांहीं नसून, अंतीं न राहतां मध्येंच स्वप्नवत् क्षणिक दिसतें, भासतें, असें जें कारणावांचून तें इंद्रजालवत मिथ्याच ह्मटलें पाहिजे.

१ किरण. २ गारुड.

नसून दिसणें यासच माया म्हणतात; तसाच जगत्प्रपंचही सर्व प्रत्यक्ष दिसतो, व त्याची उपपत्ती तर कांहींच जुळत नाहीं, म्हणून मायामय-मिथ्याभ्रान्ती होय—

## चिदेव पंच भूतानि चिदेव भुवनत्रयं ॥

विचारानें सर्वांचें मूळकारण चैतन्यब्रम्हच आहे. अधिष्ठानसत्तेविना जगाची प्रथक्सत्ता नाहीं, तस्मात ब्रम्हसत्य जगमिथ्या हें सिद्ध.

**प्र०**—आपल्या सांगण्यावरून ही, जगत्कारण ब्रम्ह होत आहे मग जगत् अकारण, मिथ्या कसें?

**स०**—उत्पत्तीला मूळ निमित्त व उपादान अशीं दोन प्रकारचीं कारणें असतात. जसा मृत्तिकेहून कुलाल भिन्न राहून दंड व चक्र योगें मातींतून घट निर्माण करतो यास निमित्त कारण म्हणतात. आणि घट उत्पन्न झाला तरी मृत्तिकारूप, स्थितींत पण मृत्तिकारूप लयही मृत्तिकेंत, असे उत्पत्ति स्थिती लय या तिहींत सारखें आधारभूत रहाणें यास उपादान कारण म्हटलें आहे. पैकीं ब्रम्ह एक अद्वैत आहे अन्यवस्तुचनाहीं, तर निमित्तकारण ब्रम्ह बनत नाहीं. आतां उपादान कारणांत आरंभ, परिणाम, विवर्त, असे तीन भेद आहेत. यांत एक कारणापासून निराळ्याप्रकारचे कार्य उत्पन्नहोणें; जसा तंतूपासून पट, येथें तंतूहून पटपृथक सोजतात यास आरंभोपादन ह्मणतात; व एकवस्तूचें पूर्वरूप नष्ट होऊन पुन्हा तें रूप अप्राप्तीनें दुसरें रूप बदलतें. जसें दुग्धनाशें दहीं यास परिणामोपादन ह्मटलें आहे आणि वस्तूची पूर्वावस्था न जातां अवस्थांतराचा जो भास शुक्ति[1], रजत[2], रज्जु[3], सर्प, स्थाणूचोर[4] यास विवर्तोपादन

१ शीप. २ रुपे. ३ दोर. ४ स्तंभ.

ह्मणतात. या तिन्हीपैकीं आरंभ व परिणामवाद्यांचे मत्त निर्गुण निराकार निरवयव परब्रह्माचे ठिकाणीं घटत नाहीं कारण तंतु दुग्धासारखें ब्रह्म सावयवें नाहीं; यास्तव तिसरा पक्ष विवर्तवाद मात्र वेदान्तसिद्धान्तास अंगीकार आहे, जसें शुक्ती व रज्जु आपल्या मूळस्वरूपास न सोडून भ्रान्तीनें रजत, सर्प रूपें भासतात, तसें ब्रह्म आपले सच्चिदानंद अस्ति भाति प्रियरूपास न सोडून, मायोपाधियोगें जगद्रुप भासत आहे. यावरून रज्जु न जाणण्यानें नीच सर्पवत् भासते; तथापि सर्पाचें कारण रज्जु ह्मणणें योग्य नाहीं. तसें अधिष्टानाचे अज्ञानानें अधिष्टानावरच विवर्तमात्रजगत् नामरूपें भासतें तथापि जगत्कारण ब्रह्म ह्मणतां येत नाहीं. आतां शुक्ति रजतादिक विवर्तांचे दृष्टांत दिले ते साकार आहेत. निरंशब्रह्माचे ठिकाणीं ते घटत नाहींत, असें ह्मणशील तर जसें आकाश निराकार असून आकाशाचें रूप न जाणणारे आकाश नील, पीत, ह्मणतात तसें ब्रह्म निराकार असून मायाभ्रमें जगद्रुप भासतें जसा आकाशास नील पीतादिकाचा संबंध नसून, नील पीतरूप पण वास्तव नाहीं; तसा परब्रह्मास नामरूपजगाचा संबंध नसून, ब्रम्हसत्ता पृथक् केल्यास त्यास खरेपणा ही नाहीं म्हणूनच मिथ्या म्हटलें आहे; तस्मात विश्व विवर्तमात्रच आहे, हें सिद्ध. या विवर्तवादाप्रमाणें सोपाधिकब्रम्ह सृष्टीस अभिन्न निमित्तोपादानकारण सिद्ध होत आहे, शुद्धब्रह्मीं संकल्पच नाहीं.

प्र०—ब्रह्मरूप सच्चित्सुखात्मक आहे त्यापासून असतजडदुःखात्मक विरुध्द जगत् कसें होतें? व ब्रह्म एक अद्वैत ह्मटलें आहे तें उपादान निमित्त, दोहींस कारण कसें होईल?

५ अवयव.

**स०**—वस्तुतः सर्व एकअद्वैतब्रह्मच आहे, परंतु व्यवहारदृष्टया जगदुत्पत्तीचें अभिन्ननिमित्तोपादनकारण मायोपाधिक शबलब्रह्म होय. जसा कोणीएक उर्णनाभिनामकजंतू आपले शरीरांतून तंतु उत्पन्नकरून जाळ करतो व त्यांत आपणच क्रीडा करून पुन्हा सर्व तंतु ग्रासून एकटा रहातो. मग त्या तंतुचें आपले शरीरद्वारा उपादानकारण व चैतन्यद्वारा निमित्तकारण होतो. तसें सोपाधिकब्रह्म आपल्यामायोपाधिअंशें उपादानकारण व चैतन्यांशें निमित्तकारण होत असून, मायीकजग निर्माण करून आपणच त्यांत क्रीडा करून वासनाविलयें माया नाहींशी करून, पुन्हा एक अद्वैतपणें रहात आहे; यांत नामरूपें जितके जगदाकार दिसतात, भासतात, ते मायांश असत. जड, दुःखात्मक, मिथ्या व सच्चित्सुख अस्तिभातिप्रियचैतन्यांश सत्य. अस्तित्वादिक पृथक केल्यांत नामरूपें रहात नाहींत, पण दिसतात तरी मिथ्याच. येणें प्रकारें एकच परमात्म्यास अभिन्न निमित्तोपादानकारणता घटत आहे.

**प्र०**—परब्रह्म एक अद्वैत आहे व त्यावर मायायोगें जगत्कल्पना झाली असें ह्मणण्यांत ब्रह्मात्म्याखेरीज दुसरी माया ह्मणून एक आहेच तेव्हां अर्थातच द्वैत सिद्ध मग अद्वैत कसें ह्मणतां ?

**स०**—ज्या वस्तुचें अमुक ह्मणून निरूपण करतांच बनत नाहीं ती मायिक, मिथ्या, ह्मटलीच पाहिजे. तशी—

**अव्यक्तनाम्नी परमेशशक्ति-**
**रनाद्यविद्या त्रिगुणात्मिका परा ॥**
**कार्यानुमेया सुधियैव माया ।**
**यया जगत्सर्वमिदं प्रसूयते ॥**

१ उपाधिसहित २ दुसरें नाहींच.

माया ही एक ब्रह्मशक्ती आहे; जशी पुरुपाची शक्ती पुरुपाहून भिन्नाभिन्न आहे, तशी ही शक्ती ब्रह्मात्म्याहून भिन्नाभिन्न, विलक्षण, अनिर्वचनीय आहे. ह्मणजे सत् ह्मणावी तर बाधित होते. असत् ह्मणावी तर तिचें कार्य जगत् प्रत्यक्ष आहे; साकार ह्मणावी तर श्रुति शास्त्रें अव्यक्त ह्मणत असून तिचें कांहीं रूप नाहीं. निराकार ह्मणावी तर कार्यरूप जग दिसत आहे. निराकारापासून साकार कसें होईल? ब्रह्मात्म्याहून भिन्न ह्मणावी तर पृथक व्यक्ति नाहीं; अभिन्न ह्मणावी तर ब्रह्म असंग असें श्रुति शास्त्रें ह्मणत असून, ज्ञात्यांचा अनुभव आहे. आतां शक्ति पृथक नाहीं ह्मटली तर कांहीं कारणें कोणीवेळेस शक्तीचा प्रतिबंध होतो; जशी वन्हीची शक्ती दाहक आहे ती कोणी वेळेस मणिमंत्रादिकें बद्ध होते जर शक्ती निराळी नसेल तर हा प्रतिबंध कोणास ह्मणावा? कारण अग्नी तर प्रत्यक्ष आहे व दग्ध करणें हें त्याचें स्वभावीक कर्म होय, तें करीत नाहीं. यावरून शक्तीस प्रतिबंध झाला असें अनुमान होतें. तस्मात अग्नीची शक्ती अग्नीहून भिन्न दिसते. तशीच ही ब्रह्मशक्ती आत्म्याहून भिन्नाभिन्न विलक्षण अनिर्वचनीय आहे ह्मणून तिचें अनुमान कार्यावरूनच केलें पाहिजे; याविना या शक्तीचें रूप समजण्यास अन्य मार्गच नाहीं. जशी अग्नीची शक्ती भाजून आलेल्या प्रत्यक्ष फोडापासून व प्रत्यक्ष निखाऱ्यापासून भिन्न; किंवा मोठा वर्तुलाकाराचा जो घट तो प्रत्यक्ष असतो आणि प्रत्यक्ष असते तथापि ज्या शक्तीयोगें हा घट निर्माण झाला ती शक्ती या दोहींहून भिन्नच ह्मणून कशी? हें सांगताच बनत नाहीं. ही शक्ती घटरूपकार्यापूर्वी मृत्तिकेंत गुप्त असते नंतर कुलाल दंड चक्र सहाय्यानें आकाराप्रत येते तत्रापि जो घटाचा आकार तोही नव्हे व घटाचा आश्रय मृत्तिका पण ती नव्हे यावरून ती अचिंत्य असून या घटाचें रूप शब्द-

१ सांगतां येत नाहीं २ नाश ३ रूप नाहीं ४ आकृति ५ जाळणे.

मात्रच आलें. यास्तव खरें रूप नाहीं ह्मणजे जर मृत्तिकेहून घट भिन्न केला तर त्याचें मुळींच रूप राहत नाहीं यास्तव तो मृत्तिकेहून भिन्न ह्मणतां येत नाहीं, व जर मृत्तिकाच घट ह्मणावी तर पूर्वी मृत्पिंडदर्शेंत घट दिसत नाहीं एवं हा घट नाममात्रेंच. शक्तीचें कार्य मिथ्या; हें सिद्ध. तशीच ही ब्रह्मशक्ती जगद्रूपकार्याहून व आश्रयरूप अधिष्ठानात्म्याहून भिन्नाभिन्न विलक्षण अनिर्वचनीय आहे. आणि निःसतत्व हेंच तिचें रूप असूनही अव्यक्त असो अथवा कार्यरूपें व्यक्त असो तरी सतासत ह्मणतां बनत नाहीं ह्मणून मिथ्या होय. याचकारणें माया व तिचें कार्यरूप सर्व जगत खोटें. परंतु शक्ती व कार्य घट आणि त्यांस आधारभूत मृत्तिका या तिहींत पूर्वीची शक्ती व घट हे दोन्ही कालभेदास पात्र आहेत ह्मणून मिथ्या व तिसरी जी मृत्तिका ती उत्पतिस्थितिलयांत त्रिकाल रहाते ह्मणून सत्य. याच दृष्टांतें माया व तिचें कार्य जगत् उद्भव नाश होतो. ह्मणून नामरूपात्मक सर्वजगत व माया दोन्ही खोटीं आणि अधिष्ठानात्मा उत्पत्तिस्थितिलयीं त्रिकाल अबाधीत सच्चिदानंद अस्तिभातिप्रियत्वें रहात आहे ह्मणून सत्य. या ब्रह्मचैतन्याची अचिंत्यरूप ही मायाशक्ती वन्हींत उष्णत्व, जळीं द्रवत्व, लवणीं क्षारत्व, मिरचींत तिक्ष्णत्व, गुडांत मधुरत्व, अशा रूपें असते ती कार्यापूर्वी कळत नसून कार्यावरून कळते. तशी जगत्कार्यावरूनच जाणवते जसा वायु स्पंद निस्पंद, दोन्ही रूपें असून स्पंदांत स्पष्ट भासतो निस्पंदांत अलक्षित होतो. तद्वत मायाशक्ती संकल्पयोगें सोपाधिकब्रह्मापासून मायीकजगत स्पष्ट भासते व मायासंकल्पविलयें नाहींशी होतें. तस्मात मायाजगत्मिथ्या. एक अद्वैत अधिष्टानब्रह्मात्माच सत्य, हें सिद्ध. द्वैत नाहींच नाहीं.

प्र०—निद्रेंत स्वप्नसृष्टी भासते, ती निद्रानिवृत्तींत नष्ट होते, व रज्जुच्या अज्ञानानें सर्प भासतो तो रज्जुज्ञानें नष्ट होतो तशी आत्मज्ञानें जग-

१ खरीखोटी २ एकदा आहे एकदा नाहीं ३ चिंतन करतां येत नाहीं.

निवृत्ती होत नसून पूर्वस्वप्नवस्तू दुसरे स्वप्नांत भासत नसतां जागृतींतील वस्तू तर पूर्ववत तशाच भासतात मग सृष्टी खोटी कशी ह्मणावी

स०—स्वप्नसृष्टीपण, जो दृढजागृत होतो त्याचीच नष्ट होते. तसा दृढबोधें जगदाभास नष्ट होतो—

**ज्ञात्वाप्यसर्पं सर्पोत्थं यथा कंपं न मुंचति ।**
**विध्वस्ताखिलमोहोपि मोहकार्यं तथात्मनि ॥**

रज्जुज्ञानानें सर्प नष्ट झाला तरी त्योगें झालें जें भय कंपादिक तें तत्काल नष्ट होत नाहीं. वन्ही शांत झाला तरी कांहीं वेळ भूमी उष्ण रहाते निशाणवेध झाला तरी बाण पूर्ववेगें पुढें जातो वृक्ष तुटूनपडतांही कांहीं वेळ सरस सार्द्रता असते. कुलाल चक्राचा दंड काढून घेतो पण पूर्वसंस्कारें कांहीं वेळ चक्र भ्रमत असतें तद्वत आत्मज्ञानानें मोह निवृत्त झाला तरी पूर्वसंस्कारें मोहकार्य जगाभास एकाएक निवृत्त होत नाहीं कारणः—

**चित्तोन्मेषनिमेषाभ्यां संसारस्योदयक्षयौ ।**
**वासनाप्राणसंरोधादनिमेषं मनः कुरु ॥**

चित्ताचे उदयास्तीं अनादिवासनेमुळें नामरूपात्मक जगत्संसार क्षणोक्षण उदयनाश होतो यास्तव अन्वय व्यतिरेकें दृश्यमात्रसर्व मिथ्या, हें यथार्थजाणून वासनादिकरोधें आत्मानुसंधान दृढ केलें पाहिजे. अरे एकतृणलोप करण्यासही यत्न लागतो, मग हा ब्रह्मांड नाहींसें करण्याचा उद्योग आहे; यांत नुस्त्या तोंडाच्या बडबडीनें काय होणार! ज्यावर मोठा बोजा पडला तो त्यानें अतिबळें उचलला तरच उचलला जाईल तद्वत

१ अमुक असेल तर अमुक असायचेंच २ एक असेल तर दुसरे नाही.

जीवावर अहंकारादिकसंबंधें दृश्यरूपी थोर बोजा पडला आहे तो निःसंग होऊन अतिबळें प्रबळ यत्नकरील तरच अनुभवसाक्षात्कारांतीं दूर होईल अरे जें उत्पन्नच नाहीं तें नाश कमें पावणार ?

**अध्यस्तसर्पाभावेन रज्जुरेवावशिष्यते ।**
**तथा जगदभावेन सदात्मैवावशिष्यते ॥**

रज्जुचा सर्प कालत्रयीं आला नाहीं ह्मणून नाश पण नाहीं. तथापि भ्रांतींत झाला. भ्रांतीनष्टे रज्जूंतच लय पावला. तो कोठून आला कोठें जातो रज्जू न कळण्यांत आला रज्जुज्ञानांत रज्जूचेच ठिकाणीं लय होऊन रज्जूच अवशेष रहिले तसाच ब्रह्मात्म्यावर विश्वोद्भव कालत्रयीं झाला नसून स्वस्वरूपअज्ञानानें नामरूपजगाचा उद्भव अज्ञान तावत जगत्स्थिती व अधिष्ठानज्ञानें समूळ अज्ञान देहाध्यास गेल्यावर अधिष्ठानींच लय होत असून आत्माच अवशिष्ट रहातो एवं—

**यदिदं दृश्यते किंचित्तन्नास्ति किमपि ध्रुवं**
**यथा गंधर्वनगरं यथा वारि मरुस्थले ॥**

नामरूपात्मक जें जे दृश्य तें किंचित्मात्रही कालत्रयीं झालेंनसून होणारही नाहीं. जसा मध्यान्हीं सूर्य असतां मरुस्थळीं जलाभास होतो तें पाहून तृषार्त तेथें जाऊन पहातां जल नाहीं असें खचीत कळते तरी पुन्हां पूर्वस्थळीं येऊन पहातां जलवत् दिसतें किंवा ऐंद्रजालिक स्वमाया पसरतो तावत् नानाकार प्रत्यक्ष दिसतात अथवा स्फटिक मण्यास उपाधिसंबंध असे पर्यंत नील पीत दिसतो परंतु उपाधिचे आद्यंतीं रहात नाहीं यास्तव दिसतां मिथ्याच. तशीच ज्ञानोत्तर पण नामरूपात्मक सृष्टी

१ उपरात.

अधिष्ठानावर मायोपाधिनें भासते, हा सोपाधिकभ्रम आहे. असे घटरूप-कार्यांत कारणरूपमृत्तिकाच असते ती मृत्तिका घटांतून वजा केली तर घटास काय रूप रहाते? तद्वत कारणरूपअधिष्ठानात्मा सच्चिदानंद अस्तिभाति प्रियत्वाहून भिन्न नामरूपजगत्कार्यास काय सत्यता आहे? ह्मणून कारणरूप जें अधिष्ठान त्याच्या ज्ञानानें कार्याची निवृत्ती तें मोटें; असें जाणावें त्या वस्तुचें न दिसणें असें समजूं नये एवं देहोपाधि असे पर्यंत जगदाकार दिसतो तथापि अधिष्ठानसत्तेविना मिथ्या. तस्मात अधिष्ठानात्माच उपाधियोगें जगद्रुप आहे अशा दृढनिश्चयें ज्ञात्यास बाधक, नाहीं. दुसरें सृष्टींतील वस्तू सदोदित आहेत हें ह्मणणें पण भ्रांतीच होय जशा स्वप्नवस्तु स्वप्नोत्तर नाश होतात तशा जागृतींतील वस्तूपण कांहीं अवकाशानें नष्ट होतात. नदी पूर्वीची, तीच ही ह्मणतात, पण जल निरंतर जात येत असतें. दीप तोच ह्मणतात. पण ज्वालाशिखा वर क्षणोक्षण जातात. पुत्र तोच ह्मणतात पण बाल्य, कौमार, युवाद्यवस्था कालानें नेल्या. ह्मणूनच, बाल्यावस्थेंतील माता त्यास पाहून मलज्ज होते. एकच फल कालसत्तेनें तुरट, कडवट, आंबट, मधुर. असे विकार पावतें. त्यांचें पूर्वरूप नांव गुण अवस्था कालानें हरण करून नूतन नाम रूप गुण अवस्था देतांही मोहांध जगत अविचारानें जाणत नाहीं. इत्यादिप्रकारें जागृतींतील वस्तु पण कालेंकालें उद्भव, नाश, होतात. यांत स्वप्नवस्तु निरुपाधिकभ्रमा-मुळें तत्काल नाश, व जाग्रद्वस्तु सोपाधिकभ्रमामुळें कांहीं अवकाशानें नाश पावतात. इतकाच या दोहींत भेद. याच कारणानें यांस जागृत्स्वप्न अशीं दोन नामें पृथक पडलीं असून, जागृदवस्थेस दीर्घस्वप्न ह्मणतात ह्मणजे अधिष्ठानसत्तेनें मायास्फुरणांतून विकल्पवृत्ती दृढहोऊन स्वस्वरूप-विस्मृतीनें जगद्विषयांत सत्यत्वबुद्धीकरून स्थित होऊन अंतःकरणाभास

१ शुक्तीरजत रज्जु सर्पाप्रमाणें २ सुर्य किरणेजल स्फटीक रक्तादि इंद्रजालिक.

इंद्रियादिक आपापला विषयग्रहणव्यापार प्रत्यक्ष करतात अशा स्थिरप्रतितीस जागृदवस्था ह्मणतात; व विकल्पवृत्ती जागृदध्यासें वासनेनें आंतलेआंत भासविषय कल्पून मनोमय व्यवहार करते, अशा अल्पकाल-प्रतीतीस स्वप्नावस्था ह्मटली आहे; आणि बुद्धीवृत्तीलयें सर्वांचा अभाव जडात्मकस्तब्धताही सुषुप्तीअवस्था होय, या तिहींचा परस्पर व्यभिचार आहे ( एक असतां एक नाहीं ) किंवा जागृतींतील सुखैकविषयभोगांत प्रथम सुखाकारितां पुढें विरसता शेवट नाश तसेच स्वप्नभोग पण होतात अथवा जागृतीस आद्यंत नसतो तसा स्वप्नासही आद्यंत नाहीं. ह्मणून दोन्ही अवस्था समान मिथ्याच होत. आपापल्याकालीं अर्थाकार होतात असें मिथ्या असतांही जसा—

**यथा बालस्य वेतालो मृत्युपर्यंतदुःखदः**
**असदेव सदाकारं तथा मूढमतेर्जगत् ॥**
**अज्ञस्य दुःखौघमयं ज्ञस्यानंदमयं जगत्**
**अंधं भुवनमंधस्य प्रकाशं तु सचक्षुषः ॥**

बालास असतपिशाच्च भ्रांतीनें मरणांत दुःख देतो, किंवा जन्मांधास सर्वत्र अंधकार, नेत्र आहेत त्यास प्रकाश तसा अज्ञान्यास असत् नामरूपजगदा-कार दुःखरूप असून ज्ञान्यास अस्तिभातिसुखरूप सर्व आत्माच भासतो. ह्मणजे वस्तु एकच असून दृष्टिभेदें भिन्नत्व आलें. सूर्य मध्यान्ही असून उलुकास अर्ध रात्र व सर्वजनास दिवस अथवा मृत्तिका सुवर्ण एकेकच असून ज्याची घट, कुंडलबुद्धी, त्यास मृत्तिका, सुवर्ण, असून नाहींसे होतात; व ज्याची आकारबुद्धी नसून मृत्तिकासुवर्णबुद्धी आहे त्यास घट कुंडलआकार भासतांही मिथ्या होतात. याप्रकारें सर्वएक अधिष्टान—ब्रह्मात्माच नित्य सत्य. अन्यपदार्थच नाहीं. ह्मणून जगत खोटें.

**प्र०**—अन्वय व्यतिरेक यांचें रूप लक्षण कसें आहे ?

स०–जी वस्तु सदोदीत रहाते, तिचा अन्वय ह्मणतात. जी वस्तु क्वचित्काळीं आहे, क्वचित्काळीं नाहीं, अशी उद्भव नाश होते तिचा व्यतिरेक ह्मणतात. जशा जागृत्स्वप्नसुषुप्ती या तीन अवस्था व तिहींचीं स्थूल, सूक्ष्म, कारण, हीं निरनिराळीं तीन शरीरें आणि घटपटादिक पदार्थ हे एक अवस्थेचे दुसरे अवस्थेंत नसून त्यांत अस्तिभातिप्रियत्वें रहाणारा जो जीवात्मा तो त्रिकाळ असल्यानें त्याचा अन्वय, व अवस्थादिकांचा व्यतिरेक, यास दृष्टांत कितीक पुरुष जागृदवस्थात्मक स्थूलशरीरानें अंध, बधिर, मुके, पंगु, असतात ते स्वप्नांत पहाण्याचा, ऐकण्याचा, बोलण्याचा, व्यापार करतात; व ज्या ग्रामांत निद्रिस्त आहेत तें गांव सोडून अन्यग्रामीं जातात ही स्वप्नावस्थेची गोष्ट सर्वांस अनुभवीत आहे. अर्थात जागृत्कालचें शरीर स्वप्नांत नाहीं आणि जागृदवस्थेंत इंद्रियद्वारा स्पष्ट विषयभोग घेणारा जो जीव तोच स्वप्नावस्थेंत मनोद्वारा घटपटादिक सर्व पदार्थ मनोमय कल्पून व्यवहारकरतो; यावरून अवस्थेंत भेद झाला तरी तो नष्ट होत नाहीं तोच, सुषुप्तींत या दोन्ही अवस्था व त्या अवस्थांचीं दोन्हीं शरीरें आणि घटपटादिक पदार्थ मात्र सर्वांचा अभाव जाणत असून, स्वाधिष्ठानभूत सुखाचाही अनुभव करतो. तोच पुन्हा जागृतींत मी सुखांत निजलों होतों मी कांहीं जाणत नव्हतो असें ह्मणतो. याप्रकारें विशेषचैतन्यजीवात्म्याचा अन्वय, अवस्थादिकांचा व्यतिरेक, ह्मणून अवस्थादिक मिथ्या होत. वर जो अन्वय सांगितला तो शुद्धात्म्याचा समजूं नये; कारण शुद्धात्मा निर्विकल्प आहे; त्याचे ठिकाणीं जीवत्व किंवा अवस्थादिक कोणीच जगद्रूपविशेषकल्पना नाहीं. शुद्धात्मा केवळ बोधमात्र. या सर्वांस अधिष्ठान सत्तास्फूर्ती देणारा आहे जर त्याचाच अन्वय ह्मटला तर अवस्थादि सर्वांस सत्यत्व येऊन शुद्धात्म्याचे अद्वैतपणाची हानी आहे तस्मात अविद्योपाधिविशिष्ट जो जीव त्याचाच अन्वय

१ चिदाभास.

समजला पाहिजे, कारण अवस्थादिकांची कल्पना पण सोपाधिकचैतन्यापासून झाली आहे. तोच जीव उपाधिविलयें शुद्धात्मा होण्यास योग्य होतो, अशीं अन्वयव्यतिरेक लक्षणें आहेत.

**प्र०**—कूटस्थात्मा अधिष्ठानभूत सर्वत्रपूर्णव्याप्त; ह्मणून तदाधारें बुद्धीवृत्ती जीवेशादिक जड, चेतन होऊन, स्वस्वक्रियाकर्ते होतात. तर घटपटादिक इतरजड ते चेतन कां होत नाहींत?

**स०**—यांत उपाधीचा भेद आहे

**दर्पणे बिंबितोऽर्कः प्रकाशं कुरुते यथा**
**तथा प्रकाशयत्यात्मा स्वच्छधीष्वनुबिंबितः॥**

सूर्यप्रकाश सर्वत्र समान असून कांच जल याविना प्रतिबिंब होत नाहीं; याचें कारण स्वच्छास्वछता होय. एकच मृत्तिकेंतून घट कांच होतात, यांत घट तमोगुणकार्य अस्वच्छ; ह्मणून प्रतिबिंब होत नसून कांच सत्वगुणकार्यस्वच्छ; यामुळें प्रतिबिंब होते किंवा अग्नी दाहक प्रकाशक आहे; तथापि दुरून दीपरूपें प्रकाशक होतो; पण दाहक होत नाहीं; अथवा जलांत व्याप्त होऊन दाहक होतो, पण प्रकाश नाहीं. एवं उपाधिभेदें भेद होतो. तद्वत् पंचभूतात्मक अखिलजडाजडीं अधिष्ठानात्म्याची व्याप्ती समान असून, उपाधिभेदामुळें भेद आहे. वृत्ति, बुद्धी, सत्वगुणकार्यस्वच्छ यास्तव त्यांत प्रतिबिंब उमटतें. त्या वृत्तीस इंद्रियादिकांचा संबंध आहे, ह्मणून सर्व चेतन होऊन, स्वस्वक्रिया करतात. तें अंतःकरण घटादिक जड तमोगुणकार्य अस्वच्छ त्यांत नसतें, यास्तव तेथें आत्म्याचें सद्रूप अस्तित्वमात्र सामान्यत्वें असतें; परंतु चिद्रुपआनंदरूपाची स्पष्टता नाहीं. ह्मणजे घटपटादिकपदार्थकल्पक जें अंतःकरण त्याचे ठिकाणीं जशी आत्मप्रतिबिंबाची जीवरूपें स्पष्टव्याप्ती आहे तशी जडांत अंतःकरणाभावें

बुद्धिवृत्तिवत् स्फुरण होत नाहीं. अस्पष्ट आहे. म्हणून स्पष्टतेनें भासत नाहीं.

प्र०—आत्मा असंग अविकार अधिष्ठानमात्र म्हणून तेथें कर्तृत्वादिक घटत नसून, अविद्याकार्यअंतःकरण आभासादिक निःसत्त्व मिथ्या, तेथें पण असंभव. एवं संसार दोहींकडे नसून—

**भिन्ने पंचात्मके देहे पंचानां पंचधा गतिः**
**प्राणैर्विमुक्तदेहस्य धर्माधर्मौ क्व गच्छतः ॥**

प्राणोत्क्रमण झाल्यावर देहांतील पंचभूतांश पण आपापणांत जातात. मग धर्माधर्म कोठें कसे राहतात ? कीं त्यायोगें पुन्हा जन्म मृत्यु होतात. आणि ते जन्म मरण. सुख, दुःख, बंध मोक्षादिक कोणास कसे होतात ?

स०—आत्मा अधिष्ठानमात्र असंग अविकार यास्तव त्याचे ठिकाणीं जगद्रुप कोणतीच कल्पना घटत नसून, देहेंद्रिय अंतःकरणभासादिक संघांतरूप कार्यसहित अविद्या जड म्हणून त्यांकडे पण कल्पनेचा असंभव. याच सिद्धांतानें आत्म्यास कोणेकाळीं संसार नाहीं, हें सिद्ध. आणि मुमुक्षूनें आपले ठिकाणीं अविचारानें कर्तृत्वभोक्तृत्वादिक आलेला संसार निवर्त होण्यास हाच विचार करावा कीं---

**स्वप्नदेहजदुःखादि जाग्रद्देहं न संस्पृशेत्**
**जाग्रद्देहजदुःखादि तथात्मानं न संस्पृशेत् ॥**

स्वप्नदेहाची सुखदुःखें जागृद्देहास स्पर्श करीत नसून स्वप्नदेह जागृतींत नाश होतो; तरी मी नष्ट होत नाहीं. तर जागृद्देहाचें कर्तृत्व, भोक्तृत्व, उत्पत्तीनाश मला कुठलें ? एवं परमार्थतः

**नैवात्मनो न देहस्य संसृतिर्दृष्टदृश्ययोः ॥**

आत्मा असंग, अविकार, द्रष्टा, साक्षिमात्र, व देहादिक दृश्य, सर्वजड, यावरून संसार दोहींकडेस सत्य नाहीं, तत्रापि अज्ञानास सत्यवत प्रत्यक्ष भासतो. याचें कारण अंतःकरणयुक्त चिदाभासच आहे. जसा नदीतीरीं कोणी उभा असून त्याची छाया जलांत पडली ती पाहून मी पडलों अशी त्यास भ्रांती झाली, याचें कारण आपलें स्वरूप विस्मरणच होय. वास्तव तो दुःखातीत आहे. तसें अविद्याकार्य अंतःकरणांत अधिष्ठानात्म्याचें पडलें जें प्रतिबिंब ( जीव ) त्यानें आपलें मूळस्वरूप विसरून हा संसार उभारला आहे. म्हणजे सत्, चित्, सुख, अद्वैत, हीं चार आत्मस्वरूपलक्षणें असून असत, जड, दुःख, द्वैत, हीं चार स्वरूपलक्षणें मायेचीं होत. यांस असतजडमायाअंशास आत्म्याचें सतचित यानें झांकले, त्यामुळें देहादिक असत जड असतां सद्रुप चेतनरूप भासतात आणि सुख अद्वैत आत्मरूपास दुःख द्वैत मायारूपानें झाकलें त्यामुळें आत्मा सुखरूप अद्वैत असून दुःखरूप द्वैतरूप भासतो. एवं अंतःकरणाभासानें आपलें अनृत, जड, दुःखादिक धर्म आत्म्यावर व अधिष्ठानात्म्याचे चेतनादिक धर्म आपणावर घेऊन मी संसारीं सुखी दुःखी इत्यादि अन्योन्याध्यास केला हाच जीव अज्ञानयोगें पूर्वपापकर्मवशात् बद्ध असून हाच अनेकजन्मसुप्रतफलोन्मुखकाळीं साधनचतुष्टय संपन्न होऊन श्रवणादिकेंकरून आपले अधिष्टानभूत स्वस्वरूपावर अविचारानें आलेला संसार दूर करून ज्ञानानें मुक्त होतो. तस्मात जसा पत्रपुष्पफलयुक्त वृक्ष बीजांत गुप्त असतो तेंच बीज भूमी व जलसंयोगें वृक्षरूपें बाहेर पडतें तसें—

**सहस्रांकुरशाखात्मफलपल्लवशालिनः**
**अस्य संसारवृक्षस्य मनो मूलमिति स्मृतं ॥**

सहस्त्रशः फलपल्लवशाखायुक्त संसारवृक्षाचें मूळ मनच आहे, व सर्व-जगद्विस्तार—

**जाग्रदादौ मनो विश्वं वितनोति चराचरं**
**सुषुप्तौ कुरुते लीनं तस्माद्विश्वं मनोमयं॥**
**धर्माधर्मौ मनश्चैव पंचभूतानि यानि तु॥**
**इंद्रियाणि च पंचैते येचान्ये पंच देवताः॥**
**तथैव मानसाः सर्वे नित्यमेवाभिमानिनः**
**जीवेन सह गच्छंति यावत्तत्त्वं न विंदति॥**

वासनासंस्कार मनांत गुप्त असतां. त बीज आंत असल्यानें अस्पष्ट व बाह्यजागृतींत अविद्याभूमी इच्छासंकल्पजलयोगें बाहेर जगद्रूपें भासतें, तेंच मनादि सुषुप्तींत लीन असतां विश्व भासत नाहीं; तेंच मन, बुद्धि, आभास, स्थूलांतून निघून जातात तेव्हां देह जडवत अक्रिय पडतो त्यास व्यवहारांत मरण ह्मणतात. तत्काळीं पूर्वोक्तलिंगदेह असतो, त्यांत प्रतिबिंब जीव धर्माधर्म सर्वसूक्ष्मसंस्कारें वायूंत गंधवत रहातात. तोच लिंग-देह पूर्वकर्मभोगार्थ स्थूलयोगें, पुन्हा स्पष्ट होतो, त्यास जन्म ह्मणतात. आणि पूर्वपुण्यपापभोग भोगतो, या लिंगदेहाचा आत्मज्ञान नाहीं तावत् कोटिकल्पि नाश नसून, पूर्वोक्त सत्रा तत्वात्मक वासनामय लिंगशरीर व धर्माधर्मसामुग्री समागमें घेऊन, अज्ञान तावत हा जीव जन्ममरणरूप संसारनदीप्रवाहीं अविश्रांत भ्रमण करीत राहतो. तत्वावबोध यथार्थ नाहीं तोंपर्यंत, हें भ्रमण चुकत नाहीं. एवं अंतःकरणाभासासच संसार आहे आत्म्यास नाहीं ह्मणजे वस्तुतः

**न बुद्धेरेव बोधोस्ति नात्मनो विद्यते क्रिया**
**अतो नान्यतरस्यापि जानातीति तु युज्यते॥**

बुद्धिआभासादिक सर्व जड मिथ्या व आत्मा निराकार असंग. याविना तिसरा कोणी कर्ता भोक्ता आढळत नाहीं. आणि स्थूलसूक्ष्म- देहाच्या चलनादिक क्रिया तर होतात. व देहद्वयांत आत्म्यावांचून अन्य चैतन्यांस नाहीं तर कर्ता भोक्ता कोण? व कर्ता भोक्ता नाहीं म्हणावें तर श्रुतिशास्त्रें व्यर्थ होतात. वेद शास्त्रें निरर्थक झालीं तर कर्मोपासना ज्ञानास व्यर्थत्व येऊन तत्साधनास कोणी प्रवृत्त होणार नाहीं. धर्मकर्म नष्ट झालें तर जगत्क्षय होईल, या व्यवस्थेकरितां जसे राजसेवक युध्दा- दिककर्म करतात त्याचा जयाजय नृपावर. किंवा सभर्तृका स्त्री परपुरुषासंगें गर्भवती झाली तरी तो आरोप पतिवर. तद्वत् मायाअविद्याकृताचा अपवाद अधिष्ठानावर आहे, तो कल्पित, अवास्तव, मिथ्या, असें श्रुतिशास्त्रें म्हणतात. परमार्थतः अधिष्ठान कूटस्थात्मा सर्वांहून पर, असंग, अविकार नित्य, सत्य, निरापेक्ष, अपरिच्छिन्न, सर्वत्रपूर्ण असून धर्माधर्म, कर्तृत्व भोक्तृत्व, सुखदुःखबंधमोक्षादिक, बुद्धि, वृत्ति, आभासाकडेच आहे.

**प्र०**—देह, प्राण, मन, बुध्दी, जीव, ईशादिक दृश्यमात्र सर्व विश्व मिथ्या तर मग त्यांचे निवृत्तींत पण कांहीं प्रयोजन नसतां गुरु शास्त्र हीं मिथ्या ठरतात, मग त्यायोगें संसारनिवृत्ती होणें पण असंभव!

**स०**—रज्जूवर सर्प भासतो तो वास्तव नसतो, तरी भीति उत्पन्न करतो. तद्वत ईश्वराचे मायिकजगत मिथ्या; तरी त्यापासून कांतीकार्य उत्पन्न होतें. जसा ऐंद्रजालिक आपल्या मायेनें हवेतसे खेळकरून प्रत्य- क्षाकारें इतरांस मोहित करतो; आपण मोह पावत नाहीं. कारण त्यास स्वमायेचें स्मरण असतें, तसा ईश्वर असून सत्यसंकल्पामुळें उत्पत्ति- स्थितिलय करणें त्याचे स्वाधीन आहे. म्हणजे मायासंकल्पें जगदुत्पत्ति

१ गारुडी.

होऊन प्रत्यक्ष दिसणें संकल्पास्थिर तावत् स्थिती; संकल्पक्षयें लय; आणि सर्वविश्वाकार माझाच संकल्पमिथ्या असून सर्व मीच आहे अशा दृढ-ज्ञानानें त्यांत रागद्वेषें कर्म करीत नसून पुण्यपाप सुखदुःख पण त्यास नाहीं अशीच जीवसृष्टी पण असून स्वस्वरूपअज्ञानत्वें मलिनसंकल्पा-मुळें उत्पत्ति, स्थिती, लय करणें जीवाचे स्वाधीन नाहीं. जशी—

**हृदि स्थितमिदं विश्वं नित्यं बहिरवेक्षते**
**अविद्यामोहितो जंतुर्यथा स्वप्नमनोरथान् ॥**

स्वप्नसृष्टी हृदयांत असून निद्रादोषानें बाहेर भासते; तशीच जागृत सृष्टी स्वसंकल्पांत असून अज्ञान भ्रांतीदोषानें बाहेर भासते, जशी स्वप्नसृष्टी जागृतींत नष्ट होते, तशी जागृतसृष्टीपण विकल्पक्षयें भासत नाहीं, ह्मणजे—

**स्वप्नेऽर्थशून्ये सृजति स्वशक्त्या**
**भोक्त्रादि विश्वं मन एव सर्वं**
**तथैव जाग्रत्यपि नो विशेष-**
**स्तत्सर्वमेतन्मनसो विजृंभणं ॥**

स्वप्नांत एकच पुरूष, अन्य कांहीं साधनापेक्षा नसतां, स्वमनःसंकल्पें नगर, पर्वत, गो, गज, व्याघ्र, मनुष्यादिक नानाकार रचना करून बोलणें, चालणें, सर्व व्यवहार करतो तेथें त्याचे कल्पनेविना कोणचीच वस्तु नसते. तो जागृतींत न आला तरी तेथें सत्यत्वें कांहीं झालें नसून सर्व पदार्थ व पहाणारा आपणच असतो. तरी हें सर्व माझेंच कल्पित खोटें, असें न जाणतां आपणाहून भिन्न व सत्य जाणतो, म्हणून तद्योगें सुखी, दुःखी होतो. एवं मनोमात्र विश्व. मनोमयच सर्व पुरूष होत. तशीच जागृत्सृष्टी पण मनोमय स्वसंकल्पानें स्वप्नवत आहे जर सत्य असती तर सुषुप्तींत राहिली पाहिजे होती, यावरून

**आत्माज्ञानाज्जगद्भाति ह्यात्मज्ञानान्निवर्तते
रज्वज्ञानादहिर्भाति तज्ज्ञानाच्च निवर्तते ॥**

रज्जू न जाणण्यानें तोच सर्प. तद्वत आत्मस्वरूप अज्ञानानें बहिर्मुख संकल्पें जगत् भासत आहे. तें स्वसंकल्पित मिथ्या. तथापि स्वस्वरूपज्ञान-जागृती नसेपर्यंत, आपणाहून भिन्न व सत्य जाणून रागद्वेषें कर्म करतो, यामुळें तज्जन्यसुखदुःखभोग पण घडतात. यास्तव ही अज्ञानभ्रांती दूर करण्यास गुरु शास्त्रें झालीं आहेत. जसा दोरास सर्प जाणून कोणी भयभीत होतो त्यास कोणी सांगतो कीं सर्प नाहीं दोर आहे तें ऐकून विचारानें रज्जुज्ञान होऊन निर्भय होतो. यांत दोर असतां सर्पभ्रांती झाली ती मिथ्या व त्यास रज्जूचा उपदेश करणें पण मिथ्या. कारण रज्जु तर पूर्वीच सिद्ध आहे तत्रापि भयभीताची भिती भ्रांती उपदेशानें जाते. तद्वत सर्व एक ब्रह्मात्माच असून त्यावर मायिकनामरूपें जगतभ्रांती झाली ती वृथा; व जगत नाहीं, ब्रह्मआहे; असा उपदेश पण वृथा. तथापि साधकाची भ्रांती जाते. कारण गुरुशास्त्र खोटें, तसा संसार पण खोटाच म्हणून गुरु-शास्त्रमार्गें संसारनिवृत्ति होते. तस्मात—

**आसुसेरामृतेः कालं नयेद्वेदान्तचिंतया ।
न दद्यादवसरं किंचित्कामादीनां मनागपि ॥**

आसुप्ती आमरणपर्यंत कामादिकांस किंचित अवकाश न देतां दीर्घ-आदरपूर्वक निरंतर गुरुशास्त्रमार्गें श्रवणमननाभ्यास केला पाहिजे; तरच ही अज्ञानभ्रांती दूर होते. म्हणून शास्त्र गुरु यांचें अवश्यकत्व आहे व्यर्थत्व नाहीं.

---

१ प्रीति.

**प्र०**-ब्रह्मात्मा सत्य जगत्जीवादिकसर्वमिथ्या हें जाणण्यांत विशेष उपयोग काय ? आणि एकदां सत्य मिथ्या कळल्यावर त्याचें वारंवार प्रत्यावर्तन करण्यांत काय अधिकत्व आहे ?

**स०**-अखिलसृष्टी मायामय, मिथ्या, तुच्छ पंचभूतात्मक असून-

**सर्वत्र पंच भूतानि षष्ठं किंचिन्नविद्यते ।**

चैतन्य पण सर्वत्र एकच आहे, तरी अविचारानें त्यांत उत्तम, मध्यम, कनिष्ट, प्रियाप्रिय[1], माझें तुझें, या गुणदोषानें भेद, अंतःकरणाभासाच्या कल्पनेनें असतो. एकच स्त्री अस्थिमांसचर्मादिकाविना न्यूनाधिकपणें नसून कामबुद्धीनें सौंदर्यवती व दोषदर्शनबुद्धिनें तुच्छ भासते. स्वर्गांगना बहुत सुंदर ह्मणतात पण श्वानापुढें उर्वशी केली तर तुच्छ होते, कल्पनेंतच आहे असें ठरतें, तेथें सत्यता किंवा उत्तमकनिष्टपणा नाहीं. जसा भारवाहक वेतनलाभ भार वाहण्यांत हर्ष खेद नसतो, त्या भारांत ज्याचें ममत्व असतें तो त्यासंबंधींच नफ्यातोट्याचे चिंतनें सुखी व दुःखी होतो; ह्मणजे आकाशापासून श्रोत्र, अग्नीचे चक्षु, जलाची जिव्हा; अशीं सर्वेंद्रियें झालीं, तीं शद्वादि आपापला विषय प्रीतिद्वेष सोडून, स्वाभावीक ग्रहण करतात, व आपापला विषय एकमेकांस देत घेत पण नाहींत, आणि अंतःकरणाभास अविवेकानें त्यांचे धर्म आपणावर घेऊन ममत्वानें इष्टानिष्ट मानून कर्ता भोक्ता होतो, ह्मणून सुख दुःखें होतात. जसा हेम रजत ताम्रादिकांचा असंगभाव असून मध्यंतरीं लाख आली, किंवा अनेकाकार मणी असंग असून मध्यें सूत्र आल्यानें, संयोग होऊन संबंधानें अन्योन्य सुखदुःखें पण येतात, तद्वत साभास अहंकार ( जीव ) सूत्रांत इंद्रियादि मणी एकत्र झाले आहेत, त्यायोगें सुखदुःखें भासतात. जर लाख व सूत्र पृथक केलें

१ प्रियाप्रीय.

तर असंगत्वें कोणाचें कोणास सुख दुःख नाहीं. तसें बुद्धि, आभास, इंद्रियविषय, पृथक केले तर असंग झाल्यानें सुखदुःखें भासत नाहींत. अरे जशी सुई वस्त्रांत प्रवेश करते तिजमागें दोरा पण येतो, तसा अहंकारानें देहांत प्रवेश केला ह्मणून त्यामागें सुखदुःखें आलीं आहेत. जसें एखाद्या गृहांत सर्प किंवा पिशाच्च प्रवेशझाल्यानें तें दुःखद होतें यांत गृहाचा दोष, दुर्गुण नाहीं; यास्तव सर्प पिशाच्च दूर करावें ह्मणजे झालें. तसा देहेंद्रियादिक सर्वसंत्र मूक, जडवत, असंग, निराभिमान असून, साभास अहंकार पिशाच्च ( जीव ) यानें त्यांत प्रवेश केला आणि जडाजड सर्व एकत्र करून, त्यांचे कर्म धर्म आपणावर घेतो व दुःखी होतो. विचारें पहातां तो स्वतः मिथ्या, अविचारसिद्ध आहे. अधिष्टानसत्तेवांचून किंवा देहेंद्रिय मनप्राणादिकांवाचून कोणतेंच करण्यास समर्थ नाहीं. जसें दहा मिळून कर्म केलें तें एकाचे शिरीं स्थापित करणें, तसेंच या जीवावर अविचारवशें संसार आहे. तस्मात अंतःकरण आभासद्वारें आपलें अधिष्टानभूत सामान्य-चैतन्य मूळस्वरूप यथार्थ जाणून विशेषचैतन्य साभासवृत्तीचे विकल्पादिक अभिमानधर्म निःशेष सोडून, सामान्यवृत्तीनें लाभालाभीं समत्वें सत्यस्वरूप-स्मरण निरंतर ठेवलें, तर सर्वानर्थशांतीनें महत्सुख ( जीवन्मुक्ती ) असा उपयोग आहे. परंतु—

**जन्मांतरशताभ्यास्तारामसंसारसंस्थितिः ।**
**सा चिराभ्यासयोगेन विना न क्षीयते क्वचित् ॥**

अज्ञानवशें कोट्यावधि जन्माचा देहाध्यास वृत्तीस आहे तो चिरा[1]भ्यासाविना क्षीण होत नाहीं. जसें सूर्योदयीं भय तम[2] नाश होतो तसें शीतें[3]

१ बहुतकाल. २ अंधकार. ३ थंडी.

तत्काल नष्ट होत नसतें अथवा निद्रेंतून जो दृढजागृत न झाला त्यास निद्रा पुन्हा पूर्ववत् आकलन करते तद्वत आत्मज्ञान होऊन अभ्यासाविना दृढांपरोक्ष न झाले त्याचे संशय विकल्प विक्षेप क्षीण न होतां अविद्यावासना त्यास पूर्वाध्यासें जगद्विषयांत पुन्हा ओढून नेतात यास्तव प्रत्यावर्तन दृढाभ्यास केलाच पाहिजे.

प्र०—सामान्यचैतन्य, विशेषचैतन्यलक्षण कसें, तें कृपापूर्वक सांगितलें पाहिजे.

स०—नामरूपात्मक वस्तुमात्रांत जी वस्तू आकाशवत् पूर्ण व्याप्त ती सामान्य होय, जसें एकाच रज्जूवर रज्जूच्या अज्ञानानें दंड, सर्प, भूरेषा. जलधारा अशी भ्रांती होते, यांत सामान्य, विशेष, असे दोन अंश असतात व दंड सर्पादि विशेषांशांत रज्जूगतसामान्यांश पूर्ण व्याप्तअसून तीच दंडसर्पादिकासरूप आहे ती भ्रांतीकाळीं पण असते ह्मणजे रज्जू अधिष्ठानसामान्यत्वें आहे ह्मणून त्यावर दंड सर्पादिक विशेषांशसामान्याचे आहेपणानें भासतात आणि भ्रांती गेल्यावर पण इयंरज्जू अशी स्पष्ट होते ती अव्यभिचारिणी ह्मणून रज्जू सत्य, व परस्परव्यभिचारिदंड सर्पादिक विशेषांशकल्पित मिथ्या; एवं दंडसर्पादिकांचे उत्पत्ति स्थितीलयास कारण रज्जूच होय. तशी अधिष्टान सामान्यात्म्याची सच्चिदानंद अस्तिभाति प्रियत्वें पूर्णव्याप्ती आहे तें स्वात्मस्वरूपअज्ञानत्वें

**अस्ति भाति प्रियं रूपं नाम चेत्यंशपंचकं**
**आद्यं त्रयं ब्रह्मरूपं मायारूपं ततो द्वयं ॥**

१ प्रत्यक्ष स्पष्ट. २ ज्याची भ्रांती बरोबरच प्रतीति व ज्यावांचून भ्रांती होत नाहीं अशा अंशास सामान्य म्हणतात. ३ ज्याची भ्रांतीकाळी प्रतिती नसून ज्याचे प्रतीतीत भ्रांती दूर होते अशा अंशास अधिष्ठान म्हणतात.

अस्ति, भाति, प्रिय, नाम, रूप असे सामान्यविशेष मिळून पांच अंश असतात व नामरूपविशेष अंश आत्म्याचे आस्तित्वादिपूर्णव्याप्त आहेत व तेच नामरूपजगतास रूप आहेत ते अज्ञानकालांत पण असतात म्हणजे मुख्यत्वें सामान्यात्मा सच्चिदानंदआस्तित्वादिकें पूर्ण आहे म्हणून त्यावर विशेषांश नामरूपजगदाकार अधिष्ठानाचे आहेपणानें रज्जू सर्पवत् भासतो आणि अज्ञानभ्रांती गेल्यावर पण आयंआत्मा असा स्पष्ट होतो तो ( आत्मा ) अव्यभिचारी म्हणून सत्य; कारण भ्रमास कांहीं तरी अधिष्टान असलें पाहिजे त्यावांचून भ्रांती होत नसते. जशी एक वस्तू असून तिच्या विस्मृतींत तिजवरच दुसरीचा आरोप, रज्जूसर्पवत होतो, यासच भ्रम म्हणतात. तद्वत नामरूपजगत उत्पत्तिस्थितीलयरूप भ्रमास मूळ अधिष्ठान ब्रम्हात्माच आहे. ही सामान्यचैतन्यलक्षणें होत व सामान्यचैतन्यलक्षणाहून रहित असून त्यास अदृश्य दिसणारें भासणारे जे पूर्वोक्त जीवरूपचिदाभास ते अंतःकरणसंयोगें जागृत्स्वप्नांत किंचित प्रकाश करून अनेक नामरूपप्रतीतीनें बुद्धिवृद्धिलयें तत्काल नष्ट होणारे असे क्षणिक, सापेक्षक, परप्रकाश्य, म्हणून मिथ्या. यांस विशेषचैतन्य ( जीव ) म्हणतात. जसा अग्नी सामान्य विशेष या दोन रूपें असून सामान्यरूप जलाहून सूक्ष्म असतें आणि काष्टादिउपाधिभेदें विशेषांश आत्मपरिछिन्न, उपाध्याकार, व उपाधिनाशें नष्ट होतो, म्हणून मिथ्या; तसेच चैतन्याचे ही सामान्य, विशेष, दोन अंश आहेत यांत निरूपाधिकसामान्य नित्य, सत्य, ऐक्य, पूर्णव्यापक मात्र; व मायोपाधिक विशेषांश जीव, उपाधिभेदें अल्पपरिछिन्न नाना व अनित्य आहे. तात्पर्य सूर्यप्रकाश सर्वत्र सम तरी विशेष व्यवहारोपयोगीं नसून जेथें कांच जल सूर्यकांतमणी असा उपाधिसंबंध होतो तेथें प्रतिबिंबल्यें विशेष झळझळतो अग्नी होऊन दहन करतो अथवा पावक अंगाररूप असला. तर व्यवहा

रोपयोगी नसून तोच इंधन संबंधेंप्रज्वल होऊन व्यवहारोपयोगीं होतो; तद्वत सामान्यचैतन्य कूटस्थात्मा सच्चिदानंद आस्तिमातिप्रियत्वें त्रिकालीं सर्वत्र समान असून निर्विकारत्वें विशेष व्यवहारोपयोगी होत नाहीं. व जेथें अंतःकरणसंबंधहोतो तेथें विशेषचैतन्यचिदाभासजीवरूप होऊन विशेष ज्ञानक्रियाव्यवहार करतो. त्यास जसा—

**अनापन्नविकारी सन्नयस्कांतवदेव यः**
**बुद्ध्यादींश्चालयेत्प्रत्यक्सोहमित्यवधारयेत् ॥**

चुंबक, अविकार पृथक राहून, अचेतन लोहास चलनसत्ता देतो, तसा कूटस्थ त्याहून पृथक आविकार राहून त्यास सत्तास्फूर्ती देतो; यांत विशेषचेतन ( जीव ) उद्भवलयात्मक म्हणून मिथ्या. व सामान्यचेतन ( कूटस्थात्माब्रम्ह ) त्रिकालाबाध्य म्हणून सत्य. आणि तोच मी असें निरंतर अनुसंधान ठेवावें.

प्र०—सच्चिदानंदअस्तिभातिप्रियआत्मस्वरूपाची अखंडता कोणत्या प्रकारें जाणावी ?

स०—आत्म्याचीं ताटस्थ व स्वरूप अशीं दोन लक्षणें आहेत; ज्यावर अखिलविश्वरचना असून ती कळत नाहीं हें तटस्थलक्षण होय; आणि सत, चित, आनंद, आस्ति, भाति, प्रिय, हीं स्वरूपलक्षणें होत. हीं लक्षणें आत्म्याचे गुण नसून स्वरूपभूतच होत; तीं आत्म्यास दर्शित करतात, वास्तव या गुणानें लक्षित आत्मा आहे असें जाणावें. एवं दोन्हीपर्यायें आत्माच होय याविना यत्किंचितवस्तू सृष्टींत सापडणारच नाहीं. जसें—

**माधुर्यद्रवशैत्यादिजलधर्मास्तरंगके ॥**

---

१ तिन्हीकाल बाधीत होत नाहीं.

मधुरत्व द्रवत्व शीतलत्व हे त्रिगुणयुक्तजल, कटु, सुगंध, शीतल त्रिगुणीचंदन, मृदु श्वेत मधूर त्रिगुणीशर्करा यांचा एकगुणस्पष्ट तेथें दोन अस्पष्ट मिळून तिन्हीं असतात. एकास सोडून एक पृथक् कधींच होत नाहीं व ते त्यांच्या एकबारिक अंशांत पण राहतात तसें सच्चिदानंदअस्तिभातिप्रियत्वें सर्वविश्व उपाधिभेदें स्पष्टास्पष्ट पूर्णव्याप्त आहे; यांत अस्ति ह्मणजे आहेपणाः जसें आकाश आहे, जल आहे, इत्यादि आहेपणें विशेषांशनामरूपत्याग करून पूर्वोक्त एकरज्जूवर दंड सर्पादिक उदाहरण सांगितल्याप्रमाणें सामान्यत्वें आत्माच होय; तसेंच जागृदवस्थेंत मी आहे, स्वप्नांत मी आहें सुषुप्तींत मी सुखांत निजलों होतों हें अस्तित्व आत्मसत्तेनें असतें; यांत मी हा विशेषअंश कल्पित असून आहें हा सामान्य अंश होय ह्मणजे लोह जाळतें असें व्यवहारांत म्हणतात पण परमार्थतः तो शब्द अग्नीस दर्शित करतो कारण जाळण्याची शक्ती लोहांत नाहीं. तद्वत मी हा शब्द आत्मदर्शक होय; तस्मात मी हा विशेषांश त्याग करून आहे या सामान्यशब्दें आत्म्याचेंच अस्तित्व समजावें. तसेंच सर्वपदार्थीं त्रिकालव्याप्त ज्याचा कधींच लोप नाहीं, मनादिकांच्या अभावें पण आहेच हें सद्रूप होय; म्हणजे सृष्टींत ज्याला नाम[1] रूपें[2] असतें त्याला पदार्थ म्हणतात; तो आकार नष्ट झाल्यानें तीं नामरूपें जातात; तथापि ज्यावर आकार भासतो तें मूळतत्व त्यांत सत्यत्वें रहातच असतें; जसें जल हें मीठ, गारा, बर्फ, आदिरूपें कठिण झालें किंवा उष्णत्वें वाफरूप झालें व त्या मानानें त्याचीं नामें मीठ गारादि पृथक झालीं आणि जलाचें रूप आदृश्य झालें तरी जलाचा अंश त्यांत आहेच आहे. याचप्रकारें नामरूपात्मक प्रत्येकवस्तू आपल्या ओळखीस्तव कल्पनेचीं संकेत् चिन्हें होत; तरी ते काय व त्यांत मुख्य तत्व कोणतें, कसें हें

---

१ अभिधान २ आकृति

समजणें अतिगुढच आहे; कारण नामरूपात्मक वस्तुमात्र गुणसमुच्चयच[1] आहे, गुणास सोडून पलिकडे जाण्यास मनेंद्रियें शक्त नाहींत. एवं समग्रसृष्टिप्रपंचाचा लडबडाट् त्रिगुणांतच आहे. जर ते पंचभूतगुण पृथक् केले तर या वस्तूस काय रूप आहे ? अर्थांत कांहीं नाहीं. परंतु ज्यावर पंचभूतें भासतात ती मूळवस्तू कांहीं तरी असलीच पाहिजे. ती अदृश्य असेल, तरी नाहीं म्हणणें योग्य नाहीं. जसें तृणबीज भूमींत गुप्त असतें तेंच जलयोगें बाहेर स्पष्ट होतें तद्वत सद्रूप अस्तित्वाची सर्वत्र-पूर्णव्याप्ती[2] असून अस्पष्ट आहे, त्यास मायाभूमी, वासनाजलयोगें विशेषाकार नामरूपें येतात ते आकार नष्ट झाले तरी मूलाधिष्ठान नष्ट होत नाहीं असे आत्म्याचें सद्रूप अस्तित्व होय. चिद्रूप भातित्वः यांत भाति म्हणजे दोर सामान्यत्वें मुख्य अधिष्ठान असतो. त्यावर मदांधकार दृष्टिमांद्य या उपाधिविशेषें सर्पभास होतो. तद्वत सामान्यात्मा सर्वाधिष्ठान आहे. तोच मायोपाधि अज्ञानयोगें विशेषत्वें नामरूपाकारें भासतो. हें भ्रांतिरूप होय. आणि चिद्रूप पण तोच. जसा कोणी पुरुष स्वस्थ शांत बसला असतां त्यापुढून कोणी मनुष्य गेला, तो कोण गेला हें त्याकाळीं विशेषचेतन नसल्यामुळें स्पष्ट समजत नाहीं; त्यानंतर दुसरा कोणी येऊन विचारतो कीं या मार्गें अमका गेला काय ? तेव्हां बसलेला पुरूष स्मरण करून सांगतो कीं, कोणी गेला खरा. हा अनुभव नसता तर सांगतांच आलें नसतें यावरून सामान्यानुभव झाला पण विशेषज्ञा-नसाधक अंतःकरणआभास, याचा त्या काळीं अभाव असल्यानें कोण गेला हें स्पष्ट ज्ञान झालें नाहीं. एवं ज्ञानरूप आत्माच आहे, असें स्पष्ट होतें. अरे जरी चक्षू रूप पाहतात तरी तें रूप सौम्य वा उग्र हें चक्षू जाणत नाहींत. श्रोत्र शब्द ग्रहणकरतात तथापि प्रियाप्रियशब्दा-

---

१ अनेक गुणाचे मिश्रण २ विकल्प रूप जीव

र्थाचें ज्ञान श्रोत्रांस नसतें. जिव्हा रस सेवन करते तरी कटु, क्षार, मधुरादिक रसस्वादज्ञान जिव्हेस नाहीं. अशीं सर्वेंद्रियें केवल जड आहेत. जर यास ज्ञान असतें तर बुद्धीआभासअभावें निद्रेंत सर्वेंद्रियें नष्टप्राय असून आपपाला विषय ग्रहण करीत, नाहींत हें सर्वांस माहित आहे; तसें जागृदवस्थेंत पण, प्रत्यक्ष कथेंत बसला असून अंतःकरणाभास दुस-ऱ्या विषयाकडे असेल तर कान कांहींच ऐकत नाहींत, नेत्रांपुढून जातांही नेत्र पहात नाहींत, कारण श्रोत्रचक्षुरादि इंद्रियें अंतःकरणा-भासाबरोबर गेलीं असतात; आणि वृत्तीआभासपण कोणीविषयाकडे जात असतां आत्मसत्ता परतली तर दुश्चितपणें विस्मृतीनें तत्काल तेथेंच आदळून पडते. तो विषय घेऊं शकत नाहीं हें सर्वत्रांस अनुभवीत आहे. तस्मात वृत्तिआभासइंद्रियें जड ठरत असून तदाभावीपण अभाव जाणत आहे तोच चिद्रूप ज्ञानरूप आत्मा. जसें रात्रौ पुस्तकवाचन-प्रसंगीं दीप उपनेत्र जरी सहायक असतात तरी पहाणारा मुख्यचक्षुच होय चक्षुविना दीप उपनेत्र व्यर्थ. तसें अंतःकरणआभासइंद्रियें हीं विशे-षज्ञानव्यवहाराचीं उपकरणें होत. व तद्द्वारें—

**येन शब्दं रसं रूपं गंधं जानासि राघव**
**तमात्मानं परं ब्रह्म जानीहि परमेश्वरं ॥**

शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, आत्माच प्रकाशतो, हें आत्म्याचें भातिचिद्रूप होय; आणि आनंदरूप प्रियरूप पण आत्माच आहे; इतर वृत्ती प्रतिबिंबइंद्रियविषय एतद्युक्त आनंदप्रियत्व तें क्षणिक, सापेक्षक, परप्रकाश, मिथ्या, प्रापंचांत मनुष्यमात्रास सर्वांहून अधिक प्रिय वित्त असतें; पण पुत्र बंदींत पडला तर तें वित्त खर्ची घालतात; तेव्हां अर्थात पुत्र प्रिय, वित्त अप्रिय झालें; दुर्भिक्षा-

दिक प्रसंगीं पुत्र विक्रय करून स्वशरीररक्षण करतात येथें शरीर प्रिय पुत्रादि अप्रिय झालें. कांहीं अपराधें शरीरास मार देतात. तेव्हां ह्मणतो माझे नाक डोळे संभाळा; या ठिकाणीं शरीराहून इंद्रियें जास्त प्रिय. शरीर अप्रिय ठरतें, एखादे कारणीं, कोणास प्राणांत शिक्षेची राजाज्ञा झाली; तर तो ह्मणतो माझे नाक, कान, जिव्हां, नेत्र, छेदन करा पण प्राण वांचवा. येथें इंद्रियांपेक्षां प्राण विशेष प्रिय होतात. कोणी आधि-व्याधीनें अतिदुःखीत असतां ह्मणतो कीं आतां माझे प्राण जातील तर मी सुखी होईन, अथवा दुष्कीर्तिस्तव कित्येक प्राण ही देतात; आणि सुकीर्ति दुष्कीर्तिं सुख दुःख हे धर्म मनाचे आहेत. निद्रेंत मन नाहीं तर कांहीं भासत नाहीं. येथें प्राणाहून मन अधिक प्रिय; तर प्राणाची प्रियता उपरोधिक ठरते. निद्रा, समाधि, ध्यान, धारणाप्रसंगीं मनचंचलत्वें संकल्प विकल्प विक्षेप करतां त्रासून ह्मणतो हें मला दुःख देत आहे; यांत सर्वांपेक्षा अधिक प्रियता कोणाची? व सर्वावधिचे शेवटी कोण उरतो? हें विचारांतीं कळेल. तस्मात अकृत्रिम, अहेतु, अव्यभिचारी, निरापेक्ष, निरंतर, प्रियता ती आपणाकरतांच असते. इतर स्त्री पुत्रादिक सर्व प्रीतिगौण आहेत; आणि आनंदरूपता पण तेथेंच आहे. जर आनंद विषयवस्तूंत असता तर एकच वस्तु असून एकास प्राप्तीनें सुख, एकास अप्राप्तीनें दुःख एक उदासी त्यांस उपेक्ष्य होते; किंवा एकच विषय एकासच एकवेळ सुखद प्रिय एकवेळ दुःखद अप्रिय, असे प्रियाप्रियव्यभिचारदोष जेथें येतात ते खोटे उपरोधीक जाणावें. एवं आनंद हा विषय पदार्थांत नसून मूर्खास भ्रांतीनें पदार्थांत भासतो. जसें श्वान हाडूक चावतें त्यामुळें त्याचेच मुखांतून रक्त निघतें तें त्यास हाडकांतील वाटतें; अथवा शीतकाळांत शय्यादिक वस्त्रें प्रथम थंड लागत असून तीच कांहीं वेळानें उष्ण लागतात, त्यांत जी

उष्णता येते ती आपलेच आंगची असते; अन्याची नाहीं. तसें आपल्याच आत्मानंदापासून विषयांत आनंद भासतात. जसा—

**पिष्टादिगुडसंयोगाद्गुडवत्प्रीतिमान्यथा**
**आत्मयोगात्प्रमेयादिरात्मवत्प्रीतिमान्भवेत् ॥**

एकच गूळ अनेक पदार्थांत घातला तर, तत्संयोगें सर्व पदार्थ मधुर होतात, तथापि गोडी एकाच गुळाची. तसें आत्मानंदापासूनच सर्व विषयानंद उद्भव होतात. एवं सच्चिदानंदादिक सर्व विश्व ब्रह्मात्माच आहे.

**प्र०**—ब्रम्हात्माच प्रिय, आनंदरूप आहे, तर बहिर्विषयाविना सुख आनंदानुभव कां होत नाहीं? आणि विषय अप्राप्तिमुळें, मी दुःखी असा सर्वांस अनुभव होतो, याचें कारण काय?

**स०**—अरे जें सुख आंत तेंच बाहेर भासत असतें—

**प्रत्यक्सुखेनैव पराक्प्रतीयते ॥**

जेव्हां वृत्तीस तीव्र विषयेच्छा होऊन फलप्राप्तीनें कामेच्छेचा अभाव होतो, तेव्हां तत्क्षणीं वृत्तीनिर्वासना शांत होऊन आत्मानंदीं मिश्र होते, त्यामुळें आनंद होत असतो तो मूढास विषयवस्तूंत वाटतो परंतु निर्विषयवृत्तींतच सुखानंद आहे असें निभ्रान्त झालें, कारण ज्या ब्रम्हानंदसुखार्थ अनेकपुरूष सुरेंद्रतुल्यविषयभोग त्यागून गेले, व ज्या आनंदाब्धीच्या सेवनानें—

**ब्रह्मानंदरसं पीत्वा ये तु उन्मत्तयोगिनः**
**इंद्रोपि रंकवद्भाति का कथा नृपकीटकाः ॥**

अजर, अमर, नित्यतृप्त, त्रिलोक्यवंद्य असे अनेक योगिराज प्रसिद्ध श्रवणीं येतात; यावरून अधिष्ठानभूतमूळ जो अंतरात्मानंद,तोच वृत्तीइंद्रियविषययोगें बाह्य विशेषत्वें भासतो; तस्मात् आत्मानंदाहून अन्य कोणतेच सुखानंद श्रेष्ठ नाहींत. तेथें वृत्ती किंवा विषयाचा संबंध नसतो. पहा निद्रेंत कोणताविषय असतो ? पण निद्रेंत जडता, अज्ञान असतें, तें नसून म्हणजे द्वैत विकल्प विक्षेप व वृत्तीलय नाहींत,अशी जी स्वरूपानुसंधानजागृद्दशा, तोच निजानंद होय. एवं आत्मानंद अवर्णनीय असून, त्याचे अंतर्भूत विषयानंद आहेत, हें सिद्ध. आतां विषयअप्राप्तीनें दुःख होतें याचें कारण वृत्ति निर्वासना होऊन आत्मानंदीं मिळते तेंव्हां आनंदोद्भव विशेषत्वें होतो. जेथें कोणताच संकल्प विकल्प नाहीं तेथें वृत्ति निर्विषय शांत करण्याचें साधन अविवेक्यास नसतें. यामुळें इच्छितविषय ग्रहणें एकदा वृत्ति तदाकार क्षणेक शांत सुखी होऊन तत्काल आपलें सुखरूप अधिष्टान सोडून अन्य विषयाकडे जाते म्हणून सुख जाऊन दुःख होतें; एतावता आनंद रूप स्वात्माच; हें सिद्ध.

प्र०—महाराज आपल्या सांगण्यावरून हीं ब्रह्मानंद विषयानंद एकच ठरतात मग विश्वजनित विषयानंद त्याग करून, ब्रह्मानंदअनुभवार्थ यत्न करण्यांत काय विशेषत्व आहे ?

स०—विषयानंदसुखें विश्वजनित भासमात्र क्षणिक साधनावर अवलंबून असतात, तीं मिथ्या होत. साक्षात्ब्रह्मानंदसुखरूप नाहींत. जसें दर्पणांत कोणी पदार्थाचें प्रतिबिंब भासतें तें मिथ्या तरी दर्पणोपाधिमुळें दिसतें तें सत्य समजून त्यावर प्रीति द्वेष करणारा मूर्ख होय. अरे वन्ही प्रकाशरूप आहे तरी इंधनाविना विशेष प्रकाशित नाहीं, तोच उपाधियोगें ज्यास्त प्रकाश्य होतो तसा अधिष्टानसामान्यात्मा सुखमात्रच असून विशेषानंद प्रकाशी-

त नाहीं, तोच वृत्ती, आभास, इंद्रियें, विषय, यासंयोगें विशेषानंद प्रकाशतो. परंतु तो आनंद उपाधिमुळें विशेष भासतो ते आनंदी मिथ्या होत; त्यांस सत्य जाणून स्वात्मानंद प्राप्तीयत्न जो न करील तो अतिमूढच ह्मटला पाहिजे; कारण देहात्मबुद्धिनें विषयग्रहणांत संकल्प, आरंभ, रक्षण, चिंता, परिणाम, विनाश, भय, साधन अशीं दुःखें असून ही, सुखें उत्पन्न व नाश होतात, ह्मणून मिथ्या. असें जें त्रिपुटी संबंधें क्रियेनें उत्पन्न होणारें सुख तें दुःखच प्रसवतात व उत्पन्न तें नाश, हें निर्विवादच आहे. आणि विषयलाभापासून जें सुख तेथें अधिक लाभेच्छावासनेचा अंकुर असतो. व वासनाच सर्व दुःखाचें बीज आहे अशीं जीं सुखें साधनानें प्राप्त तीं साधन अभावें नष्ट ही होतात. यास्तव तीं सातिशय खोटीं आणि जीवन्मुक्ताची जी निरतिशयानंदतृप्ती तिचा कालत्रयीं नाश नाहीं जो अमृतपानें तृप्त त्यास कांजीची इच्छा होईल काय? जो प्रखरसूर्यतापें तप्त, शीतळ, छायेस प्राप्त झाला, तो त्या उष्णाची इच्छा पुन्हा करील काय? सूर्यप्रकाश झाल्यावर दीपास कोण पुसतो? तद्वत निर्वासना, निर्वृत्तीसहजानंदसुख ज्यास प्राप्त झालें ते क्षणिक, क्षुल्लक, दुःखमय, मिथ्या, साधनावर अवलंबून असणारीं अशीं जीं विषयसुखें त्यांकडे किमर्थ जातील? कारण विषयसुखें इंद्रादीकीटकान्त स्वर्ग, नरकीं, सर्वांस समान असून प्राक्तनानुसार अनीच्छित, आगमापायी, आपातरमणीय, तुच्छ, आहेत. जसा दीप प्रथम प्रकाश दाखवून शेवट काळिमा देऊन जातो. तसेंच सर्व विषय पूर्वीं सुखद; पश्चात दुःखद होतात यास्तव ज्ञाते बुद्धिपूर्वक विषयांत रमेमाण होत नाहींत. जशी गुळाची चव कळण्यास्तव प्रथम त्यांतील

---

१ अंतर्मुखबुद्धी २ प्रतिबिंब ३ चक्षुरादि ४ शब्दस्पर्शादि ५ देहच मी आत्मा ६ इंद्रिय विषय देवतादिक ७ येतात जातात ८ दिसण्यासच बरे ९ इच्छापूर्वक प्राप्य नाहीं.

किंचित गुळ देतात, तो चाखून पाहिल्यानें गुळाच्या सगळ्या राशीची गोडी कळते; तशी ब्रह्मानंद सिंधूंतील लवमात्रसुखें प्रथमतः रुची कळण्यास्तव, विषयद्वारें दाखविलीं आहेत, त्यांवरून अगाध ब्रह्मानंद सुखाचें अनुमान करून तत्प्राप्त्यर्थ प्रबलपुरुषार्थ करणें उचित. तें बाजूवर राहून विषयसेवनेच्छेनें दुर्लभ मानवशरीर खर्ची घालणें हें अति निंद्य. जसें—

**स वै भागीरथीं त्यक्त्वा कांक्षते मृगतृष्णिकां ॥**

गंगोदक सोडून मृगजल इच्छिणें कसें होईल ? अरे अर्घ्यें भरभरून ओतल्यानें कूप, तटाक भरत नाहींत. जेव्हां मोठी वृष्टी होते तेव्हां सहज पूर्ण भरतात. जसा त्या त्या अत्यल्प प्रत्येक झऱ्यांतून थोडें थोडें उदक आणून स्नानपानादिक क्रिया करणाऱ्यास जर मोठा उदकडोह प्राप्त झाला तर त्यास क्षुद्रझऱ्याची गरज रहात नाहीं, तद्वत अल्प क्षुद्र विषयप्राप्तींत तृष्णा शमन होत नाहीं; आत्मलाभ संतोषानेंच पूर्णतृप्त शांत होते. यास्तव जसा हत्ती काष्टपाषाणादिक भार वाहण्यास अयोग्य; रजत, हेमपात्रें शेण माती भरण्यास अयोग्य, अमृत पादप्रक्षालनार्थ घेणें अयोग्य, चिंतामणी पांखरें उडविण्याकामीं घेणें अयोग्य, तसा तुच्छ विषयार्थ दुर्लभ मनुष्यदेह दवडणें अयोग्य आहे. तस्मात विवेकविचारबलें त्रिगुण[1]वृत्तीजयानें त्रिपुटी[2] खंडन करून देहाध्यासत्यागें स्वात्मानंदसुख जो निःसंदेह प्राप्त करून घेईल तोच कृतकृत्य, धन्य, त्रैलोक्य पूज्य वंद्य होतो। यास्तव विवेक्यास तत्प्राप्त्यर्थ यत्नकरणें योग्य आहे.

**प्र०**—त्रिगुणाचें रूप कसेंकाय व तें जाणल्यानें विशेष उपयोग कोणता होत आहे ?

---

१ सत्वादिक २ ज्ञानाज्ञानज्ञेय

स०—जसें बीजास भूमी व संयोग होऊन प्रथमारंभीं एकच अंकूर बाहेर पडतो आणि तदनंतर त्याचे अंगभूत दुसरे अंकूर गुप्त असतात ते क्रमानें बाहेर पडतात, तद्वत मायाभूमींत ब्रह्मात्म्याची व्याप्ती बीजरूपें त्यास इच्छारूपजलसंबंधें प्रथम समानत्रिगुणी अहमस्मि हा एकच अहंकाररूप कोम उत्पन्न झाला, व त्यापासून सत्व, रज, तम, हे तीन गुण स्पष्ट झाले; या त्रिगुणापासूनच पंचभूतादि अखिलसृष्टी झाली; या गुणाचे

**शांतंजाग्रन्मयं चित्तं घोरं स्वप्ने व्यवस्थितं**
**मूढं सुषुप्तिभावस्थं त्रिभिर्हीनं मृतं भवेत् ॥**

शांत, घोर, मूढ, असे तीन विकार वृत्तींत असतात; यांत शात सत्ववृत्ती, घोर रजोवृत्ती मूढ तमोवृत्ती, सत्व गुणशांतवृत्तीनें सुख, रजोगुणघोरवृत्तीनें दुःख, तमोगुणमूढवृत्तिनें मोह, आणि त्रिगुणविकारहीन तोच गुणातीत ( मुक्त ) हे त्रिगुण प्राणिमात्रीं असून ज्या ज्या गुणाचा वृत्तीद्वारा अधिक उणेपणा असतो तसा त्या त्या प्राण्याचा धर्म कर्म व्यवहार असतो यांत क्षमा[१] दया[२] तप[३] शौचें[४] आस्तिक्य[५] ब्रह्मचर्य[६] लज्जा[७], असंचय[८], मौन[९], अपरिग्रह[१०], शम[११], दम[१२] श्रद्धा[१३], शौर्य[१४], सत्य[१५], धृति[१६], तितिक्षा[१७], आर्जव[१८], सत्संग[१९], अभय[२०], आदिकसत्वगुणशांतवृत्तिचीं लक्षणें असतात, आणि काम[२१],, क्रोध[२२], लोभ[२३], शोक[२४], मोह[२५], भय[२६], मद[२७],

---

१ अपकाऱ्यावर उपकार पृथ्वीवत्, २ परदुःख घालविण्यास झटणें, ३ सत्यानुसंधान, ४ अंतर्बाह्य पवित्रता, ५ ईश्वरभाव, ६ स्त्रीवर्जन, ७ निंद्यकर्मवर्ज, ८ भावीइच्छार्थत्याग, ९ असत्वर्ज, १० याचना, ११ अंतरेंद्रिय निग्रह, १२ बाह्येंद्रिय निग्रह, १३ विश्वास, १४ कामादि रिपु जिंकणें, १५ नित्यते, १६ धैर्य, १७ सुखदुःख सहन, १८ सरळपणा, १९ सत्यजाणते साधु, २० सर्वत्र ईश्वर दृष्टि, २१ इच्छा २२ इच्छाप्रतिबंधे अविवेक, २३ आशा, २४ अविचार, २५ कांहीं न सुचणें, २६ मिथ्या ज्ञान, २७ चांगुलपणा दाखवणे,

मत्सर[28], दंभ[29], गर्व[30], छल[31], कृतघ्नता[32], दुराग्रह[33], कर्मफलेछा[34], सांक्षेप[35], बहुआर्जव[36], तृष्णा[37], अस्थिरता[38], विकलता[39], अविश्वास[40], अशुचित्व[41], अनृत[42], अकर्मरति[43], नास्तिक्य[44], कार्पण्य[45], निंदा[46], असूया[47], मर्मप्रकाशन[48], इत्यादि रजोगुणघोरवृत्तिचे अनंत विकार आहेत व प्रमाद[49], आळस[50], निद्रा[51], तंद्रा[52], दीर्घसूत्रता[53]दिक तमोगुणमूढवृत्तीचे विकार होत. या त्रिगुणाचे जोंपर्यंत अंतःकरणीं आरोहण आहे, तोंपर्यंत वृत्तिजन्य सुखदुःखें असून नित्यसुखप्राप्ती नाहीं पैकीं तमोगुणी तो केवळ पाषाणवत् प्रापंच्य परमार्थ दोहीं उपयोगीं नसून व्यर्थ आयुष्यघातक असा निरर्थजन्म होतो तथापि तीव्रसंतापानें एकदां त्याग होऊ शकेल पण रजोगुण सुटणें अति दुर्घट आहे. जशी शाहणी शिंदळ स्त्री भ्रतारापुढें उपरोधिक प्रीतीनें लुडबुड करून त्यास ठकवून परनरीं जाते; अथवा कुचर तट्टास कितिही मार देतां पुढें पाऊल न टाकतां मागें सरत असतें; तशी रजोगुणघोरवृत्ती अनियमधर्मिणी, महाअनर्थकारिणी अति दुःखद असून याच गुणवृत्तीनें समग्र संसार उभारला आहे व शांतवृत्तीसत्वगुणाची ती क्षणिक सुखद असते; तत्रापि सत्ववृद्धी झाल्यानें रजतमानिर्दलन करून परमार्थ सुकाळीं घालीत आहे याचकारणें मुमुक्षूस प्रथम शमदमविवेकवैराग्यादिक संपादन करण्यास सांगितलें आहे. तस्मात या त्रिगुणाचें यथार्थ रूप जाणून रजतमवृत्ती अशेष त्याग करून सत्वगुणवृत्ती प्रथम वाढवून नंतर तिचाही त्याग केला पाहिजे असा महान उपयोग आहे.

---

२८ परोत्कृष्टता असहन, २९ बरबरपणा, ३० धन, विद्या, नसून अभिमान, ३१ मार्मीकदुःशब्द ३२ उपकार विसरणे, ३३ वाईट गोष्टीचा छंद न सोडणें, ३४ सकामकर्म, ३५ संग्रह, ३६ उपरोधिकपणा, ३७ दुराशा, ३८ अविश्वास, ३९ चंचलत्व, ४० निश्चय नसणे, ४१ अपवित्रता, ४२ खोटें, ४३ अयोग्य तें करणें, ४४ अनीश्वरभाव, ४५ परास बुडविणे, ४६ असदारोपण, ४७ द्वेष, ४८ गुप्त, ४९ विस्मृति, ५० असावधपणा, ५१ झोंप, ५२ जागृती; निद्रा नसून स्वब्धता, ५३ घटकेचें काम महिन्यानें करणें, ५४ वास, ५५ नियम नाहीं.

**प्र०**—रजतम निःशेष नाश न होतां सत्वाचे अंतर्भूत रहातात, व एक गुण कोणतातरी विशेषत्वें शरीर असेपर्यंत रहाणारच; यावरून त्रिगुणविशेष नष्ट होणें असंभव; आणि त्रिगुण आहे तावत नित्यसुख नाहीं. असें आपण सांगितले तर त्रिगुणजयें निजसुखप्राप्ती कशी होते ?

**स०**—आत्मानंद सतत् प्राप्त असून, अप्राप्य, ही, अविद्यायोगें, भ्रांती आहे—

**आत्मा तु सततं प्राप्तोऽप्यप्राप्तवदविद्यया ।**
**तन्नाशे प्राप्तवद्भाति स्वकंठाभरणंयथा ॥**

ती अविद्यानाशें, जसें स्वकंठाभूषण स्वकंठींच असून विस्मृतींत अप्राप्य, स्मृतींत प्राप्य, तद्वत प्राप्ती होते. जसा दोन काष्टें घर्षणापासून तिसरा अग्नी प्रकट होऊन दोन्ही काष्टें भक्षण करून आपणही नष्ट होतो किंवा रोगाचा नाश करून औषधी पण नष्ट होते तद्वत—

**तमोद्वाभ्यां रजः सत्त्वात्सत्वं शुद्धेन नश्यति ।**
**तस्मात्सत्वमवष्टभ्य स्वाध्यासापनयं कुरु ॥**

रज, तम, क्षय, करून सत्व वाढतें तेंही शुद्धसत्वें ज्ञानोदयीं विचारानें आपणच लयास जातें व त्रिगुणाहून वेगळी चतुर्थ सहजावृत्ती उदय होत असते. ज्यांत सुखदुःख नसतां मोह नसून दोहोंची मध्यसंधि, जेथें त्रिगुणाचे किंचित उद्गार नसतां सहजपणें स्तब्धता व इंद्रियें विषय यांचा कांहीं आठव, जडता, आळस, नसून सावधानपणें अवरोध न करतां पण कोणतीच कल्पना नाहीं अशी सर्वसंघाची जी विलयदशा या सहजावृत्तींत साधकास निजानंद स्पष्ट होतो. ही निर्विकल्पवृत्ती निरंतर रहाणें अशक्य तत्रापि क्षणमात्रांत ही, विचारानें स्वानुभव होतो व जसजशी अभ्यासानें

वृद्धी तसतसें आत्मानंद प्रकाशाचें अधिक स्पष्टत्व हा केवळ अंतरानंद ( ब्रह्मानंद ) नसून बाह्य ( विषयानंद ही नसतां दोहींचा मध्य ( वृत्ती, विषय रहितसुख ) यास ब्रह्मानंदसंबंधीं वासनानंद ह्मणतात. तेकाळीं वासना अंतर्मुख, निर्विषय, शांत, सुखाकार, मात्र असते या वासनानंदाचा परिपाकच ब्रह्मानंद होय; परंतु त्याचा अनुभव करण्यास अन्यवृत्ती तेथें नाहीं. मात्र तदाकार असते तेथें हेंच आत्मानंदसुख. असा उद्गार जर वृत्तीनें घेतला तर हाच विकल्पविकार झाला. त्याणें त्रिपुटी होऊन तत्काल त्या सुखाहून भिन्न पडते ही आठवणच माया, अविद्या, अज्ञान, प्रकृति, स्फूर्ति, तम, वासना, विकल्प, मन, बुद्धी, वृत्ती, इत्यादिनामें स्वात्मानंदाहून भिन्न पडून वृत्तिद्वारा विशेष सुखदुःखाचा अनुभव करीत असते; म्हणून विकल्पविकाराकार न होता जो स्थिरत्व भाव तो सामान्यवृत्तीयोगें[१] अनुभवून पुढें विशेष वृत्तीविकल्पउद्भवकाळीं अनुमानें समजावें कीं अमुकवेळ वृत्त्याद्यभावें निर्विकारत्व होतें तेंच सामान्यसुख जर वृत्तीविलयकालीं अनुभव नसता तर वृत्तिउथ्थानीं स्मरण होऊं नये. जर स्मरण होत आहे तर पूर्वानुभव असलाच पाहिजे. हेंच सामान्य चेतन होय. परंतु एक जागा रिकामी झाली नाहीं तेथें दुसरें रहाणें असंभव. तद्वत अज्ञान गेलें नाहीं तेथें ज्ञान नसतां मंदप्रज्ञसाधकास दृढाभ्यासाविना ही निर्विकल्पवृत्ती साध्य नसून संशयामुळें स्वानुभव होत नाहीं. यास्तव विवेकवैराग्यबळें तत्पैदत्वंपैदादि[२][३] विवेचन यथार्थ करून त्रिगुणवृत्तिजयें अन्वयव्यतिरेकें सत्यासत्य निवडून दृढाभ्यासें जो साधक निश्शेष अज्ञान नष्ट करून ही सामान्यवृत्ती साध्य करील त्यास निजानंद प्राप्ती होते; आणि सर्वभ्रांति जाऊन पुढें देहोपाधि असेपर्यंत सात्विकादिकवृत्त्या उद्भवलयीं दिसल्या तरी त्या मजहून भिन्न; म्हणजे

१ त्रिगुणरहित औदासिन्यवस्था २ ईश्वर ३ जीव.

**सुप्तो यथानिर्विकारस्तथावस्थाद्वयेपि च**
**द्वयोर्मात्रादियोगेन न विकारी भवाम्यहं ॥**

सुप्तीसमाधींत मी अद्वैत अविकार असतों तर, जागृत्स्वप्नांत अंतः-करणोपाधिनें विकार दिसला तरी मी त्यांचा साक्षी असंगच आहे असें मिथ्या जाणल्यानें बाधक नाहीं, याप्रकारें निजसुखप्राप्ती आहे.

**प्र०**—महाराज ब्रम्हात्मा सर्वत्रीं पूर्ण एक अभेद सांगितला आणि देहेंद्रिय प्राणमनादिकाहून पृथक असंग निर्विकार पण सांगता. यांत त्याग स्वीकार कोणता कसा करावा ?

**स०**—अरे त्याग म्हणजे केवळ खणून टाकणें असें नाहीं. मिथ्या जाणून आसक्ती[1] सोडावी. रज्जूवर सर्प, शुक्तीवर रजत, भासतात त्याचें कोणतें अंग ग्रहण व त्याग करावें आणि त्या ग्रहणत्यागांत काय फल आहे? तसेंच सर्व जग मायिक आहे आणि ईश्वरकृतीचा नाश होणेंही अशक्यच तसें तें अबाधक आहे. मात्र जीवकल्पनेनें कर्मभोग प्राप्तीचा त्याग,अप्राप्तीची इच्छा हेंच आत्मज्ञान. एवं सर्वजगद्विषय माया-मय असून यावत् भोगप्राप्तींत हर्ष खेद होतात. तावत् ते बाधक आहेत तस्मात गुरुशास्त्रमार्गें सर्वमिथ्यत्व दृढाभ्यासें यथार्थ समजून जीवत्वोचें[2] निश्शेष हनन हीच सहजावस्था[3] समाधि होय. म्हणजे

**उपेक्ष्य नामरूपे द्वे सच्चिदानंदतत्परः**
**समाधिः सर्वदा चेत्स्याध्दृदये वाथ वा बहिः ॥**

देहेंद्रियें प्रारब्धानुसार पूर्वप्रवाहें वर्तत असून नामरूप विषयाची सत्यत्वभ्रांती किंचित नसून विकल्पक्षयें बाहिरंतर सर्वसच्चिदानंददृष्टी.

१ स्नेह २ संकल्प विकल्पाचे ३ यत्नाविना विवेक विचारानें.

तात्पर्य अग्नींत किंचित् काष्टांश असेपर्यंत ज्वाला निघतात. अंश संपल्यानें अंगाररूप होतो; तद्वत वासना हीच मूळमाया; जगदबीज असून विषयाची सत्यता हेंच तिचें मूळ आहे. ती स्वरूपाकारें अभिन्न तावत् दृश्य जगदभाव व स्वरूपाहून भिन्न झाल्यास नामरूपदृश्य कल्पितें एवं किंचितूही भिन्नत्वें भेद, आणि भेदसत्यत्वें वासना, वासनेनें कर्म, कर्मयोगें बंध, यावरून वासनाच बंधन. वासनाक्षय हाच मोक्ष.

**रामवासनया बंधोमुक्त्यै निर्वासनं मनः**
**तस्मान्निर्वासनीभावमानयस्व विवेकतः ॥**

तस्मात सर्ववासनाक्षय; तेणें आत्मत्वीं एकाग्र अचल चित्त, तोच सविकल्प समाधि, तो दृढतर झाल्यावर हळुहळु निर्विकल्प पण साध्य होतो. परंतु प्रथम सत्यमिथ्याविभाग झाल्यावांचून खरेंखोटें निवडत नसून मिथ्याचा अध्यास न सुटतां सत्यमोक्ष साध्य नाहीं यास्तव आत्मानात्मभेद अज्ञजनसमजुतीकरितां बुद्धीमानानीं केला आहे. जसा—

**कुंभोयथामृण्मयः स्यात्तद्वद्देहो हिं चिन्मयः**
**आत्मानात्मविवेकोयं मुधैव क्रियते बुधैः ॥**

घट अंतर्बाह्य मृत्तीकामयच असून नामरूपें भेद झाला. तसें—

**चिदेव पंच भूतानि चिदेव भुवनत्रयं ॥**

देहादिक सर्व चिन्मात्रच आहे. सच्चिदानंद अस्तिभातिप्रियत्वाविना या जगांत काय आहे ? वस्तुतः जड चेतन विभागपण वास्तव नाहीं. जशी जागृद्देह विस्मृतीमुळें स्वप्नसृष्टी व दुसरा देह भासतो तो कोणत्या कारणानें झाला म्हणावा व त्यांत घट, कुलाल, मृत्तिकादिक एकदांच भासतात त्यांत जड काय व चेतन कोणतें आणि कार्यकारणही कोणतें

म्हणावें ? कुलाल मृत्तिका कारणानें घटकार्य मानणें असंभव. तशीच जागृतसृष्टिपण स्वस्वरूपविस्मरणानें अविद्योपाधियोगें भ्रांतीमात्र भासत आहे. असे स्वप्नसृष्टी जागृतसृष्टीचे विषय पदार्थ आपापले कालीं अर्थाकार सत्यच भासतात. तथापि स्वप्नवस्तूस जागृतींत मिथ्या मानतो व वर्तमानपदार्थ सत्य समजतो यांत पदार्थांत भेद झाला नसून ( संमित ) कल्पनेंतच भेद आहे. एक सत्य एक असत्य म्हणतो आणि कल्पना नसतां कांहींच नाहीं. एवं दोन्ही मिथ्याच. तस्मात ईश्वरचित्तसर्वदृश्यप्रपंचमायामयमिथ्या असें खचित जाणून जीवकृत ग्रहण त्यागेच्छा विकल्पनिश्शेष उरूं न देतां त्याचे मिथ्यत्वाचें निरंतर स्मरण ठेवून सत्यस्वरूपाचें सतत अनुसंधान राखावें.

**प्र०**—आत्मा बुद्धींद्रियें वृत्यादिकांचा विषय नाहीं तो गुरुशास्त्र वृत्तियोगें कसा जाणवेल ? कारण—

**सालंबस्याप्यनित्यत्वं निरालंबस्य शून्यता ॥**

वृत्ति बुद्धीयोगें जें जें जाणलें जाईल तें तें खोटें व जाणवत नाहीं. तेथें शून्यत्व अज्ञान रहातें; आणि विश्ववस्तुमात्र गुणमय असते. कोणतीही वस्तु नेत्रानें दिसण्याजोगी, नाकानें गंध घेऊन कळण्याजोगी, जिव्हेनें रस चाखून समजण्याजोगी इत्यादि सर्व गुणसंघांतच आहे. गुणरहितवस्तू सृष्टींत नाहीं त्या गुणामुळेंच इंद्रियद्वारें वृत्ति आभास जाणतात. गुणरहितवस्तू जाणण्यास वृत्तिआभासादिक समर्थ नाहींत, व आत्मा निर्गुण निराकार, निर्विकार आहे तर मग स्वात्मानुभव कसा होतो ?

**स०**—जसें अमक्याचें गृह अमुक ठिकाणीं आहे, हें सांगण्यापूर्वी या गृहाजवळील आजुबाजुची खूण सांगावी लागते त्यामुळें त्या गृहाची

ओळख पटते. तसें विश्वोत्पत्तीपूर्वी सृष्टीस कारणभूत जें सद्रूपब्रह्म तें मनें[1] वाचेस अगोचर आहे, ह्मणून त्याचा साक्षात् बोध होणें अशक्य, तत्रापि त्यास उपाधिभूत जीं पंचमहाभूतें आहेत त्यांचें यथार्थ विवेचन झाल्यानें उपाधीचा बाध होऊन अधीष्टानाचा बोध होतो. याच कारणें श्रुतिशास्त्रें जीवेश्वरजगत्प्रतिपादन करतात. जसा चिंतामणी भूमींत असून मृत्तिकाच्छादनें भासत नाहीं, तें आवरण दूर केल्यास प्रकाशीत होतो, किंवा वस्त्र मूळचेंच स्वच्छ असून वरील मलानें त्याची स्वच्छता आच्छादित केली, ह्मणून स्वच्छ भासत नाहीं. तो मल क्षालन केला तर निर्मल भासतें अथवा अंधारांतिल वस्तू दीपादि प्रकाशाविना अप्राप्य,तीच प्रकाशानें प्राप्त. तरी ती दीपानें दिली असें नाहीं, ती तेथें पूर्वींच सिद्ध होती. दीपानें अंधार मात्र दूर केला; तद्वत गुरुशास्त्रें आत्म्याचें विधिमुखें[2], निषेधमुखें[3] स्वरूपलक्षण दाखवून देतात. इदंब्रम्ह म्हणून प्रत्यक्ष दाखवूं शकत नाहींत. जसा चंद्र शाखेवरून दाखवितां अचक्षूस दिसत नसून सचक्षू तो चंद्र पहातो, तसा मलिन अंतःकरण त्यास स्वात्मप्रकाश भासत नसून ज्यास गुरुशास्त्रसेवनानें आविद्यकविषयवासना विकल्पमळ नष्ट होऊन निर्मळ शुद्ध सात्विकीं सूक्ष्मवृत्ती झाली त्यास सहज प्रकाशित होतो. जसें सुवर्ण मूळचेंच स्वच्छ असतां राखेशीं ऐक्य झाल्यानें स्पष्ट भासत नाहीं, तावत सोनार संशयांत असून धूत असतो. सोनें स्पष्ट दिसलें कीं, धुण्याचा परित्याग करतो, तसें जोंपर्यंत विषयवासनेनें नानात्वभेद विकल्पमल आहेत तोंपर्यंत स्वप्रकाश भासत नसतो; यास्तव निःसंदेह स्वानुभव नाहीं तावत अविद्या मल आहे; असें जाणून तत्शुध्यर्थ यत्न केला पाहिजे. अंतःकरण शुद्ध झाल्यास आपणच प्रकाशित होतो; आणि आत्मस्वरूपवृत्तीस अग्राह्य तथापि जसें आदर्शयोगें स्वमुख दिसतें. तो आदर्श व प्रतिबिंबित मुख जरी

१ मन वाणि जाणू शकत नाहीं २ सत्यज्ञान अनंत सच्चिदानंदादिक लक्षणें ३ तन्नतन्न इत्यादि.

मिथ्या तरी स्वमुखानुभव होतो; तद्वत सामान्यवृतींत स्वानुभव होत आहे. अरे! आधारभूत वस्तूवांचून सुगंधिक द्रव्याचें ग्रहण होत नाहीं. तसा स्वानुभव पण स्पंद वृतींतच होतो. निस्पंदांत कल्पनाच नाहीं. तोच ब्रम्हानंद संबंधी वासनानंद होय; आणि वासनानंदाची परिपक्वताच ब्रम्हानंद. परंतु तो कळण्यास गुरुशास्त्रवृत्यादिकांचा उपाय नाहीं. तो ज्याचा त्यानें विचारच केला पाहिजे. परोक्ष ज्ञानास अविश्वास प्रतिबंध तसा अपरोक्षज्ञानास अविचारच प्रतिबंध आहे. एवं वासनानंदापर्यंतच सर्व सांगणें असतें, पुढें ब्रम्हानंदार्थ मन वाणीचा उपाय नाहीं तत्रापि जशी—

**स्वकंठेपि स्थितं वस्तु यथा न प्राप्यते भ्रमात्**
**भ्रमांते प्राप्यते तद्वदात्मापि गुरुवाक्यतः ॥**

कोणी पुरुषाची हेम माळा स्वकंठींच असून भ्रमानें गमावली म्हणून शोध करतो त्यास कोणी सांगतो कीं, माळ तुझ्या कंठींच आहे. एवं माळ गेली आली नसून विस्मृतींत गेली.स्मृतींत मिळाली. तद्वत गुरुशास्त्र-विचारानें पूर्वस्मृती येऊन स्वस्वरूप प्राप्ती होते. अरे मनुष्यास आरोग्यता मुळचीच असून मध्यें व्याधीसंबंधें विकृती झाली. ती चिकित्सक युक्तीनें काढून टाकतात मग तो पूर्ववत् होतो; तद्वत आत्मा सच्चिद्रुप स्वप्रकाश मूळचाच असून मध्यें अंतःकरणोपाधिसंबंधें भ्रांतीनें अच्छादित वाटतो ती भ्रांती गुरुशास्त्रयुक्तिनें दूर झाली ह्मणजे प्राप्ती होते; यावरून स्वानुभव—

**न शास्त्रैर्नापिगुरुणा दृश्यते परमेश्वरः**
**दृश्यते स्वात्मनैवात्मास्वया सत्त्वस्थया[1] धिया ॥**

गुरुशास्त्रवृत्तियोगें होत नसून त्याविना ही होत नाहीं. गुरुशास्त्र ईश्वर कृपा व चित्तशुध्दादिक आपला यत्न असें एकत्र मिळालें पाहिजे; आणि

१ त्रिगुणसाम्या.

आमरणपर्यंत पूर्वी विद्याप्राण्यर्थ नंतर कृतघ्नत्व न येण्यास त्यांचा मह॰ दुपकार स्मरून—

**यावज्जीवं त्रयं वंदेद्गुरुं वेदांतमीश्वरं ॥**

निरंतर सेवा, अर्चन, वंदन, केलें पाहिजे. एवं गुरु शास्त्र वृत्तियोगें स्वानुभव पण होत आहे—

**प्र०**—अवस्थात्रयादीकांत आत्म्याचा अन्वय ह्मणून तो नित्य सत्य व अवस्थादिकांचा व्यतिरेक ह्मणून त्या मिथ्या. हें निभ्रांत झालें आहे. परंतु प्रतीतीविना अनुसंधानाभ्यासास अडचण. कारण जागृस्वप्नांत विशेष विकल्पवृत्ति स्वस्वरूपास आच्छादित करते यामुळें प्रतीती नसून सुषुप्तींत विकल्प निःशेष नसतां सामान्य प्रकाश असतो. तरी ही निरुपयोग व स्वस्वरूपावस्थानाविना वृत्तीचें अज्ञान जाणणार नाहीं आणि अज्ञान तेथें सर्व दुःखे आहेतच येथें कांहीं सुचत नाहीं तर आत्मसुख प्राप्त्यर्थ कृपाकरून सांगितलें पाहिजे.

**स०**—आत्मप्राप्तीनिमित्त कांहीं यत्न नको. आवरण दूर करण्यास सर्व यत्न आहेत; जशी स्वप्नसृष्टी संकल्पाश्रित असते तशीच ही जागृत्सृष्टी संकल्पाश्रित आहे वृत्ती आभास इंद्रिय विषयादिक त्रिपुटी उदयांत भासते सुप्तींत त्रिपुटी नसतां भासत नाहीं यावरून संकल्प विकल्प हें आत्म्यास आवरण आहे. तें दूर करण्यास जशी सुषुप्तीकालिक चित्तवृत्ति निःसंकल्प असते तशी सकलविषयवासनां रहित अचल चित्तवृत्ती केली पाहिजे. ह्मणजे—

**द्वैतस्याग्रहणं तुल्य मुभयोः प्राज्ञतुर्ययोः ।**
**बीजनिद्रायुतः प्राज्ञः सा च तुर्येन विद्यते ॥**

प्राज्ञ व तुर्या या दोहींत द्वैत अग्रहण समान असून प्राज्ञावस्थेंत अज्ञानबीज निद्रा असते, ती तुर्येंत नाहीं, इतकाच भेद आहे. तर असें करावें कीं, जागृदवस्थेंत विकल्पवृत्तीचे क्षणोक्षण उद्भव लय होत असतात असा या वृत्तीचा धर्मच आहे; आणि अति चपल असते तथापि वैराग्य विचारबळें अंतःकरणाभासाची निःशेषकल्पना रोध करून पूर्वोक्त निर्विकल्पवृत्तीची दृढतर धारणा धरून अंतर्मुखध्येयाकार अचल एकाग्र करावी त्यामुळें विकल्पवेग कमी होऊन सामान्यवृत्तीयोगें वस्तु कळली न कळली इतक्यांत वृत्ती लय पावत असते; तत्रापि कळणें होतें. (कळावें मावळावें असा वृत्तीचा स्वभाव आहे ) एवं बहिर्मुखता जाऊन अंतर्मुख झाल्यानें वृत्तीचें अज्ञान जाऊन स्वस्वरूप ज्ञान होतें, व वारंवार विचार अभ्यासबळें स्पष्ट होत आहे. पुढें ज्ञानासह वृत्ती लयास जाते ह्मणजेः—

**नष्टे पूर्वविकल्पे तु यावदन्यस्य नोदयः।**
**निर्विकल्पकचैतन्यं स्पष्टं तावद्विभासते ॥**

एक विकल्प उद्भव होऊन विषयज्ञानें तत्काळ नष्ट होऊन दुसरा उद्भव होतो, या पूर्वोत्तर विकल्पाचें मध्यंतरीं काय आहे असा वृत्तिरोध करून विचार केला असतां निर्विकल्पचैतन्य स्पष्ट होत आहे. जसा अत्यंत कुशल सुतारानें मोठ्या कौशल्यानें काष्ठादिक कोणी वस्तुचा सांधा बसविला असतो तो दिसत (कळत) नाहीं असा बेमालून जरी आहे, तरी, त्यांत सांधा असतोच. तसा वृत्त्यंतरामध्यें अवकाश आहे तेथें संधींत कांहीं तरी असलेंच पाहिजे. ( नकिंचित ) कांहीं नाहीं असा जो सर्वाभावद्योतकशब्द स्फुरण होतो; यावरून तेथें कांहीं नाहीं हा अनुभव ज्या सत्तेनें होतो, तेंच सामान्यचैतन्य असें स्पष्ट होत आहे. कारण त्याकाळीं तेथें अंतःकरण अभास नसतां कांहीं नाहीं हें जाणणारा कोण असें निरापेक्ष साधनावांचून जें ज्ञान तेंच स्वयंप्रकाश स्वात्मरूप. हेंच

आत्म्याचें सद्रूप भासतें. ही चिद्रूपता व वृत्तिविषय दोन्हीं नसतां सुप्तिवत् निर्विषय सत्वसुख हाच आनंदानुभव होय; आणि त्याकाळीं वृत्ति आभासादिकविभेदक कोणी नसल्यानें जीव ईश्वरभावही समूळ नाहिंसा होतो. असें अभ्यासबलें जसजसे विकल्प क्षीण होतील तसतसा सामान्यात्मप्रकाश ज्यास्त स्पष्ट होऊन निःशेष विकल्पक्षयें निरतिशयानंद सुखप्राप्ती होत आहे हें ज्याचें तोच जाणें; अन्यास कळत नाहीं. याच कारणें बलात्कारें वृत्तिरोध करण्यास योगशास्त्र झालें आहे. तात्पर्य तरंगानें आपलें रूप सोडणें हेंच जलाशीं मिळणें तसें वृत्तिआभासानें आपलें विकल्परूप सोडणें हेंच आत्मत्वीं मिळणें; ह्मणजे या जगांत ज्या ज्या पदार्थाचें नामरूपविशेषत्वें ज्ञान होतें, तें तें मिथ्या जाणून बाध केला तर सर्वावधीचे अंतीं—

**ज्ञेयवस्तुपरित्यागाज्ज्ञानं तिष्ठति केवलं ॥**

ज्ञानमात्र सामान्यात्माच उर्वरित रहातो परंतु—

**प्रजहाति यदाकामान्सर्वान्पार्थ मनोगतान् ॥**

जेव्हां मनांतील सर्व कामवासना नष्ट होऊन निःशेष विकल्पक्षयें पुरूष विवेकवैराग्यसंपन्न होतो, तेव्हांच निजसुखप्राप्ती आहे. सारांश ज्याला विवेकयुक्त दृढवैराग्य सतत नसून वासना विकल्प गेले नाहींत त्याला वेदांतशास्त्राचें शाब्दिक पांडित्य, हें संसारांत व्यापाराचें भांडवल असतें तसें होत आहे. तें मनेंद्रियेंजयास—

**सत्संगो वासनात्यागः स्वात्मज्ञानविचारणं ।**
**प्राणस्पंदनिरोधश्चेत्युपायाश्चेतसो जये ॥**

सत्संगती, वासनात्याग, अध्यात्मविद्या, विचार प्राणाचा हट्टानें रोध, असे चार मार्ग आहेत यास्तव साधकानें आपला अधिकार विचारून

दृश्यमात्र मिथ्या निश्चयें, श्रीसद्गुरुकृपा संपादन करून, लय चिंतन संधिवृत्ति अभ्यास निरंतर अतितर केला पाहिजे. त्यासच अनुभव साक्षात्कार होतो.

**प्र०** महाराज ज्ञानास पण अभ्यासादिकांची अपेक्षा आहे, तर हें पण इतर साधनाप्रमाणें क्रियारूप झालें. मग ज्ञान व क्रियेंत भेद तो काय? दोन्ही समच झालें.

**स०**—हे शिष्य त्वां मूढत्व स्वीकारून ज्ञानबंधक होऊं नये! अरे हीच ब्रह्मविद्या. जगद्वंद्य त्रैलोक्यपावनी सुरासुरपूज्य मोक्षद होय. परंतु परोक्षज्ञान होऊन दृढापरोक्ष न झालें तर—

**शब्दब्रह्मणि निष्णातो न निष्णातो परे यदि**
**प्रमत्तस्य श्रमफलो ह्यधेनुरिव रक्षिता ॥**
**कुशला ब्रह्मवार्तायां वृत्तिहीनाः सुरागिणः**
**तेप्यज्ञानतमा मूढा पुनरायांति यांति च ॥**

वंध्याधेनूपालनवत् त्यांचे वेदान्त शास्त्रश्रम वृथैव असून ते पुरूष ज्ञानवार्तेंत कुशल पण रीती, स्थिती, वृत्ती, गुरुसंप्रदायमार्ग नसतां अज्ञानतमेंयुक्त दारा पुत्र धनाद्यसक्त त्यांस पुनरावृत्ती चुकत नसून स्वप्नावस्थेंतच त्यांचें पांडित्य लौकिक प्रतिष्ठा जाणावी. परमार्थ जागृतींत आले नाहींत. अरे दर्वीद्वारें सर्वरसपाक बाहेर येनात. ती दर्वी त्याग करून रससेवन करण्यांत स्वादसुख आहे. पण जर दर्वीच चावण्यास आरंभली तर स्वादसुख नसतां दांत मात्र पडतील; तद्वत् शब्दत्यागें अपरोक्षज्ञान पण होत आहे; परंतु अभ्यासादिक यथार्थ न केले तर शब्दज्ञानांत

१ कर्मांत २ जन्म मृत्यु ३ स्वयपाकांतील पळी.

कांहीं सौख्य नसून संसारयातना चुकत नाहींत. जशा कोणी पुरुषाच्या दोन स्त्रिया आहेत, त्यांत एक पतीगृहीं ऐक्य रहाते ती पतिसुखानुभव जाणते. दुसरी बाह्य भ्रमत असते, तिला पतिसौख्य नाहीं; तद्वत वेदान्त-शास्त्राधीत जे जे पुरुष त्यांचे बुद्धीवृत्तीरूप स्त्रियांशीं आत्मलग्न लागलें असतें. यांत ज्याची वृत्ती आत्मतत्वीं ऐक्य अंतर्मुख रहाते, ती नित्यसुखानुभव जाणत असून ज्यांची बुद्धी नामरूप विषयव्यवहारांत बहिर्भ्रमण करते तेथें निजसुख नसतां त्या शुष्क बोधापासून कांहीं फल नसून देहाहंतेनें यथेष्टाचरणें अधिक बंधन दृढ होऊन महान प्राप्ती समीप आली असतां अप्राप्यतेनें महारौरवीं[1] जातात. जसें निधिप्राप्त्यर्थ भूमीखननादिक दुर्घट यत्न करून सर्पादि विघ्नही दूर झालें व अमुकठिकाण असें निश्चित कळलें तरी पुढचा यत्न न केला तर जागा मात्र कळली; पण धनलाभ नसतां दरिद्रदुःख दूर होत नाहीं. अन्नरसपाक अतिकष्टानें करूनही रुची घेतली नाहीं तोंपर्यंत खरी गोडी कळत नसून क्षुधानिवृत्ती नाहीं. कोणास सहस्रद्रव्य देण्याची राजाज्ञा झाली, त्यामुळें कान मात्र तृप्त झाले; पण पदरीं पडलें नाहीं तावत् आढ्यता बाळगणें मूर्खत्व होय अथवा नटानें पृथ्वीपतिचें सोंग घेतलें तरी राजलक्ष्मी मिळत नाहीं. तद्वत सन्यासश्रम केला तरी निष्फळ. अरे—

**न गच्छति विना पानं व्याधिरौषधशब्दतः**
**विनाऽपरोक्षानुभवं ब्रह्म शब्दैर्न मुच्यते ॥**

औषध न घेतां औषधनामजपानें व्याधि नष्ट होत नाहीं, तसें परोक्षज्ञान होऊन दृढ अपरोक्ष नाहीं, तावत कर्ता भोक्ता भ्रांती जात नसून तज्जन्यदुःखें दूर होत नाहींत. कोणी स्वग्रामीं जाणें आहे तर प्राप्तग्राम

१ नरकीं.

सोडून तत्ग्राममार्गी जो निरालस चालतो तोच तेथें जातो. तसा विषयग्राम त्यागून श्रवणादिमार्गी जो निरालस चालतो तो मोक्षग्राम पावतो. रणांत अतिबळें युध्ध करतो त्यासच शत्रूजयें राजलक्ष्मी प्राप्त. तद्वत् कामादिषड्रिपुजय त्यासैच मोक्षलक्ष्मी प्राप्त. सारांश केवळ तोंडाच्या बडबडीनें कोणतेंच घडत नसतें. जर कोणास कांहीं वस्तूची अपेक्षा आहे तर त्यास तत्प्राप्तीस्तव गुरू जो मंत्र सांगतो, त्याचें दृढानुष्ठान जो करील त्यासच ती प्राप्त. अन्यास नाहीं. तसेंच—

**अकृत्वा दृश्यविलयमज्ञात्वा तत्त्वमात्मना**
**बाह्यशब्दैः कुतो मुक्तिरुक्तिमात्रफलं नृणां ॥**

दृढापरोक्षज्ञानाविना शब्दमात्रें संसारदुर्गती सुटणार नाहीं; आणि गुरुवाक्यश्रवणाबरोबर समूळ अज्ञान ग्रासून अपरोक्ष वस्तुतंत्रज्ञानरूप होणारे असे तीव्रप्रज्ञ अधिकारी थोडे. यास्तव असंग होऊन—

**दृश्यं नास्तीति बोधेन मनसोदृश्यमार्जनं ॥**

आत्माविना अन्य पदार्थच नाहीं असें पक्कें समजून लयसाक्षित्व चिंतन स्मरण ठेवणें येथें क्रिया ती कोणती? असा जो साधक निःशेष अज्ञान नष्ट करील तोच नित्य सुखी कृतकृत्य होतो इतर शब्दज्ञानी जन्मांधवत् होत. जन्मांध सर्वकाळ पित्याशीं ऐक्य असून पित्यास ओळखत नाहीं. कमल व दर्दुर जलांत एकत्र असतांही त्याचे सुगंधास दर्दुर अज्ञात. तसेंच शब्दपांडित्य होय. अरे अपरोक्ष ज्ञान झालें तरी एकाएकीं देहाध्यास दूर होत नसतो. कारण—

**द्वे पदे बंधमोक्षाय ममेति न ममेति च**
**ममेति बध्यते जंतुर्न ममेति प्रमुच्यते ॥**

बध्यमुक्ततेस मम न मम हे दोनच हेतु आहेत. मी माझें या देहाहंतेनें स्वस्वरूप विसरून विषयवासनेनं कर्म हेंच बंधाचें रूप मी नाहीं माझें नाहीं असा देहाध्यास जाऊन निर्वासनेनें अखंडस्वरूपावस्थान हाच मोक्ष, ही अहंममता—

**दृश्यदर्शनसंबंधान्न भवेत्परमं सुखं**
**तदेवैकांतसंचित्या मनोनाशः परं पदं ॥**

दृश्यदर्शनसंबंध सोडून एकांतिक दृढाभ्यास मनोनाशाविना क्षीण न होतां परंपद अप्राप्य यासच प्राज्ञसंज्ञक जीव ह्मटला आहे. यापासूनच विश्वतैजसाची उत्पत्ति असून सर्व दुःखाचें हेंच बीज होय व बीज न गेलें तर दुःखही जाणार नाहीं. कारण—

**यावद्विलीनं न मनो न तावद्वासनाक्षयः**
**न क्षीणा वासना यावच्चित्तं तावन्न शाम्यति ॥**
**यावन्न तत्त्वविज्ञानं तावच्चित्तशमः कुतः**
**यावन्न चित्तोपशमो नतावत्तत्त्ववेदनं ॥**
**यावन्न वासनानाशस्तावत्तत्वागमः कुतः**
**यावन्न तत्त्वसंप्राप्तिर्न तावद्वासनाक्षयः ॥**

यावत् मनोलय नाहीं तावत् वासनाक्षय नाहीं व यावद्वासनाक्षय नाहीं तावत् चित्तशांती नाहीं आणि जोंपर्यंत चित्त स्थीर नाहीं तोंपर्यंत अपरोक्षतत्वबोध यथार्थ नाहीं, असे हे परस्पर कारणभूत आहेत यास्तव मनोनाश, वासनाक्षय, तत्वविचार या तिन्हींचा एककालीं दृढाभ्यास केला पाहिजे. अरे पाणी पर्वतावरून खालीं साहजीक येतें पण वर परत नेण्यास महान यत्न लागतो; तद्वत या पृथ्वीवर जितके जंगम् प्राणी आहेत ते जिव्होपस्थनिमित्त अहोरात्र यत्न करतात. व—

**स एव दिवसः सैव रात्रिरित्येव मूढधीः**
**भोगाननुपतत्येव कालवेगं न पश्यति ॥**

पशुवत् नित्य तेच तेच विषयसेवन करतात वासनेनें जेथें तेथें धावतात, मार खातात, अशा विषयतादात्म्यें कालरूप चोरानें आयुर्वित्त हरून नेलें हेंही मनीं नाहीं; यांत कोणता पुरुषार्थ सिद्ध होतो? कांहीं नाहीं एवं प्रवृत्तिकडे अनेक जन्माध्यासें विषयार्थ वृत्ति धांवतच असते तिकडील ओघ वळवून निवृत्तीकडे आणण्याम महद्यत्न पाहिजे. तरच साफल्यता. जसें आम्रादिक अपक्वफल प्रथम बेचव निःसार लागतें. तेंच परिपाकीं मधुर स्वादिष्ट होतें तशी साधनाभ्यासकालीं ज्ञानाची अपक्वता असते. यास्तव जसा शेतकरी प्रथम भूमी शुद्ध करून उत्तम बीज आणून पेरतो; व मूषक भक्षण करतील म्हणून मृत्तिकेनें आच्छादित करतो, वारंवार जल देतो, पक्षी नाश करतील म्हणून जपतो, पशु तस्करादिकांपासून रक्षण करतो, एवं पूर्वी अहोरात्र कष्ट सोसतो तेव्हां परिपक्वकालीं संपूर्णसुखफल पावतो. तद्वत प्रथम निष्कामकर्मानें चित्तभूमी शुद्धकरून बोधविचारबीज लावून विरोधिमतकारउच्छेद करतात म्हणून गुप्त ठेवावें, श्रवणादि जल वारंवार द्यावें, कामादिक दुर्जनापासून रक्षित करावें तेव्हां बोधवृक्ष उद्भव होतो. त्याचे वृद्धिस्तव, दृढीस्तव प्रत्यगावृत्ती आभ्यास निरंतर झाल्यानें परिपक्वकालीं मोठी अपूर्व नित्यानंद फलप्राप्ती होते; आणि द्वैतशत्रूजयें अद्वैत अभेद विजय होतो; असे जे पूर्णबोध वस्तुतंत्र तेच अजर, अमर, मुक्त, जगद्वंद्य, धन्य, कृतकृत्य आणि—

**कुलं पवित्रं जननीकृतार्था**
**वसुंधरा पुण्यवती च तेन**
**अपारसंवित्सुखसागरेस्मिन्.**
**लीनं परे ब्रह्मणि यस्य चेतः ॥**

आपलें सर्व कुल पवित्र होऊन जननी ही कृतार्थ त्यानेंच केली, त्याचे पादस्पर्शें पृथ्वीपण पवित्र होते. एतावता केवल शब्दज्ञानें कांहीं फल नाहीं, अपरोक्ष साक्षात्कार होऊन ही त्रिपुटी खंडित करण्यास अखंडलयसाक्षि चिंतन केलें पाहिजे.

*प्र०—महाराज ज्ञानबंध कोणास ह्मणतात व त्याचें काय लक्षण असते ?*

**स०**—जो पुरूष सर्वब्रह्म हें सिद्धांतवाक्य श्रवण करून विवेचनाभ्यास यथार्थ न करतां स्वानुभव नसून रागद्वेषें बुद्धिपूर्वक इंद्रियारामी[1] आहे, तो पाखंडी यथेष्टाचरणें विषयभोगांत प्रवृत्त होऊन अधोगतीस जातो; यास ज्ञानबंध ह्मणतात. ह्मणजे ज्या ज्ञानानें संसारधरणें उठतें तेंच ज्ञान विपरीतग्रहणाचरणें दृढबंधास कारण होतें. जसा रोग गेला नसतां मी आरोग्य म्हणून त्या गर्वें औषध न घेतां पथ्य संभाळीत नसून उलट कुपथ्य करतो तो नाश पावतो. तसें अज्ञानरोगबीज गेलें नसून मी ज्ञानी मुक्त म्हणून त्या गर्वें श्रवणादि औषध सेवन न करतां वैराग्यपथ्य पाळीत नसून उलट विषयकुपथ्य दाटून सेवन करतो तो कुबुद्धी अघोर नरकीं जातो. जसा ज्वरितास ज्वर आहे वा गेला याचें प्रत्यक्षचिन्ह तृषाशमन, शरीराची दाह, शांती झाली तर ज्वर गेलासा समजतो; व जलतृषा शरीरदाह आहे तर ज्वर आहेसा जाणवतो, तशीं ज्ञानी अज्ञानी यांचीं पण प्रत्यक्ष चिन्हें असतात. भोगतृष्णाशमन चित्ततळमळशांती तेथें अज्ञान गेलें; व नानात्वभेदें अज्ञानज्वर आहे तेथें विषयतृष्णा रागद्वेषें चित्ताची तळमळ असते आणि बाह्य उपरोधिक

१ प्रीतीद्वेषाने इंद्रियांचे भोगात वर्ततो.

शांती, आंत वासना तसें आचरण व परमार्थाचें यथार्थ वर्णन करतो; पण आपली स्थिती रीती तशी नसून जशी—

**रागिणी गणिका वित्तं यद्वांच्छाति वरा हिं सा**
**धिक्कं वैराग्यवक्तारं वाचालं वित्तलंपटं ॥**
**न शोभते तथैवा यं लोभी वेदान्तवाचकः ॥**

वेश्या धनवस्त्रप्राप्तेच्छेनें महार चांभारादि हीन जाती पण न पाहतां जो येईल त्यास स्वदेह अर्पण करते, तद्वत वेदान्तवक्ता लोभानें जर पात्रापात्र न पाहिल तर विषयलंपटत्वें उभय समानच अशा वैराग्यास धिक्कार असो-

**अनित्यमिति यो वक्ति सेवते नित्यमेव तत्**
**बहिर्मुखस्य तस्यास्यं मा दर्शय महेश्वर ॥**

सर्व अनित्य मुखानें सांगत असून अंतरीं विषयाशा प्रबल व चोरून भोग अशा बहिर्मूखांचें तोंड ईश्वर न दाखवो. जसें धान्याचें माप सर्व धान्यांत वर्तत असून एकही कण संग्रह करीत नाहीं, तसेंच शब्दपांडित्य वृथा. अरे मूर्ख यथेच्छ वर्ततात तरी ज्ञानी मुक्त ह्मणतां येत नाहींत तसेच हे होत. जसा दीप हातांत आहे ह्मणतो व अंधार ही मला दिसतो ह्मणतो त्याचे हातांत दीप नाहीं असें जाणावें तसा—

**यस्याभिमानो मोक्षे च देहे च ममता तथा**
**न वा ज्ञानी न वा योगी केवलं दुःखभागसौ ॥**

मी ज्ञानी मुक्त ह्मणून देहाहंकारें रागद्वेषें यथेष्ठाचरण तें[1]ज्ञानाभास पाखंडी जाणावें. जसा अग्नी आहे हें प्रत्यक्ष जाणण्याचें चिन्ह धूम

१ आभासच्छायामात्र.

होय तसा विषयांत राग हें अज्ञानी जाणण्याचें प्रत्यक्ष चिन्ह आहे. अरे ज्याला एक नेत्र तोही कूपांत पडत नाहीं ! मग ज्याला दोन नेत्र स्पष्ट आहेत तो कसा पडेल? तद्वत् थोडकें धर्माधर्मज्ञान तोही यथेष्टाचरण करीत नाहीं मग वेदान्तशास्त्राचें चांगलें ज्ञान असून अनुभव आभ्यासबळें त्रिगुणसमत्वें केवल ब्रम्हमय अंतर्मुखदृष्टी त्यास विहित कर्माचेंही स्वाभाविक स्मरण नसतें, तो बुद्धीपूर्वक निषिध्दाकडे कसा येईल ? तस्मात यथेष्ट वागणारे ते पाखंडी मूर्ख समजावे ! जसे—

**कलौ वेदांतिनः सर्वे फाल्गुने बालका इव ॥**

शिमग्याचे सणांत पुरुष बीभत्सोच्चारें बोलतात तशीं मुलेंही बोलतात. पण त्यांस अर्थ विदित नसतो, तसे शाब्दीकज्ञानी कर्मोपासना त्यागतात. त्यांची पुनरावृत्ती न चुकतां ते शास्त्रशिल्पींच होत. शिल्पी शिव विष्णु-मूर्ती अप्रतीम करतात. पण तसें ध्यान हृदयांत धरतां येत नाहीं म्हणून निष्फळ किंवा चित्रांतील सूर्य, चंद्र, वन्ही, जल, फल, पुष्प हे पहाण्यास मात्र आहेत परंतु व्यवहारास कांहीं उपयोगीं नाहींत तसा शब्द विवेक, वाणी, विलास मात्रच होय. असे—

**शास्त्राण्यधीत्यापि भवंति मूर्खा**
**यस्तुक्रियावान्पुरुषः स विद्वान्**
**सुचिंतितं चौषधमातुराणां**
**न नाममात्रेण करोत्यरोग्य ॥**

वेदशास्त्राधीतेंही कितीक मूर्खच रहातात. कारण रोग्यास रोगनि-वृत्यर्थ सांगितलें जें औषध तें नामजपमात्रें आरोग्य न करतां क्रियायुक्त झाल्यास निरोग करते तसें जन्ममरणरोगावर वेदान्तविचारच औषध

१ प्रीती २ जाणणारे.

आहे, तें पठणमात्रें मोक्षारोग्य करीत नसून अर्थविचारें विवेचनाभ्यासानुसंधान यथार्थ झाल्यास निरोग करीत आहे. यावरून जसें—

**पठका पाठकाश्चैव येचान्ये शास्त्रचिंतकाः**
**सर्वे व्यसनिवन्मूढा यः क्रियावान्स पंडितः ॥**

वणीक स्वचरितार्थ चालविण्यास विक्रीकरितां अनेक वस्तु बाळगतात, त्यांचा आपण उपभोग घेत नाहींत तसे लौकीक प्रतिष्ठा, वित्त, विषय प्राप्त्यर्थच यांची विद्या संग्रहीत असते. एवं—

**पठित्वा चतुरो वेदान् धर्मशास्त्रमनेकधा**
**ब्रह्मतत्त्वं न जानाति दर्वी पाकरसं यथा ॥**
**यथा खरश्चंदनभारवाही भारस्य वेत्ता न तु चंदनस्य**
**एवं द्विजा वेदशास्त्रैश्च पूर्णा ज्ञानेन हीनाः खरवद्वहंति ॥**

वासनेनें वेदशास्त्रपाठ पण ब्रह्मतत्व न जाणतां तदर्थ यत्न विचारही करीत नाहींत, तो, दर्वी सर्व पाक रसांत फिरत असून स्वाद जाणत नाहीं तद्वत् आहे. जसा खर स्वपृष्ठावर चंदनादिक अमूल्य अनेक भार वाहतो; तो केवळ भारवाहक होय वस्तुज्ञान भोग त्यास नाहीं; तसे शब्दपंडित

**विद्या विवादाय धनं मदाय**
**शक्तिः परेषां परपीडनाय**
**ज्ञानाय दानाय च पालनाय**
**खलस्य साधोर्विपरीतमेतत्**

विद्या, वित्त, शरीर, बल हे वादविवाद परपीडार्थच संग्रहीं ठेवतात; जसें मोराअंगीं सर्वत्र नेत्र तथापि मुख्य नेत्र नाहीं तर अंध किंवा गुळांतील दगड जळांतील पाषाण असंख्यकाल त्यांत असून मधुर व मृदु होत नाहींत तद्वत् या विद्वांसाची गती आहे

**विज्ञातब्रह्मतत्त्वस्य यथा पूर्वं न संसृतिः**
**अस्ति चेन्न स विज्ञातब्रह्मभावो बहिर्मुखः**

अरे ज्यास ब्रह्मतत्व पक्कें समजलें त्यास पूर्ववत् संसार रहात नसतो; व जेथें पूर्ववत संसार आहे, ते तत्वअज्ञात बहिर्मुख जाणावे अशा शिस्नोदरपराची संगत मुमुक्षू साधकांस महा अनर्थक आहे. जसा धनुष्यापासून सुटला जो बाण तो हिंसेविना अन्य कांहीं अर्थसिद्ध करीत नाहीं तशा कुसंगतीनें दुर्बुद्धी विपत्ति मात्र येतात.

**असतांदर्शनात्स्पर्शात्संजल्पाच्च सहासनात्**
**धर्माचाराः प्रहीयंते..........................||**

त्यांच्या दर्शन, स्पर्श, बोलणें, हास्यांत धीरवानपुरुषाचे बुद्धीसही भ्रम होतो; तुंबी जलांत कधींच बुडत नाहीं, ती ही पाषाणबध्द बुडते. तद्वत सिध्दही पतन होतात. मग मुमुक्षूसाधकाची कथा काय? मक्षिकेचा लघुपक्ष ही उदरीं जातांच मळमळ करतो. लोहकाराग्नी जवळून कोणी सहज जातांही त्यास दग्ध करतो. तृणाच्छादित खळगा दुरून बरा दिसतो पण जो जवळ गेला त्यास विपत्तींत पाडतो; यावरून—

**वरं पर्वतदुर्गेषु भ्रांतं वनचरैः सह**
**न मूर्खजनसंपर्कः सुरेंद्रभुवनेष्वपि ॥**

दुःसंगाहून पशुसंगती ही बरी. अरे—

**दुर्जनः परिहर्तव्यो विद्ययालंकृतोपि सन्**
**मणिना भूषितः सर्पः किमसौ न भयंकरः ॥**

सर्प मणिभूषित आहे तरी भयप्रदच; तसा शाब्दिक पंडित असून रीती, स्थिती, वेद, शास्त्र, गुरुसंप्रदाय, विरुद्ध त्याचा संग मोक्षेच्छुस भयंकर

आहे. अरे प्रेत घरांत पडलें असून बाह्य सडासंमार्जनशुद्धता व्यर्थ; तसें कामादिक अंतर्यामीं असून बाह्यवेष क्रिया ज्ञान, तें निष्फल. वसिष्ट रामास सांगतात--

**वरं शरावहस्तेषु चांडालागारवीथिषु ।**
**भिक्षार्थमटनं राम न मौर्ख्यं हतजीवितं ॥**

हस्तांत खापर धरून चांडालगृहीं भिक्षामागणेंही बरें, पण ज्ञानरहित मूर्खजीवित बरें नाहीं. कारण अज्ञान शत्रूहून अन्य मोठा शत्रू दुःखद सृष्टींत नाहीं. तात्पर्य—

**विचारितमलं शास्त्रं चिरमुद्ग्राहितं मिथः ।**
**संत्यक्तवासनान्मौनादृतेनास्त्युत्तमं पदम् ॥**

कितीही शास्त्रें धुंडाळलीं व वादविवाद केला तरी फलितार्थ इतकाच कीं, सर्व वासना त्याग करून मन तुष्णी झाल्याविना उत्तमपदाची प्राप्ती नाहीं तस्मात रोगबीज असेपर्यंत औषध घेऊन पथ्य संभाळणें उचित, तद्वत समूळ आज्ञान गेलें नाहीं तावत् श्रवणादि औषध, वैराग्यादि पथ्य, संभाळून सर्ववासनात्यागें विवेचनाभ्यासबलें पूर्णास्थिती आकलन करून परमार्थतः सर्वविश्व एक ब्रह्मरूप, तथापि सवृत्तिक असेपर्यंत अंतर्दृष्टीनें ऐक्य व उपाधिभेदें व्यवहाररीत्या तारतम्य ठेवलें पाहिजे तेच कृतकृत्य धन्य, इतर नाहींत.

**प्र०**–महाराज ज्ञानी पूर्णबोध, व पाखांडी[1] अज्ञानी, हे बाह्याचरणें सारखेच भासतात; आणि अंतरस्थिती समजण्यास मार्गच नाहीं; मग खरें खोटें कसें जाणावें? ज्ञान्याचा व्यवहार कसा असतो?

१ खरे नसतां त्यास सारखे दिसणारे.

स०—पूर्णबोधज्ञात्यांचा बाह्याचरणाचा नेम नसतो, कारण—

**स्वसंवेद्यं च तद्ब्रह्म कुमार्या स्त्रीसुखं यथा ।**
**अयोगी नैव जानाति जात्यंधो हि यथा घटं ॥**

आत्मरूप स्वसंवेद्य आहे त्यास जसा जन्मांध घट जाणत नाहीं तसे बहिर्मुख जाणत नसतात तथापि—

**दोषबुद्ध्योभयातीतो निषिद्धान्न निवर्तते ।**
**गुणबुद्ध्या च विहितं न करोति यथार्भकः ॥**

जसें सूर्योदयीं तम स्वाभावीक नष्ट होतें, बळें काढावें लागत नाहीं, तसें ज्ञानोदयीं कामादिक दुर्जन सहज जाऊन क्षमा दया पण स्वाभावीक येतात. एवं स्नानसंध्यादिक पूर्ण संस्कारें ह्मणजे अनेक जन्मीं केलें आहे ह्मणून, तिकडे साहजीक वर्तन असतें. अमुक विहित इष्ट ह्मणून फलेच्छेनें, प्रीतीनें ग्राह्य, अमुक निषिद्ध अनिष्ट ह्मणून द्वेषानें त्याज्य, असा गुणदोषहेतू नसतां बालवत् अहेतु, निषिध्दाहून दूर, शुद्धमार्गी वर्तन स्वाभावीक असतें. आणि—

**निर्मोहो निरहंकारो निर्लेपः संगवर्जितः ।**
**सर्वभूतेषु चात्मानं सर्वभूतानि चात्मनि ॥**

निर्मोह, निरहंकार, सर्वसंगपरित्याग, सर्वभूतांत ज्ञानरूपें आपण व आपणांत सकलविश्व पूर्ण पाहतात—

**मित्रामित्रसुखं दुःखमिष्टानिष्टं शुभाशुभं ।**
**नैव मानापमानं च तथा निंदात्मसंस्तुति ॥**

मित्र, शत्रु, सुखदुःख इष्टानिष्ट, शुभाशुभ, मानापमान निंदास्तुति, समान—

**भिक्षान्नं देहरक्षार्थं वस्त्रं लज्जानिवारणं**
**अश्मानं च हिरण्यं च शाकं शाल्योदनं तथा ।**
**समानं चिंतयेद्योगी वैषम्यं नैव चिंतयेत् ॥**

देहरक्षणार्थ भिक्षान्न वस्त्र ज्याकाळीं जसें प्राप्त त्यांत संतुष्ट पाषाण हिरण्य तुल्य, कोठें विषमता नाहीं. व—

**दुःखेष्वनुद्विग्नमना सुखेषु विगतस्पृहः ॥**
**वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥**
**न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि कांक्षति**
**उदासीनवदासीन इति ग्रन्थिभिदुच्यते ॥**

दुःखप्राप्तींत उद्विग्नचित्त नसतां त्याचा द्वेष नसून तन्निवृत्त्यर्थ आयास करीत नाहीं, सुखप्राप्तींत चित्ताची प्रसन्नता नसून प्रीतीपूर्वक तदर्थ यत्न नसतां दोहींत उदासीनवत् त्याचा ग्रन्थिभेद झाला आहे म्हणून स्थित धी आहे असें जाणावें—

**अहिमिवजनयोगं सर्वदा वर्जयेद्यः**
**कुणपमिव च नारीं त्यक्तकामो विरागी**
**विषमिव विषयांसि मन्यमानो दुरंतं**
**जयति परमहंसो मुक्तभावं समेति ॥**

ज्यास जनसंग सर्पवत, स्त्रिया प्रेतवत, विषय विषवत, जाणून सदैव दूर, वर्तन लाभालाभीं[१] तुल्य अंद्भित्व[२] दयालुत्व गतागतिक[३] चिंतन नसून प्राक्तनानुसार निर्हेतु प्रस्तुत येईल. तसें भोगी, बिगारी धरल्यासारखें निराग्रहें वर्ततात; किंवा—

१ प्रीयाप्रीय २ जडचेतनभेद ३ गतकाळ, येणाराकाळ.

**संकल्पसाक्षिकं ज्ञानं सर्वलोकैकजीवनं**
**तदस्मीति च यो वेद स मुक्तो नात्र संशयः ॥**

अहंकारापासून अखिल गुणात्मक समुदाय स्वात्म्याहून भिन्न, मिथ्या जाणून साक्षित्वें असतात, असे जे पूर्णबोध ते प्रारब्धबलें निर्विकल्प होऊन बसोत, अथवा प्रापंचांत असोत, उभयत्वीं तुल्यच आहेत. त्रिपुटी खंडीत झाल्यानें केवळ ज्ञानमात्रच होऊन रहातात, त्यांस ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, सन्यस्थ, कर्मनिष्ट, निष्कर्मी, सदाचारी, अनाचारी, राज्यपदीं दरिद्री कोणताच संशय नाहीं. यथावर्णाश्रमस्थितींत ब्रह्मरूपच आहेत—

**समाधिमथ कर्माणि मा करोतु करोतु वा**
**हृदयेनास्तसर्वाशो मुक्त एवोत्तमाशयः ॥**

ते समाधि वा कर्म करोत न करोत तरी सर्वाशा निपटून गेल्यानें मुक्त आहेत त्यांस कर्तव्याकर्तव्य रहात नसून अमुक आश्रम श्रेष्ट ह्मणून स्वीकार करावा अमुकाश्रमनिकृष्ट ह्मणून सोडावा हेंही नाहीं; कारण या अवस्था देहाच्या आहेत. एक आश्रमक्रिया सोडली तर अन्याश्रमक्रिया धरावी लागते मग आपली असेल तीच कां बरी नव्हे? यास्तव ज्या स्थितींत ज्ञानप्राप्ती झाली त्यांतच रहातात, अथवा गुरुसंप्रदायें आश्रमही करतात. करण्यांत न करण्यांत आग्रह नाहीं. एवं—

**देहाभिमाने गलिते विज्ञाते परमात्मनि**
**यत्र यत्र मनो याति तत्र तत्र समाधयः ॥**

देहाभिमानेंगते नामरूप जाऊन जिकडे तिकडे समाधी परमवस्तूच भासते, असा जो

**यो जागर्ति सुषुप्तिस्थो यस्य जाग्रन्न विद्यते**
**यस्य निर्वासनाबोधः स जीवन्मुक्तउच्यते ॥**
**अंतः संकल्पशून्यस्य बाहिः स्वच्छंदचारिणः ।**
**भ्रांतस्येव दशास्तास्तास्तादृशा एव जानतः ॥**

वासनाविकल्पक्षयें जागृतींत सुषुप्तिवत पूर्णबोधें[1] तृप्त, आंत संकल्पशून्य, बाहेर स्वच्छंदाचार, भ्रांतिष्टवद्दशेंत वर्तन त्यास त्यासारखाच जाणतो अन्य नाहीं इत्यादिक सहजावस्था स्वसंवेद्य[2] जीवन्मुक्ताचीं लक्षणें असतात—

**उत्तमा सहजावस्था मध्यमा ध्यानधारणा ।**
**अधमा प्रतिमापूजा तीर्थयात्राधमाधमा ॥**

अशी विज्ञानस्थिती अप्राप्य तावत ध्यानधारणादिक जें जें साधन तत्पर तें तें साधकदशेंत जाणावें व उन्मनीदशा ह्मणजे—

**लयविक्षेपयोः संधौ मनस्तत्र निरामिषं ।**
**स संधिः साधितो येन स मुक्तो नात्र संशयः ॥**

उभयविषय मध्यसंधी जेथें वृत्तीनें पहिला विषय सोडून दुसरा घेतला नाहीं, अशी जी निर्विषय, निर्विकार, निराधार, निरालंबस्थिती, जसा—

**निद्रादौ जागरस्यांते यो भाव उपजायते ।**
**तं भावभावितं साक्षाज्जीवन्मुक्तो भवेत्सदा ॥**

जागृतीचा अंत व निद्रा आली नाहीं या संधींत अमनस्क भाव असतो ही स्थिती अभ्यासबळें दृढ झाल्यानें—

**यथा दीपो निवातस्थो नेंगते सोपमा स्मृता ।**

---

१ विषय बोध नाहीं २ स्वतःच जाणतात.

निर्वात दीपाप्रमाणें ब्रह्माकार एकाग्र अचलवृत्ती यास विदेह मुक्त म्हणतात हें वाणिचे विषय नाहींत. वस्तुत:—

**द्विविधश्चित्तनाशोस्ति सरूपोऽरूप एव च**
**जीवन्मुक्तौ सरूपः स्यादरूपो देहमुक्तिगः ॥**

विदेहमुक्त, जीवन्मुक्त, ज्ञाननिश्चयें एकच असून फलही समानच आहे, मात्र चित्त सविकल्प निर्विकल्प भेदें दोन पर्याय झाले आहेत. जसें भर्जित-धान्यबीज, गजभक्षितकपित्थ, पृथ्वींत पुरलेलें मोतीं हीं सबंध दिसतात तरी दग्ध आहेत; तशी जीवन्मुक्ताची कर्मवासना निरंकुर बाह्य दिसून मिथ्यत्वें व्यवहार असतो व बीज समूळनाश, तशी विदेह मुक्ताची कर्मवासना निर्मुळ, म्हणून अंतर्बाह्य कोणताच विकल्प व्यवहार नसतो; एवं सर्व ब्रम्हात्मा सत्य नामरूपजगन्मिथ्या याचें अखंड स्मरण हें तुरीयदर्शेत जीव-न्मुक्त. आणि—

**न देहो नेंद्रियप्राणौ न मनो बुद्ध्यहंकृती**
**न चित्तं नैव माया च न च व्योमादिकं जगत् ॥**
**न कर्ता नैव भोक्ता च न च भोजयिता तथा**
**केवलं चित्सदानंदो ब्रह्मैवात्मा यथार्थता ॥**

देहेंद्रिय प्राण मन बुध्दी, चित्ताहंकार, जगत्कर्ता, भोक्ता, कांहीं नसून केवळ सर्व एक ब्रम्हात्माच. या दृढनिश्चयें उथ्थानरहित त्याचेंही विस्मरण हें तुरीयातीत उन्मनीदशेंत विदेह मुक्त होत. आतां निःशेष-जगदभाव हीच निर्विकल्पसमाधी म्हणून तत्पद त्वंपदादिकशोधन न करतां हट्टयोगादिक अविचारी वायुरोधें मन एकाग्र करतात त्यायोगें वृत्ती सुप्तीवत् शून्याकार रहाते हीच जर समाधी म्हटली तर सर्प कच्छ मंडूका-

१ जग नाहीं.

दिकांस अतिशय एकाग्रता असते किंवा निद्रा पण समाधीच म्हटली पाहिजे; कारण त्याकाळींही सृष्टि अभाव आहे व जागृती आली कीं पुन्हा पूर्ववत भ्रांती होते. तशीच अविचाऱ्यास उथ्थानीं पूर्ववत भ्रांती होते मात्र तितकावेळ नाहीं. जशी तुंबी जलांत बळेंच बुडवून धरावी तोंकाळ रहाते सुटल्याबरोबर वर येते तसें जगत्सत्यत्व संपादून वृत्तिरोध केला तर तोंकाळ वृत्ति शून्याकार राहून उथ्थानीं पुन्हा सत्यत्व बुध्दीनें संसार करील अशा तपसमाधियोगें चित्त एकाग्र होतें. परंतु संसारदुःख दूर होत नाहीं. दुःखास मुख्यत्वें कारण आपणाहून अन्य दुसरी वस्तु पाहिजे पण आत्म्याविना सर्व जड असें दुसरें कांहीं नाहीं तर दुःखही नाहींच. कारण सर्वएक ( अद्वैत ) वस्तूच आहे दुसरें नाहींच. मग ऐक्य कसें काय करावें? एवं ज्याला सर्वब्रम्हात्माच खचित कळला त्याला नामरूपविषय भिन्न कोठें उतरतात जर विषयच नाहीं तर अनुकूल काय? अनुकूल प्रतिकूल नाहीं. मग रागद्वेष कुठलें? रागद्वेष नाहीं तर कर्म अभाव. कर्मकर्ताच नाहीं मग फलदाता ईश्वर भिन्न कोठें? एवं—

**.....................सोस्ति ब्रह्मैवास्ति निरंतरं ।**
**नैकमस्ति न च द्वैतं संवित्स्फारं विजृंभते ॥**

संसार मजहून भिन्न व सत्य समजून आसक्तीनें माझें तुझें ग्रहणत्यागार्थ कर्में होत होतीं. त्या संसाराचा गुरुशास्त्रमार्गें शोध पहातां स्वसंकल्प मात्रच प्रपंच दिसतो. न एक न अनेक कांहींच नाहीं. सर्व मी ब्रम्हात्माच आहें असें निश्चित ठरलें म्हणून वासना मेली यामुळें कर्ताकर्म, पुण्यपाप, सुखदुःख, ज्ञानाज्ञान, विधीनिषेध, बंधमोक्ष सर्वांचीच बोळवण; यास्तव त्यांचें स्मरणही रहात नाहीं. या विवेकविचारें अधिष्टानब्रम्हात्मा सच्चि-

१ सुतोवत.

दानंद अस्तिभातिप्रियत्वें सत्य नामरूप जीवेश्वरादि जगत मिथ्या दृढकरणें हीच जगन्निवृत्ती सहजावस्था समाधी ती बोधविचारें प्राप्त, क्रियेनें नाहीं. कारण समाधी, विक्षेप हे अंतःकरणाचे धर्म होत. वासनेनें संकल्प, विकल्प, व्यग्रचित्त हेंच विक्षेपाचें रूप यासच उथ्थान ह्मणतात. सर्व ब्रम्हात्मा निश्चयें निर्वासनेनें विकल्परहित निश्चलचित्त हीच समाधी, त्या चित्तादिकांचा संबंध आत्मत्वीं मुळींच नाहीं. त्यांच्या संयोगें वियोगें ज्ञात्यास काय लाभालाभ ? व त्या समाधिविक्षेपाची ज्ञात्यास काय अवश्यकता? एवं मोक्ष दृढज्ञानानेंच आहे. अन्यापेक्षा नाहीं—

**मोक्षस्य न हि वासोस्ति न ग्रामांतरमेव वा**
**अज्ञानहृदयग्रन्थिनाशो मोक्ष इति स्मृतः**
**न मोक्षो नभसः पृष्ठे न पाताले न भूतले**
**सर्वाशासंक्षये चेतःक्षयो मोक्ष इतीष्यते ॥**

तो मोक्ष कोणी देशांत कांहीं वस्तु आहे, असें नसून स्वस्वरूप अज्ञानानें जडचेतनग्रन्थि पडली; तिचें भेदन सत्यासत्यविवेचनानें आपापणास यथार्थ जाणून नामरूपी पुन्हा सत्यत्व भ्रांती नसतां सर्वपदार्थविषयक तृष्णानष्टें चित्ताभासाचे विकल्पक्षय हाच मोक्ष तो कोणास श्रवणादिकें तत्काल; कोणास वृत्तिरोधक्रमानें, असा अधिकारपरत्वें साध्य आहे. यास्तव—

**तावदेव निरोधः स्याद्यावत्तत्त्वं न विंदति**
**विदिते च परे तत्व एकमेवानुपश्यति ॥**

साधकास सर्वमिथ्या कळून आपलें असंगत्व दृढीकरण्यास क्षणैकवृत्तिरोध सांगितला आहे. एवं दृढज्ञानें अखंडस्वरूपावस्थान हीच समाधि व यांतच नित्यमुक्त जीवन्मुक्तादि असतात अशीं ज्ञानाचीं लक्षणें आहेत.

प्र०—महाराज जर ज्ञान्याचा जगताशीं पूर्ववत संबंध आहे, तर जगद्विषय त्यास पुन्हा आकलन करतील असा संभव आहे व सर्व जगत्पदार्थ खोटे ह्मणून मन निर्वासना तर मग त्यांचा शरीरनिर्वाह व्यवहार कसा होतो? तें कृपाकरून सांगितलें पाहिजे.

स०—जो निद्रेंतून दृढजागृत झाला त्यास निद्रा पुन्हा आकलन करण्यास समर्थ नाहीं. तद्वत अज्ञाननिद्रेंतून जो दृढज्ञानें जागृत झाला, त्यास मायिक पदार्थ पुन्हा आकलन करण्यास समर्थ नाहींत. पण ज्ञानजागृती तीच कीं जेथें अखंडस्वरूपस्मृती व असत् जड अनात्मत्वीं पुन्हा सत्यत्व भ्रांती नाहीं अशा दृढज्ञान्यास समूळ अविद्यानाशें तत्कार्य जगद्वस्तु दिसत असतांही—

**स्वप्नभोगे यथैवेच्छा प्रबुद्धस्य न विद्यते ।**
**असत्स्वर्गादिके भोगे नैवेच्छा ज्ञानिनस्तथा ॥**

जो स्वप्नांतून जागृत झाला तो स्वप्नमिथ्या जाणून तद्भोगेच्छा करीत नाहीं; तेवीं ज्ञाता स्वर्गमिथ्यत्वें इच्छा करीत नाहीं व कदाचित प्रारब्ध-बळें इच्छा झाली, ती मुळांस सत्यत्वबुद्धी नसते. यास्तव राजदंड लागू नाहीं तद्वत मिथ्यत्वेंभोग घडतात पण सुखदुःख नसतां बाधकत्व नाहीं. कारण देह देहीविभाग न जाणून, अज्ञानी देहच मी या अभिमानानें जगद्वस्तु सत्य आपाहून भिन्न मानून सुखाची इच्छा दुखाचा द्वेष ह्मणून कर्में करतात.कर्मामुळें पुण्य पाप, तदर्थ सुखदुःखें, तीं भोगार्थ देहोत्पत्ती, देहाहंकारें सुखदुःख, या प्रवृत्तीचक्राचें मूळ स्वस्वरूपअज्ञान तेंच बाधक आहे. अशीयावत जगत्सत्यत्वबुद्धी तावद्वासना व कर्में घडतात ह्मणून बंधन आणि ज्ञात जसें पृथ्वीवर पृथ्वीपतीचें परस्पर युद्ध होत असतें तेथें त्यांचा व पृथ्वीचा अनिश्चित संबंध होतो तरी त्यांचे जयाजयाचे हर्ष खेद पृथ्वीस नाहींत.ऐसे—

**मय्यनंतचिदंभोधौ विश्ववीच्यादिकल्पना ।**
**उदेतु वास्तमायातु न मे वृद्धिर्न च क्षयः ॥**

मी अनंत चित्सागर त्या माझ्याठायीं अनिश्चितमाया कल्पनालहरी-योगें देहादि जग उद्भवून क्रीडा करून माझ्यांतच लय पावतें. तद्योगें मला क्षयक्षयवृद्धी क्रियाहोतां देहच कर्ता, क्रिया न घडतां देहच अक्रिया होतो. मी (आत्मा) असंग, अविकार, अक्रिय, अनित्य, सत्य, अधिष्ठान उदयास्तरहित—

**आत्मनः संसृतिर्नास्ति बुद्धेर्ज्ञानं न जात्विति ।**
**अविवेकाद्द्वयं युक्त्वा संसारीति प्रवर्तते ॥**

द्रष्टा साक्षी ज्ञप्तिमात्र व बुध्यादृश्यमात्र जड एवं द्रष्टातो दृश्य नसून दृश्यतो दृष्टा होत नाहीं म्हणजे मायिक दृश्य मात्र, जर त्यास चैतन्य नाहीं व दृष्टा चेतनमात्र, जाणता, त्यास चलन नाहीं. याप्रकारें दोहींकडे संसार नसून अविवेकानें जड चेतन ऐक्यत्वें भासतो ते—

**भोक्ता सत्त्वगुणोपेतो भोगानां साधनं रजः ।**
**भोग्यं तमोगुणं प्राहुरात्मा चैषां प्रकाशकः**

भोक्ता सत्वगुणात्मक अंतःकरणाभास, भोगसाधनक्रियाकर्ते रजोगुणात्मक, प्राणेंद्रियें भोग्यपदार्थमात्र तमोगुणात्मकजड, हेसर्व प्रकृतिधर्म पूर्वींच पंचीकरणप्रसंगीं सांगितले आहेत. या सर्वांहून मी (कूटस्थात्मा) निराळा प्रकाशक मात्र असंग हेंही सांगितलेंच आहे. यारून तमाशा करणाराचे हर्ष, खेद पहाणाऱ्यास नसतात तद्वत बुध्यादिकवि जागृत्स्वप्नादिक धर्म कर्म मला पहाणाऱ्यास कुठले? सृष्टींत अनेक शरीरें आहेत त्यांत चेतनसर्वें

व्यापक मी एकच आहें. तथापि त्या सर्वांचे कर्मधर्माहून मी वेगळाच. मग या एक देहाचे क्रियाकर्मानें मला काय लाभ हानी ? अशा निश्चयबळें निराभिमान प्राक्तनानुसार वेठींत धरल्यासारखे भोग भोगतात. कारण देह प्रारब्धकर्माचा झाला आहे तें कर्म भोगानेंच क्षयास जातें अन्योपाय नाहीं. म्हणजे—

**ज्ञानोदयात्पुरारब्धं कर्म ज्ञानान्न नश्यति ।**
**अदत्त्वा तत्फलं लक्ष्यमुद्दिश्योत्सृष्टबाणवत् ॥**

ज्ञानोदयापूर्वी ज्यांचें फल होण्याचा आरंभ होऊन चुकला अशीं जीं प्रारब्धरूपकर्मे निशाणवेध करण्यास सुटून चुकलेल्या बाणाप्रमाणें जसा—

**व्याघ्रबुद्ध्या विनिर्मुक्तो बाणः पश्चात्तु गोमतौ ।**
**न तिष्ठति छिनत्त्येव लक्षं वेगेन निर्भरं ॥**

पूर्वी व्याघ्रबुद्धीनें सुटलेला बाण पश्चात गोबुद्धी झाली तरी परतत नाहीं किंवा मद्यपान करणाऱ्यास तें मत्त करणारच, हा त्याचा स्वभावच आहे. तसा प्रारब्धकर्माचा भोग चुकत नाहीं. मात्र कोट्यावधि कल्पार्जित संचित् कर्मे—

**अहं ब्रह्मेति विज्ञानात्कल्पकोटिशतार्जितं ।**
**संचितं विलयं याति प्रबोधात्स्वप्नकर्मवत् ॥**

यथार्थ स्वात्मज्ञान होतांच जागृतींत स्वप्नकर्मवत् तत्काल नष्ट होतात. जसें—

**यत्कृतं स्वप्नवेलायां पुण्यं वा पापमुल्बणं ।**
**सुप्तोत्थितस्य किं तत्स्यात्स्वर्गाय नरकाय वा ॥**

स्वप्नांत स्वप्नस्थास अत्युत्कट पुण्यपाप झालें तेंच त्यास जागृतींत स्वर्ग नरक देण्यास समर्थ नाहीं. तसें ज्ञात्यास प्रारब्धकर्मभोग बाधक नाहीं व

**ज्ञानादूर्ध्वं तु यत्किंचित्पुण्यं वा पापमेव वा ।**
**क्रियते बहुवाप्यल्पं न तेनायं विलिप्यते ॥**

ज्ञानोदयानंतर शरीर तावत पुण्यपापात्मक क्रियमाणकर्मे घडतांही जसा कोणी नृपाचा राज्याधिकार गेला तरी लोकांत राजा हें नांव रहातें. तद्वत् शरीरव्यवहार दिसतो पण मृतअहंकारें बाधक नसून त्या पुण्यपापास दोन विभागी श्रुतिनेंच नेमिले आहेत. भजक पूजकांकडे पुण्यकर्म, द्वेषी निंदकांकडे पापकर्म जात असून ज्ञाता मोकळा व प्रारब्धभोगांत त्यास सुखदुःखही नसतें. अरे सुखदुःखास कारण विषयाची सत्यता आहे.

**मृत्स्नेभके यथेभत्वं शिशुरध्यस्य वल्गति**
**अध्यस्यात्मनि देहादीन्मूढस्तद्वद्विचेष्टते ॥**

बाल मृत्तिकागजास गजारोप करून, तल्लाभनाशें सुखिदुःखी होतात, तसें देहादिकच आत्मा जाणून मूढ सुखी व दुःखी होतात. आणि ज्ञाते—

**घटादिषु प्रणष्टेषु यथाकाशमखंडितं**
**तथा देहेषु नष्टेषु देही नित्यमलेपकः ॥**

घटनाशें घटाकाश नष्ट झालें तरी मुख्याकाशाचा नाश नाहीं; तसा देहनाशें देही ( अधिष्ठानात्म्या ) चा नाश नाहीं. व तोच मी या विचारें अलिप्त राहून पुन्हा वृत्ति गोवत्सन्यायें[1] अंतर्मुख होते म्हणून दुःख होत नाहीं. कारण तक्रांतून नवनीत भिन्न झालें तें पुन्हा तक्रांत मिळत नसतें. जलांतील मच्छास जल अंध करूं शकत नाहीं. मंत्रज्ञास[2] सर्प पिशाच

१ गाय कितीही दूर गेली तरी वत्साचें स्मरण होऊन आपणच स्वगृहीं येते
२ गारुडी.

बाधा करूं शकत नसतात किंवा चुंबक लोहास आकर्षित करतो; पण पारसमणि स्पर्शानें त्या लोहाचा लोहभाव नष्ट झाला तर आकार पूर्ववत् राहून स्वभावांत फेर झाला ह्मणून त्या लोहास आकर्षण करण्यास चुंबक समर्थ होत नाहीं तद्वत देहादिसर्वसंबंच मी कर्ता, भोक्ता, सत्य, या अशास्त्र, अप्रमाण, अविवेकबुद्धीनेंच बंधन होतें, तें अज्ञान, गुरुशास्त्र सबल प्रमाणानें सत्यासत्य पृथक् करणें नष्ट होऊन, स्वस्वरूपाचें यथार्थ ज्ञान झालें तर देहादिसंबंध पूर्ववत् असून अंतर्स्वभावांत फेर पडतो ह्मणून ती बुद्धि मोक्षास कारण होते. पुन्हा मिथ्यत्वीं सत्यत्व स्थापित करीत नाहीं, यास्तव बंधकृत होत नसून अविद्या व तिचें कार्य जगाद्विषय त्यांस आकर्षित करण्यास असमर्थ होतात. जसा—

**यथा रविः सर्वरसान्विभुंक्ते**
**हुताशनः सर्वगतं विभक्षेत्**
**तथैव योगीविषयान्प्रभुंक्ते**
**न लिप्यते कर्मशुभाशुभैश्च ॥**

सूर्य, सर्वरस भक्षून निर्लेप. अग्नी, सर्वभक्षक तरी निर्दोष. जिव्हा, सर्वरसांशीं संबंध असून निर्लेप; अथवा सोमलादिक उग्रविषें मूढ अयुक्तीनें भक्षून मृत होतात, तेच युक्तीमान त्यांतील विषदोष निवृत्त करून खातात त्यांस उलट तीं बलपुष्टिकारक होतात. किंवा वैश्य आपले दुकानीं महाउग्रविषारवस्तू संग्रहीं ठेवतो त्यास त्या बाधक नसून जे खरीद घेऊन अयुक्तीनें बुद्धिपूर्वक सेवन करतात तेच विपत्तींत पडतात. आणि योगी त्या त्या विषयांतील सत्यता अहंममता हें मारकविष दूर करून मिथ्यत्वें निराभिमान सेवन करतात म्हणून त्यास बाधक नाहीं. जसें सती जाणारीचें चित्त गृहालंकार पुत्रादि सर्वत्रीं विरस असतें; तसें ज्ञात्यास आत्मसत्ता पृथक पाहतां सर्व पदार्थ मिथ्या तुच्छ विरस निःसत्व भासतात

१ समुदाय.

किंवा उलूकास दिवसा दिसत नाहीं यास्तव त्यापुढें कांहीं आलें गेलें सारखेंच. तद्वत ब्रम्हनिष्ठाचें चित्त स्वात्मन्वीं लीन असतें म्हणून जसें सोनें खरीद करणाराचें चित्त अलंकाराकार नसतें, तसें त्यांस नामरूप विषयाकार पृथक भासत नाहींत. तत्रापि जसा कटिपर्यंत जलांत उभा असलेला पुरूष शीत उष्ण दोन्ही अनुभव जाणतो; तसा ज्ञाता आत्मसुख, विषयसुख दोन्ही नित्यानित्य जाणून स्वात्मसुखांत व्यत्यय न येईल असे विषय, आसक्ती सोडून सेवन करतो, याकारणें अलिप्त मुक्त आहे. अरे सोनें कर्दमांत पडलें असेल तरी आंतून खरें आहे म्हणून त्याचे मोलांत कमीपणा येत नाहीं. तद्वत् खरा ब्रम्हनिष्ठ पूर्णज्ञानी त्यास कांहींच बाधक नाहीं. अरे मुलास कळत नाहीं तावत बागुलबुवाचें भय. चांगलें कळूंलागल्यावर तें बोलणें पोकळ. मृगजलभासें पृथ्वी आर्द्र होत नसते तद्वत कर्ताकर्मपुण्यपापादिकांचे अज्ञान्यास भय सर्वमिथ्यत्वज्ञानें तत्वज्ञास भीतीच नाहीं; मग त्यांस व्यवहारास कोणता अडथळा आहे? आत्मा जड व प्रपंच सत्य अशी भ्रांतीच असली पाहिजे कीं काय? आणि व्यवहाराचीं मुख्य साधनें मन, वाणि, शरीर, बाह्यविषयंतीं ब्रह्मवेत्याचीं ज्ञान होतांच नष्ट होतात असें कांहीं नाहीं. देहादिकसत्यत्वें आज्ञानकालीं जसा व्यवहार होत होता तसाच ज्ञानानंतर मिथ्यत्वें असतो. जरी व्यवहारीक सत्यता खरी नाहीं तरी तत्कालोचित व्यवहारसिध्यर्थ बाह्यात्कारी घ्यावी लागते. घट मृत्तिकामय आहे यांत मृत्तिका सत्य, नामाकार घट मिथ्या, असा व्यवहार चालतो किंवा गारूड्याचा खेळ खोटा समजूनही लोक तमाशा पहातात, तद्वत् नामरूपात्मक मायामय सर्वप्रपंच मिथ्या, त्रिकालाबाध्य, चैतन्यात्मा, सत्य या दृढनिश्चियें ज्ञाते त्यांतील अहंममघातक विष काढून प्राक्तनानुसार प्राप्ताप्राप्ती हर्षविषाद सोडून निरभिमान भोग करतात, यास्तव त्यांस बाधक नाहीं; आणि अज्ञानी स्ववासनाकल्पित विषय

सत्य मानून आसक्तीनें ग्रहणत्यागेच्छा करून, अहंममेति आपलेच कल्पनेनें बंधमोक्षादिक कल्पून विषयार्थि इष्टरन्यायें निरंतर भ्रमत राहून दुःखी होतात.

प्र.—भगवन् मी अज्ञानरूपघोररजनींत निद्रिस्त असतां आपल्या वचनामृत थोर वृष्टीनें निजरूपीं जागृतहोऊन विचारदृष्टच्या पहातां एक (अद्वैत) ब्रम्हात्माच ओतप्रोत अखंड, नित्य, सत्य, सर्वत्र पूर्ण असून माया, अविद्या, शिव, जीव, जगत कांहीं वस्तूच नसून न पूर्वी होती, न पुढें होणार आहे असें हें मायिकजगत सतासतें म्हणतां बनत नसून केवळ अविचारसिद्ध आहे; जसा रात्रीं घोरांधकार दिसतो पण हातांत दीप घेऊन पाहूं गेलें तर त्याचें नांवही नसतें किंवा सीतकाळीं धुई वर्षते ती कांहीं वस्तू नाहीं, तरी दृष्टिमांद्यत्वें वस्तुज्ञानांत फेर पडतो, तद्वत विवेकदृष्टच्या पहातां बाधावांचून अन्य अणुइतकाही पदार्थ या जगांत नसून नुस्त्या आज्ञानानें सकल विश्व मोहित केलें आहे हें महान् आश्चर्य आहे; परंतु अज्ञान ही कांहीं वस्तु नसून—

**मदज्ञानोदितं विश्वं मय्येव लयमागतं**
**अपरोक्षचिदानंदसो साम्राज्यमधुनास्म्यहम् ॥**

आपलीच कल्पना माया, अविद्या, अज्ञानादिक नामें होय. तद्योगें नामरूपात्मक नानाप्रकारें प्रपंच भासतो व सुषुप्तींत पुन्हा आपलेच ठिकाणीं लीन होतो त्याचा जागृतींतही वासना विकल्पक्षयें प्रत्यक्ष स्पष्ट अनुभव येत आहे; असा मी एक अद्वैत, स्वप्रकाश, अपरोक्ष, ज्ञानस्वरूप, नित्य, पूर्ण, असून अज्ञानाच्छादनभ्रांतींत गमावलों होतों तें आवरण आपल्या कृपाकटाक्षें दूर होऊन मी माझे साम्राज्यपदीं पुन्हा प्राप्त झालों

१ उष्टर स्वबुद्धीनें कधींच घरीं येत नाहीं. २ खरें खोटें. ३ अति सूक्ष्म

ही आपली महत्कृपा आहे; या भूमंडळांतील सूर्यासम सहस्र सूर्य जरी एक ठायीं उदय पावले तरी हृदयगुहेंत जें अज्ञानतम आहे त्यास दूर करण्यास समर्थ नाहींत. तें अज्ञान आपल्या प्रसादें नष्ट झालें, या महदुपकारास उत्तीर्ण होण्यास ही मजजवळ कांहीं नाहीं; मन, वाणी, शरीर, पण अभेदत्वें स्वामीचें आहे; म्हणजे आत्मबुध्या मी हा तुम्हींच आहांत. जीवबुध्या मी तुमचाच अंश. देहबुध्या मी तुमचा दास तर स्तवनवंदनभेद कसा करूं? म्हणून अनन्यत्वें नमस्कार करितों. कोणी देव धुंडूं गेला तो आपणच देव झाला, किंवा कोणी एखादे राजधानींत चाकरी मिळविण्यास गेला तो तेथें राजाच झाला; तद्वत् श्रीगुरुदयाळें माझें भेददारिद्र हरून अभेदस्वराज्यपद दिलें; तस्मात श्रीसद्गुरुविना असा कोणी समर्थ नाहीं कीं रंकास राज्यपद देईल. महाराज निर्गुणस्वस्वरूपीं मूळ जी मायास्फूर्ती उद्भव झाली तिनें स्वस्वरूपास आवरण केल्यामुळें देहादि जीव ईश कर्माकर्म, पुण्यपाप, सुखदुःख, बंधमोक्षापर्यंत सकलजगत्संसार उभा झाला आहे हें बोलणेंच सार्थ दिसत नाहीं; कारण आच्छादित झालेल्या वस्तूचें स्वरूपांतर[1] होत असतें, पण आत्मस्वरूप ज्ञानरूप आहे त्या स्वभावांत त्रिकालीं त्रई अवस्थेंत किंचितही फेर पडत नाहीं, ह्मणजे ज्ञाना (जाणपणा) विना कोणतेंच कार्य घडत नाहीं. जर सद्रूप आच्छादित ह्मणावें तर माया कशावर उद्भवून कोठें कशी भासेल? चिद्रूप आवृत्त ह्मणतां जगदांध्यप्रसंगमायाव्यवहार कसा चालेल? आनंदरूपही स्पष्टच आहे. आनंदाविना भूतें वांचणारच नाहींत; एवं सच्चिदानंद अस्तिभातिप्रियत्वें स्वप्रकाश निरापेक्ष ज्ञानात्मा प्रत्यक्ष स्पष्ट असून भ्रामकाविना कोण आच्छादित ह्मणेल? तस्मात मायानाहींच नाहीं. ह्मणजे जर स्वस्वरूपाचें अभान असेल तर अज्ञान माया ह्मणतां येईल परंतु ज्ञान असल्यावांचून अज्ञान आहे असें ह्मणतांच बनणार नाहीं; तर ज्ञान अखंड असतें असें कबुल करणें भाग

१ एक स्वभाव पालटून दुसरा होणें.

आहे, आणि ज्ञानरूपच मी (आत्मा) त्रिकाल त्रयावस्थेंत आहे, जागृत्स्व-प्रसुषुप्तींत मी नाहीं असें कधींच कोणास वाटत नसतें; मग स्वरूप अज्ञान ह्मणतां कसें बनेल? एवं अविद्या अज्ञान जर नाहीं तर जीवाचें रूपच कोठें काय उरतें? कर्ता जीवच नाहीं तर फलदाता ईश्वर भिन्न कोठें कसा म्हणावा? असें कारणरूप माया जीवेश यासच जर रूप नाहीं तर मग त्यांचें कार्य जगत्सत्य कुठलें? जें प्रत्यक्ष दिसणारें जगत्कार्य श्रुति युक्ती अनुभवानें खोटें ठरलें मग त्यांचें अप्रत्यक्ष अनुमानैकगम्यकारण[1] माया जीवेश खरें कसें म्हणावें? एवं जगच नाहीं तर मग त्याचें धर्मा-धर्मादिक सत्य कुठलें? अशी आपल्या कृपेनें मला जगतभ्रांतीच नाहीं. जें उत्पन्नच नाहीं तें नष्ट कसें होतें? ह्मणून उपाधिमुळें दिसतें तरी मिथ्या मृगजेलवतविवर्तमात्रच[2][3] जग होय. अन्वयव्यतिरेकप्रकारें सर्वाधिष्ठान सत्यज्ञानानंतर परिपूर्ण मी ( चिदात्मा )च आहें माझ्या अज्ञानें विश्वो-त्पत्ति व ज्ञानानें लय होतो. हे प्रभो! जसा चातक एक जलबिंदू इच्छित असतां जलधर त्यावर प्रचुर वृष्टी करितात तसा मी अज्ञानवनीं त्रितापें अति तप्त झाल्यानें शांतीसुखजलेच्छा करीत होतों त्यावर दयाघनें ज्ञानामृत अत्यंत वृष्टी केली, त्यायोगें निजस्मृतीनें जें करावयाचें तें केलें; जें पावाव-याचें तें प्राप्त झालें, आतां कांहीं एक कर्तव्यता राहिली नाहीं. असा मी नित्यतृप्त अजरामर निःसंदेह स्वरूपानंदी अक्षयसुखी धन्य कृतकृत्य आपल्या कृपाप्रसादें झालों. तथापि आपल्या वचनामृताची श्रोत्रांस तृप्ती होत नाहीं ह्मणून हा शेवटचा एक प्रश्न करतों. महाराज! कितीएक सिद्ध, साधु, योगी, विलक्षणसिध्यादिक[4] चमत्कार दाखवितात हें काय आहे व कशानें प्राप्ती आणि त्यापासून फल काय व तत्वज्ञास हीं चिन्हें कां ह्मणून नाहींत?

---

१ अनुमानानेंच जाणवतें. २ नसून दिसणारे. ३ सूर्यरश्मीतजल कधींच नसतें तथापि जलाभास होतो तसें आत्मचैतन्याविवर्त जगत भासते. ४ अध्यात्मादि,

**समाधान**—हे शिष्य अणिमादिकापासून ज्या ज्या सिध्या आहेत त्या त्या देश काल द्रव्य जपादिक क्रियेनें साधनाभ्यासबळें ज्ञानी अज्ञानी जो कोणी यथोक्त साधन करतो त्यास त्या प्राप्त होऊन अल्प-काळें नष्ट होतात; तें फल ज्ञानाचें नसून जपादिकर्माचें आहे. ज्या सिद्धी-करितां जो विधानोक्त दृढसाधनीं लागतो त्यास अल्पस्वल्प प्राप्त होऊन परिणामीं नाश होऊन वासनासंस्कारें जन्ममरणांत मात्र कारण होत असते. अशा ज्या पूर्वी नसतां गारुडवत्–क्रियेनें प्राप्त होऊन भासणाऱ्या वस्तू त्या अंतवंत क्षणिक मिथ्या असून अविवेकानें प्राप्तकाळीं सुखद, अप्राप्तींत वियोगदुःख देतात; जे आत्ममार्गशून्य त्यांसच भ्रांतीनें सुखद वाटतात कारण जे यांस साध्य करून प्रसिद्ध करतात ते वासनायुक्त असून देहें-द्रियें पोषणार्थ मी देह मानून आपणास मान, महत्व, शिष्य, सेवक, मठ-मठिका, धन, वस्त्र, स्त्री, पुत्र, पशवादिक प्राप्त्यर्थ प्रसिद्ध करतात ते मूढ अज्ञानी होत. अरे मुळींच मृगजल मग त्यांतील मच्छ कच्छ अमुक श्रेष्ठ अमुक निकृष्ट हें बोलणेंच अनुचित. तसें मुळींच सर्व मायिक मिथ्या त्याची भोगलिप्सा, हें मूर्खत्व नव्हे काय? या सर्व चेष्टा वासनेमुळें असतात. वासनेविना कर्मच घडत नाहीं ती एक वासनात्यागेंच; ज्ञानी, अजरामर, नित्यतृप्त, जीवन्मुक्त स्वतंत्र झाले; वासना नाहीं तेथून कर्म, क्रिया, पुण्य, पाप, सुख, दुःख, जन्म, मृत्यु, विधि, निषेध, बंध, मोक्ष, सर्वच जातात असें असून वासनेनें जप, तप, यज्ञ, दान, तीर्थ, व्रत, योग, उपासना वेदशास्त्राध्ययनादिक अनंतकर्मे करतात तोंपर्यंत परतंत्रता अधो-र्ध्व भ्रमण चुकत नसून दुःखनाश सुखप्राप्ती नाहीं, आणि अतृप्ती तीच वासना, अज्ञानबीज तेथें कर्मादिक परंपरेनें सर्व दुःखें ठेवलींच आहेत व खरें सुख कोणतें तत्प्राप्तीचा मार्ग कसा कोणता हें कळलें नाहीं. अरे स्वात्मलाभ हेंच नित्य सत्य सुख तिकडे विन्मुख आहेत. कारण विषयाशापाश सुट-ला नाहीं यामुळें असा—

**हण्यांमुष्टिभिराक्रोशैः क्षुधार्तःकंडयेत्तुषान् ।**
**ब्रह्मतत्वंनसज्ञात्वात स्यमुक्तिर्नैवियते ॥**

क्षुधार्त अत्याक्रोशें भूस कांडतो तो त्याचा उद्योग निष्फळ असून क्षुधानिवृत्ती नाहीं तसा अविवेक्यांचा विषयार्थ सर्व उद्योग व्यर्थ होत असून स्वात्मतत्वज्ञान यथार्थ नाहीं तावत् नित्यसुख नसतां दुःख दूर होत नाहीं. अरे यावत् परीस प्राप्त नाहीं तावत् पुरूष अनेक प्रकारचें धन, वस्त्रे मणी मौक्तीक संग्रह करतो परीस प्राप्तींत सर्ववस्तू तुच्छ होऊन अनादर किंवा त्याग करतो. भ्रमर कमलवनअप्राप्तीपर्यंत भ्रमत असतो, कमलामोद प्राप्त झाला ह्मणजे संतुष्ट निरीच्छ होत्साता फिरण्याचा , त्याग करतो. नौका जलावर अंतरीक्ष आहे तोंकाल हालत डोलत असते. तिरीं पृथ्वीतटास लागली ह्मणजे हालचाल होणें आपसुकच खुंटते. नदी समुद्रीं मिळाली नाहीं तोंपर्यंत शब्द करीत धांवत असते. समुद्रीं ऐक्य झाली ह्मणजे धांवणें शब्दकरणें आपणच खुंटून नदीपणाची भिन्न संज्ञा पण उरत नाहीं. तद्वत जी वासना हीच मूळमाया ब्रह्मशक्ती वृत्ती बुध्यादि-पर्यायें होय ती आपले मूलाधिष्ठानरूप नित्यसत्यसुख विसरून त्याहून भिन्न पडली. तें गमावलेलें अंतरानंदसुख बहिर्विषयांत आहे असें भ्रांतिनें जाणून यावत् पंचविषयांकडे गमन करते तावत् बहिर्मुखत्वें सुखार्थ अनेक विषयव्यापारकर्मी भ्रमण करीत असते परंतु विषयप्राप्तींत तृप्तीसुख होत नाहीं याकारणें शांती, समाधान, स्थिरत्व नसून, सदां चंचल रहाते तीच पुन्हां परमात्मीं ऐक्य झाल्यास निजानंदप्राप्तीनें संतुष्ट, निरीच्छ, नित्य-तृप्त होऊन सकलजगतपदार्थ तुच्छ विरस भासतात ह्मणून त्याग करून स्वात्मसुखीं एकरूप अचंचल होऊन रहाते व अंतःकरणेंद्रियादिकांचें भिन्नत्वही उरत नाहीं; एवं सर्वसिद्धतापरमपद स्वात्मलाभच आहे. ज्यांस निजपदप्राप्ती नित्यतृप्ती बाणली त्यांस तिन्हीलोक वंदन करतात व स्वात्म-भावें सर्वविश्व आपणच किंवा आपणाहून भिन्न तें निस्तत्व तुच्छ त्यांस भासतें यास्तव कोणतीच अपेक्षा व यत्न करीत नाहींत आणि प्रारब्ध-बलें कदाचित इच्छा झाली अथवा अकस्मात स्त्री, वित्त, राज्य, सिद्धी, आदिक प्राप्त झालें तरी तें आत्मसुखांत अंतराय ( विघ्न ) रूप आहे

असें जाणून आनंद करतात किंवा प्राक्तनबळें भोगही करतात तथापि स्वरूपानुसंधानें मिथ्यत्वज्ञानें निराभिमानदृढत्वें बाधक नाहीं. तात्पर्य ब्रह्मनिष्ठास स्वात्मलाभाहून अन्य अपूर्ववस्तू त्रैलोक्यांत नाहीं कीं जेणें-करून त्यांचें चित्त आकार्षित होईल आणि अविचारानें—

**अनात्मन्यात्मधीर्बंधस्तन्नाशोमोक्षउच्यते ।**

स्वस्वरूप विस्मृतींत असत्य अनात्मत्वीं आत्मत्वसत्यत्वबुद्धी व सुखाची इच्छा दुःखाचा द्वेष जगांत भलें ह्मणविण्याची इत्यादि विशेषत्वीची इच्छा हीच मोहाचीं स्थानें असून यासच विपरीत भावना ह्मणतात हीच बंधास मूळ आहे तेथेंच सर्व दुःखें असतात त्या वासनेचा सर्वमि-थ्यादृष्टीनें समूळनाश व अक्षोभशान्तचित्तें नामरूपत्यागें कर्ताकर्मबुद्धी नसून अखंडस्वस्वरुपावस्थान हाच मोक्ष, यास्तव तुवां विवेचनप्रकारें सर्व-मिथ्या निश्चय करून मोक्षापर्यंत सकलवासना निर्मूळ करून विचारपूर्वक आत्मवस्तु यथार्थ जाणून सदां अनुसंधानअभ्यासबळें पूर्णवस्तुतंत्रहोऊन यथाकाळीं यथालाभालाभीं समान विचरून, उरलें प्रारब्ध भोगून सारावें. आणि या ब्रह्मविद्येचा आपला निश्चय अनधिकाऱ्यास कदाचितही प्रगट-करूं नये कारण ते विषयलंपट बहिर्मुख यथेष्टाचरणीं पाखंडी ज्ञान कर्म उभयभ्रष्ट, पतित होऊन कुंभीपाकीं जातात व अन्यजनासही बुडवितात, यास्तव जो शुद्ध, सात्विक, शम, दम, श्रद्धा, विवेक, वैराग्य आदिलक्षणयुक्त खरा मुमुक्षु गुरुभक्त असा असेल त्यासच ही ब्रह्मविद्या यथार्थ प्रगट करून द्यावी.

ॐतत्सत्ब्रह्मार्पणमस्तु.



( स्वकृत )

# अनुभविक पदें वगैरे नवीन.

अजब तमाशा सचक्षु जग हें अंधापरि जाहलें ॥ स्वप्निं मी मी माझें बोले॰॥ धृ० ॥ भ्रममासें दिसली जी तनु दोदिवसांची खोटी, मूत्र मल मांस रक्त पोटीं ॥ अस्थीचा पिंजरा शिरदोरांनीं गुरगुटी, चर्म सुंदरसें वरि वेष्टी ॥ आनखशिख बुजविलें खिळ्यानें रोमांच्या दाटी, श्वास वायुची कळा मोठी ॥ इंद्रियदश मन धर्मतयांचे उमटे परिपाठी क्रियाकर्मादि सहज घडती ॥ पाण्याचा बुडबुडा प्रथम हा उघडा जन दृष्टी, नेणुनी जग अववें तुष्टी ॥ असाच साचचि मानुनि उगले व्यर्थचि जग कष्टी, मृगजलें तृषा हरू पहाती ॥ लक्षचौऱ्याशि पुतळे ऐसे सूत्रें परमुष्टी, पराधिन परि नाचति सृष्टी ॥ कर्मनदीपुरिं वहातां माता कांता सुत भेटी, पथिकसे क्षणभरि जन मिळती ॥ कळा ना कळे ज्याची त्याते चुकल्यास्तव मुकले ॥ स्वप्निं मी मी ॥ १ ॥ सच्चिद्व्योमीं अवाचित माया मेघापरिउमसे, तिमिरअज्ञान दाट खासे ॥ विद्युन्मन संकल्पविकल्पात्मक चमके अतिसे, सुमार्गि न बुद्धीस कांहि दिसे ॥ मी मी माझें अहंकार वन गर्जे हा अतिसे, रिचवि सुख दुःख जलधारा जसें ॥ पापपुण्यभवनदिला पुर भ्रांत्यात्मक भरला असे वाहे अववी दुनियापरिसे ॥ कोण कोणा सांभाळी अवघे भ्रमपुरि वाहति असे स्वतंत्र असोनि पराधिनसे ॥ जन्ममरणआवर्त विसावा क्षणभरि ही न दिसे, चालिले वेगगती सरिसे योगवियोगें माझें माझें बोल बोलती बहुसे सुचेना तरणोपाय कसे ॥ मृगजलपुर मिथ्या परि न सुटे भ्रान्त स्वबुद्धी बले ॥ स्वप्नि मी मी॥२॥ भववृष्टीच्या पुरा निरासी कैक मंद झटले, तया काथितां हें मन विटलें ॥

एकबळ वृष्टी अवरोधा जपि तपि ते नटलें, कितीएक यागादि किं अटले ॥काम्यकर्दमीं कैक कैक हटयोगादिकिं गुंतले, विजनि कैं अभिचारी घटलें ॥ द्वैतभक्तिची तरी फुटकी कैककळुनि मनिं फुगले, धारणाध्यानादिकें उगले ॥ सांख्यभोपळा बांधुनि कांसे पुरितरतीकितुले, कैक भव वृक्षा श्रमिं पडले ॥ महामोहभवऱ्यांत कितीएक चक्रापरि फिरती, विषयतरणींत कैक विरती ॥ एक वासना लाटिंत गेले ते स्वर्गी नरकी, कैक पडले इतर लोकीं ॥ विकल्पभुजगें कैकभक्षिलें कै योषामकरी, क्रोध अजगर्तो गिळि भारी ॥ एका ममता धामिण ओढुनि ने आपुले विवरीं, मच्छमद कितीकांतें मारी ॥ बकध्यानीं लोभानें गिळिले कै सिध्याधारी, झडपुनी नेतस्वकांतारी ॥ कर्मनदी अशि दुर्धर न निघे कोणिच परपारीं, प्रबोधा-निल विण उगि सारी॥ सद्गुरुकरुणे वांचुनि न निमे वृष्टिही अन्यबलें ॥ स्वप्नीं ॥ ३ ॥ सद्गुरु ह्मणती स्वप्न अरे हें निद्रावश भरिने, सांवरा ह्या सावध त्वरिने ॥ कर्णी पडतां शब्द असा विरळा तर दैवानें, होय जागा बहु पुण्यानें ॥ त्यासि बोध वायुचे झडाडी वितळे घनमाया, दिसेना असे कवण ठाया ॥ गप्चिप् मनविज स्तब्ध राहिली त्यजुनि विकल्पाया, अहंगर्जना ही अपसया ॥ सुखदुःखवृष्टी विरे अैसी सुकली भवसरिता पापपुण्यांश ओघ सरतां ॥ गडदनिशी अज्ञान विचारारुण उदयें हरले, बोधरवितेज अखिल भरलें ॥ प्रखर किरणचिद्भानु निरंतर उघड असुनि ऐसा, उलुकनाहिच ह्मणती जैसा ॥ तसा परिघ अज्ञान न उमजे जन अंधचि ह्मणुनी, निःशंकचि ह्मणते श्रुतिजननी ॥ वामन सुत गणपति गुरुपदरजि भव भय हे हरले ॥ स्वप्निं० ॥ ४ ॥

## २ पद बोधाचें.

अमोलकाया अतिदुर्लभ ही व्यर्थ गमावूं नका समज लौकर धरि गुरु-पादुका ॥ ध्रु० ॥ नटा घटा कटि पटा बांधिता शिरि मंदिल चोखट

नेसता मृदु मलमल करपटा ॥ शुभ्रदुपेटा बांधुनि फेटा छटात सोडिसि लटा, कटा कंकण मुद्रिका उद्भटा ॥ मौक्तिकमाळा कंठीं कार्नी बिगबाळी चावटा, घालुनि सुख मानिसी नफ्फटा ॥ कटार भाले धरि करवाले फिरसी रथ गज घटा । थटा रथ शिबिका साटी झटा ॥ चटा खटावा इटा विटापा जाइल सर शेवटा, तटांका उमजा हो मरकटा ॥ खटाटोप हा वाया उगला यात वपु कां अटा, दटावा दीन दीनजनमन फुकटा ॥ अटाट करिता घर धन वांटा सुत दारा मांने रटा, प्रभुसी मन चोरित चोरटा ॥ वटा न वाड्या माड्या गाड्या साड्या नच ये किटा, समागमीं जासिलरे एकटा ॥ कुटाळचाळा सोदर पाळा सोडविना संकटा, बटा पावुनि रडसिल पटपटा ॥ जटा काळवा जटा ओढुनी गिळि तुजला गटगटा, सुटा ना हातुनि मग वटवटा ॥ तटा तरी आलि ती न बुडवी वेळ न ये ही धटा, समज करि वेग सोडी कटकटा ॥ खटपट आधीं दुरित उपाधी बाधी तरि त्या मुका, समज० ॥ १ ॥ आराम वाटी द्रुम फल दाटी मकरंदाच्या रसा भ्रमे षट्पद जैसा फारसा ॥ मस्तबस्त युवतीसि पराच्या गुंता हो मदरसा, ह्यसापरि वागत नच चक्षुसा ॥ सुरम्यताटी सुवर्णवाटी सेविसि बहु, । षड्रसा नसारा उमजुनि वांया फसा ॥ वसा धरिल काळ साच तेव्हां खुशाल नरकीं बसा । वसा परी सोडिचना आळसा ॥ गज रथ वाजी दासी सेवक वनिता सुत गृहि रुसा । विसावा नाहिच मग गारसा ॥ पसा पसरता नसाच टुकडा मिळणे सावध असा । कसा हो भुलता हरिभरंवसा ॥ डुलाफुलाना उगेच पुढती वजा पडति सुखफुका ॥ समज० ॥ २ ॥ लखचौऱ्याशी फिरता अवचित तनु मिळते ही तरी, सुकाणू सद्गुरुचरणा धरीं ॥ वादविवादहि मृगजललहरी मनमलवायुवरी । तुफानि नपडवेसा पथ धरी ॥ धर्म शिडें चहुकडे उभारुनि गुरुमार्गे लौकरी तटापर जाय न आळस वरी ॥ सरे न वाटी ऐशा लाटी धर्मधनाच्या भरी । सुखानें पावसि मग परतिरी ॥ क्षण चुकला मुकला तरि सर्वा गोष्ट जाण

ही खरी । नचुकतां पाव तुं निज मंदिरीं ॥ फिटाल करजा पासुनि भेटा करिता हरिचे पुरी । नराहे काहीच आशाउरी ॥ पुरि सर्व कामना न अंतीं भव भय बाधा हरी । हरी हा दासाचा कैवारी ॥ आनंदडोहीं बुडता नाहीं दुःखाच्या लहरी । स्वशेजे स्वसुखे निद्रा करी ॥ उकलुनि गुंता घेई स्वसत्ता हातिं आपुले चातुरीं । अनर्थि न पडता तरि सावरी ॥ वामन सुत गणपती वदे ही वेळ नये ना चुका ॥ समज लौकर० ॥ ३ ॥

## ३. पद नर्मदेचें.

जय जय जगदंबिके श्रीनर्मदे भवानी ॥ धृ.० ॥ भवकानन बिकटघोर षड्रिपुपशु करत षोर, सरिता बिच बहत जोर, कर्मकी लखानी ॥ जय जय ॥ १ ॥ अबुध जीव जन अपार, अटके बि न ही आधार, करते तुज हुं पुकार, तार तार बानी ॥ जय जय ॥ २ ॥ सुनत ही बिनती किषोर, पर्वत पाखान तोड, निकसी जल धार जोर, प्रगटी महारानी जय ॥ ३ ॥ स्नान पान ध्यान करत, उसिके भव दुःख हरत, वामन सुत चरन न रत, जसकी रत गानी ॥ जय जय जगदंबिके श्री नर्मदे० ॥ ४ ॥

## ४ पद नर्मदेचें.

नर्मदामाता बडी दयालु सबदुनियाकी महामाया । अमरकंठसें चली नर्मदा भृगुक्षेत्र आसन किया ॥ धृ. ॥ त्रिविधिताप आतसके भीतर जग जलता देखा दिलसें । प्रगट पाप पर्वतकुं तोडे सुख दिया जनकुं मनसे ॥ निशिदिनि तेरो ध्यान धरत गुरु इंद्र चंद्र मुनि ज्ञाननसे, हरि ब्रह्माऋषि देव मानवी किये मुक्त पदके रजसें ॥ ऐसो तेरो महिमा गावत शेष ठिकाना महि पाया ॥ अमरकंठसें ॥ १ ॥ भृगुक्षेत्रतट निकट बिकटतपनटाजूट खट रुतु करते, ऋंड मुंड सुत धुंडी झुंड भूतन तनभार भूजंगनके ॥ ओही दयाल कृपाल समालकरे चिरकाल भुमंडलका, अलक् निरंजनमुनिमन

रंजन दिया दान गुरु यानका ॥ तात गुरू शिव मात तुमोरी भय भागा अब कालनका. जनम मरनकी खटपट निपटी पद प्रसाद गुरूमातनका ॥ कहे सुत वामन या मन वाकूं तन, मन, धन, अर्पत काया ॥ अमरकंठसेचली ॥ २ ॥

## ५ होरी.

ऐसी होरी मचाई। माया ठगनी ने रचाई ॥ धृ० ॥ तीनहि गुण पिचकारी भरी बिच पंचविषय रगडारी, लोकतीन सब रंगडुबाये मोह गुलाल छबाहि, ॥ नहीं कछु बनि न बनाई ऐसि ॥ १ ॥ पांच पचीस जुगावत खेलत अनुहत ढोल बजाई, देखत नेनभयो अंधियेरो गई सुध बुध बिसराई ॥ दिखे नहीं आपपराई ॥ ऐसि ॥ २ ॥ आगम निगम डफ बाजत सुन जो दौड गुरू पद आइ। नामरूप सबहोरि जगा फिर खेलत बे परवाइ ॥ तमाशा देखत ओही ॥ ऐसि ॥ ३ ॥ छह कामादिक बीर जलाके अंग भभूत रमाई॥तीनलोकमे भयो उजियारो घर घर अलक जगाई फाग मागत सब सोही॥ऐसि ॥४॥ गुरुपद गणपत गावत निसिदीन सावध बोध जगाई ठगठगनी बीच रहत ही उनको दूरसें दूर भगाइ, भरोसा न राख हु कोइ ॥ ऐसि होरी मचाई ॥ ५ ॥

## ६ पद शंकराचें.

पंचवदनका नाम लिया तो नाहि धोका जमकालनका। बिकट तुंडकी जिलीब चली सरदार बनो है भूतनका ॥ धृ० ॥ बामांकेपर गिरिजा सोहे बिभुत चढीहै खुसरंगकी बाघांबर परसापन लपटी चलि असवारी गिरिवरकी सुरत, छबेली बानि अलबेली शंकरजी मतवालनकी, चढेबेलपर शैलित्रिपुरहर सिंगी अनुहत नादनकी, गगन मंडलसब धूम मचीहै हर हर मेला दासनका बिकट तुंड ॥१॥सिसपे गंग तरंग सोहावे चमके जोत बिच चंदोकी, अटल पटलसे अगमनिगमभये निशा चढी कछु भंगनकी ॥ डमक डमक डं डं डं डं डं डमरु बजे खुबसाजनकि गले रूंडकि माल सोहे ज्यौं चमके बीज नभ मंडलकी, कृत्या माया आदिक

मेला साठ कोट गण संगनका ॥ बिकट तुंडसे जिलीब चली ॥२॥ ढोलक ढोल निशान डफी डफ झांज बजे करतालनसे, भं भं भं भं शंख वाजते घंट वाज घण घण घणसे, दशायुद्ध दशकर हुम जैसे प्रलय काल समभाववसे सबलोकनके लोकपती हर वक्त चरन से आयधसे, कंठ सुनीला गजचर्मांबर मृगछाला तन उपरसें, सबनादनमें नाद जु भरी तीनलोक डोले जासें कहे गणपतराव ऐसी हीतकी, नामभजो भवनाशनका॥ बिकट तुंड ॥ ३ ॥

## ७ पद उपदेशपर.

खलक पलय रेनोका सपना अजब तमाशा जग अंधा, नही गुन्हा नहि बांधा कोऊ आपहि आप भुला बंधा ॥ धृ० ॥ चारदिनोकी हाडमास-की माडे कि तव देह खरी, सो मेरी मेरी कर बैठाक्या आंखिया मे धुल. परी ॥ नाहुइ हैना होवेगी ये काया किसिकी आजघडी माल परायां । जान चुराते फांस गलेमे आनपडी॥कितनिं निंदये जाग दिवाने रहादीन । अब एक घडी । जबर जोर जंजीर सीरपर फोज कालकी आन खडी ॥ भवनदि गहेरि नावपुरानि नहिकै वट सतमारग का । क्यौंकर पार उतार पावगे जान परे नहि तीरनका ॥ काम क्रोध बिच मच्छ मगरियां मोह भंवर अज्ञाननका, बादल काला उपर । आया जहर जबरजरबाननका॥ मन पवनोकी झपट अंधेरी नहि रस्तेकी खबर खरी । मै मेराये अहंकारकी दिल बादलमें धूल भरी ॥ नफासमज जो सौदा कीया सो तोटेका हय धंधा॥ नही गुन्हा० ॥१॥ देह धरेका गूनयेही है खाय खिलाय लुटायलहै । कछु लेना कछु देना सौदा करले जलदी निकवहे ॥ दूर रहे सो हातमे करले हाथ रहे सो देदेदे । आगे हाट नबनिया यांही लेना होय तो लेलेले ॥ जो भुला सो फिर पसतावे आई रहा नहि आवेगी समज समज कर फुरति काया नाव निकलके जावेगी । दीपक तेल तहालग देहा श्वास खुटे नहि रहनेकी । शुभाशुभ सौदेकी सिरपे गठडि ओही फल देनेकी ॥ हाकमका डर घरके यारो नीकी खरीदी करलेना । नहितो यांके हैना व्हांके ऐसी करनी मत करना ॥ वामन सुत गणपती छुटवेकी बखत न पडना फीर फंदा ॥ नही गुन्हा० ॥ २ ॥

---

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध |
|---|---|---|---|
| २ | ७ | जगद्विशालरूप | जगद्विनाशरूप |
| ७ | ४ | सश्चिदानंद | सच्चिदानंद |
| ८ | १६ | गुरुप्राप्तीस | गुरुपास्तीच |
| ११ | १० | विपलज्जढिला | विपज्जालजटिला |
| २२ | १० | लक्ष्मीयस्र्य | लक्ष्मीर्यस्य |
| २४ | ६ | यासचयांतून | या संचयांतून |
|  | १४ | पारतंत्र्याहितदेवाहि | पारतंत्र्यतदेवाहि |
|  | १५ | तावदीश्वरतोप्यय | तावदीश्वरतोभयं |
| २५ | १ | होता | होतो |
| २८ | १६ | गहण | ग्रहण |
| २९ | १४ | नाम | राम |
| ३४ | २० | थर्मेल्लिघन | धर्मोल्लंघन |
| ३६ | ५ | उत्तमाधमाभावेन | उत्तमाधमभावेन |
|  | ११ | भेय | भेद |
|  | १४ | कर्मभोगांतीं | सकर्मकर्मभोगांती |
| ४६ | ४ | दंड शास्त्र | दंड शस्त्र |
| ४७ | १ | पदपदार्थ | पद, पदार्थ |
|  | २१ | भोगतते | भोग ते |
|  | २१ | वासनेच्या | वासनेचा |
| ५१ | ७ | क्रियेनें | क्रियेनें |
|  | ८ | नळीसोडून | नळी न सोडून |
|  | २३ | क्षीं | क्षीणं |
| ५३ | ५ | नानात्म | नानात्व |
| ५४ | १२ | चिंतामणीअसून | चिंतामणी आपले जवळ असून |
| ६० | २ | हूर्त | मुहूर्त |
| ६२ | १५ | भागून | भोगून |

| पृष्ट. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ६४ | ३ | आत्मअंतवंत | अल्पअंतवंत |
| | १२ | गोडी जाणून | गोडी न जाणून |
| ६६ | १३ | सर्वकर्मातींतद्देसेश | सर्वकर्मातीतदशेस |
| ७१ | १२ | नउच्यते | नमुच्यते |
| ७३ | १५ | मंडनं | भंडनं |
| ७६ | ११ | अवस्थात्रयातें | अवस्थात्रयाचें |
| ७९ | ६ | देहत्रय पंचकोश | देहत्रय अवस्थात्रय पंचकोश |
| ८१ | १२ | हिरण्या गर्भास | हिंरण्यगर्भासच |
| | १३ | जगदंतपार्ती | जगदंतःपार्ती |
| ८२ | २ | पाया | माया |
| ८३ | २ | त्यांजी | त्यांचीं |
| | १५ | द्विगुणात्मिका | त्रिगुणात्मिका |
| | | भूत | भूतें |
| ८६ | ६ | चेतनाश | चेत्तानांश |
| | ,, | पुरुषांत | पुरुषअंग |
| | ,, | जडत्वभागे | जडत्वभाग |
| | २१ | आत्याज्ञान | आत्मज्ञान |
| ९२ | ८ | दृष्टत्वाद्दाच्च | दृष्टत्वाच्च |
| ९४ | १४ | जरतन्म | तर जन्म |
| ९५ | २ | सापेक्ष | सापेक्षक |
| ९५ | ९ | पदार्थ | परार्थ |
| | १० | देहाकरिता | देहीकरितां |
| ९६ | ८ | कूटस्थात्म | कूटस्थात्मा |
| १०० | १४ | त्रासतात | भासतात |
| १०४ | १५ | नीच | तीच |
| १०४ | १७ | आत्मनंदाचे | आत्मानंदाचे |
| १०६ | ३ | सुखरूप | सुस्वरूप |
| १०८ | १७ | आत्मकाल | अल्पकाल |

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| | १७ | स्वप्नावस्थेंत | जीवाचे स्वप्नवस्था ह्मणातात, या अवस्थेंत. |
| १०९ | ७ | उपराग | उपराम |
| ११० | ३ | तिराहित | तिरोहित |
| १११ | १० | स्प्नांत | स्वप्नांत |
| ११२ | २ | अन्नास | आभास |
| ११३ | १३ | उदयास्तव | उदयास्त व |
| ११३ | ८ | सकाम | संकल्प |
| ११४ | १४ | भासयोर्णे | आभासयोगें |
| ११५ | १ | हरतात | ठरतात |
| | ७ | एकोत्यात्मा | एकोप्यात्मा |
| ११५ | ३ | यास्तव | वास्तव |
| | ,, | संवंधभाव | संबंधाभाव |
| ११६ | २१ | उष्टादिक | उष्टारादिक |
| ११७ | ८ | वामरूप | नामरूप |
| ११८ | १ | दारोत्यस्य | दारोप्यस्य |
| | १९–२० | अधिकरण | आदिकारण |
| ११९ | १८ | आरंभोपादन | आरंभोपादान |
| | २० | परिणामोपादन | परिणामोपादान |
| | २१ | विवर्तोपादन | विवर्तोपादान |
| १२१ | २ | पादन | पादान |
| १२२ | १९ | आणि प्रत्यक्ष असते | आणि मृत्तिकाही प्रत्यक्ष असते. |
| १२५ | ९ | रहित | राहते |
| १२७ | ७ | सुखाकारितां | सुखाकारता |
| १३१ | १० | यांस | यांत |
| | १७ | सुप्रत | सुकृत |
| १३३ | १८ | कांतिकार्य | भ्रांतीकार्य |
| १३५ | १८ | दीर्घ | दीर्घकाल |
| १३६ | १० | कल्पनेंतच आहे | यावरून कल्पनेंतच विकार आहे |

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १३७ | १८ | भ्यास्त्ता | भ्यस्ता |
| १३९ | २ | अंश | अंशांत |
| | १२ | त्यास अद्दश्य | त्यासादृश्य |
| | १४ | वृद्धि | वृत्ति |
| १४३ | ४ | आपपाला | आपापला |
| १४९ | १ | व संयोग | व जलसंयोग |
| | १० | सत्य | सत्व |
| १५८ | १ | प्राण्यर्थ | प्राप्त्यर्थ |
| | ११ | जाणणार | जाणार |
| १५९ | १ | वतुर्या | व तुर्या |
| | ७ | विकल्पबेग | विकल्पवेग |
| १६१ | ६ | झालें | झाली |
| १६१ | १५ | वृती | वृत्ति |
| १६२ | ४ | शास्त्राधीत | शास्त्राधीत |
| | १४ | सहस्त्र | सरस्त्र |
| | १७ | सन्यासश्रम | सन्यासाश्रन |
| | २१ | मेमति | ममेति |
| १६८ | ४ | आभ्यासबलें | अभ्यासबलें |
| १७६ | ७ | कपित्य | कपित्थ |
| १८० | ११ | द्दष्टा | द्रष्टा |
| | १२ | द्दष्टा | द्रष्टा |
| १८२ | १९ | गोवच्छन्यायें | गोवत्सन्यायें |

## 'आत्मविचार' पुस्तकांस ज्या गृहस्थांनीं अंगाऊ आश्रय दिला त्यांचीं नांवें.

---

### एकापेक्षां जास्त प्रती घेणारांचीं नांवें.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| रा. सा. | गोविंदराव विष्णु देव वकील. | बडोदें. | प्रती. | १ |
| ,, | शंकर मोरो रानडे बी. ए. | ,, | ,, | १ |
| रा. रा. | चिंतामण शिवराम तांबे. | ,, | ,, | १ |
| रा. रा. | वामन आत्माराम पुसाळकर. | ,, | ,, | २ |
| रा. रा. | गुलाबदास गिरधरदास. | येवलें. | ,, | २ |

### एक एक प्रत घेणारांचीं नांवें.

श्री. रा. माधवराव चिंतामण गोळे ऐना. इनामदार.

श्री. रा. पांडुरंग बळवंत ऊर्फ दादासाहेब माने.

श्री. रा. रामचंद्र भाउसाहेब गायकवाड.

रा. ब. आत्माराम जोयताराम पटेल. स. से. सुप्रीन्टन्डेन्टसाहेब.

रा. सा. रामचंद्र आबाजी राजे.

,, व्यंकटराव बापूजी मांडे.

,, नागेशराव विनायक बापट.

मे. रा. हरीभाऊ गोविंदराव कडलक.

,, दामोदर सावळाराम यंदे.

,, रामचंद्र नारायण शेकदार.

रा. रा. वामन बळवंत गुप्ते.

" अमृत सखाराम वणीकर.

" अण्णाजी महादेव पुरोहीत.

" रामचंद्र महादेव हेडमास्तर म. र. शाळा नंबर १

" विनायक यज्ञेश्वर देव.

" कृष्णराव अनंत.

" सदाशिव खंडेराव राईकर.

" कृष्णराव भीवराव चित्रे.

" दत्तात्रय केशव गाडगीळ.

" शंकर वासुदेव करंदीकर.

" घनःशाम विठुजी जाधव.

" बळवंतराव वासुदेव इंगळे.

" विठ्ठल शिवराम पोवार पाटील वडळकर.

" वामनराव बाबाजी संत, जुनातोफखाना गल्ली

" शंकरराव नागेश दामले.

" मल्हाराव माधव बक्षी, अमदाबादकर.

" त्र्यंबक जगन्नाथ गद्रे.

" शंकर अनंत घोलप.

" केशव त्र्यंबक मांडवागणे.

" काशिनाथ नारायण हाजीत सावकार बेटागिरी ता. गदग

" वामनराव वासुदेव नायब कामदार देवास.

" नारायण हरी खानोलकर, खारबांव

" शिताराम रामचंद्र हर्षे, कडी,

रा. रा. मोरोपंत गोविंद गोवे, हेडमास्तर इंग्लिश स्कूल पोरबंदर.

" विष्णुपंत नारायण तेंडूलकर भडेकर, मौजे भडें.

" गोविंद गणेश, सेक्रेटरी, फ्यामिली ब्रदर्स लायब्ररी, देवास.

" नारायण भवानजी गोंदवेकर मुंबई.

" प्रभाकर सखाराम जयवंत, परतवाडा.

" रामकृष्ण अमृत देशपांडे, परतवाडा.

" किसन जगजीवन पेटलाद.

" लक्ष्मण वामन गोरे, सिग्नलर स्टेशन कसारा.

" कृष्णाजी हरी गोवे, स्कूलमास्तर रेवडी ता. सातारा,

" शिवरुद्राप्पा शिवपुत्राप्पा सुणदाळी.

" रामचंद्र कृष्ण कोपरकर, जालगांव.

" शिताराम काशिनाथ पुसाळकर, शिहोर.

## मांडवड.

रा. रा. केशव शिताराम पेठकर, स्कूल मास्तर.

" लक्ष्मण बापुजी कुळकर्णी.

" दादोबा पांडोबा.

" राजाराम सदाशिव.

" भिकाजी बळवंत ठाकूर.

☞ ह्या शिवाय आणखी दुसऱ्या ज्या ज्या गृहस्थांनीं आपल्या सह्या पाठवून आश्रय दिला आहे त्यांच्या सह्या मुदतीनंतर आल्या कारणानें त्या ह्या खालीं छापून प्रसिद्ध केल्या नाहींत तरी त्याबद्दल सूज्ञ ग्राहक क्षमा करितील अशी आशा आहे.

प्रकाशक.